


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८३ - ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर १९९७
(दिवाळी अंक १९९७)

□

संपादक
ह. ल. निपुणगे

□



□

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३





अनुक्रमणिका

# अनुक्रम



□

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ : सुधा मोने
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये पन्नास □ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- □ वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.








# संपादकीय

## ह. ल. निपुणगे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा दिवाळी अंक (ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर ९७) चरित्रलेखन विशेषांक म्हणून सादर करताना अनेक प्रकारे विचार करावा लागला. स्वातंत्र्योत्तर काळात विशेषत: स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव साजरा करीत असताना- मराठी साहित्य, विविध साहित्यप्रकारांनी म्हणजे काव्य, कथा, कादंबरी, नाटके, चरित्र-आत्मचरित्र इत्यादींनी खूपच समृद्ध झाले आहे; त्यातही चरित्र वाङ्मयासंबंधी फारच वैविध्यपूर्ण आणि वैशिष्ट्यपूर्ण विचार झाला आहे हे जाणवते. या चरित्र-वाङ्मयात अनेक राजकीय, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रात महत्त्वपूर्ण कामगिरी करणाऱ्यांची चरित्रे लिहिली गेली. लोकमान्य टिळक, न्या. रानडे, आगरकर, डॉ. आंबेडकर इत्यादि सामाजिक क्षेत्रांतील व्यक्तींची चरित्रे तर अनेकांनी अनेकांगांनी लिहिली. संतांची चरित्रेही याच प्रकारे लिहिली गेली. या चरित्रवाङ्मयात प्रचंड वैविध्य आहे, त्याची नोंद आम्ही या अंकातील सूचीत घेतली आहे.

चरित्रवाङ्मय अनेक प्रकारे विकसित होत गेले. डॉ. द. न. गोखले, डॉ. वि. रा. करंदीकर, सर्वश्री वि. ग. कानिटकर, वि. स. वाळिंबे, य. दि. फडके या चरित्र-कारांनी या वाङ्मयप्रकाराचा वेगळ्या प्रकारे विचार केला ते अधिक वाचनीय आणि रंजक होईल असे प्रयत्न केले. विशेषत: डॉ. द. न. गोखले यांनी व्यक्ति-विमर्शाकडे केलेली वाटचाल 'गांधीजी मानव नि महामानव' उल्लेखनीय आहे. त्यांना चरित्रलेखनातील 'लय' सापडली आहे.

या अंकातील स्वातंत्र्योत्तर कालातील मराठी चरित्र-लेखनाचा आढावा घेणारा, आणि मराठी चरित्रलेखन कसकसे विकसित होत गेले हे दाखविणारा प्रा. रा. ग. जाधव यांचा बीजलेख स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळातील चरित्रलेखनाचे वैशिष्ट्ये टिपणारा आहे. या विषयासाठी मराठीतील ख्यातनाम चरित्रलेखकांना आम्ही खालील मुद्दे सुचविले - चरित्रलेखनामागील प्रेरणा, भूमिका, उद्दिष्टे, संशोधनाचे स्वरूप, साधना, अनुभव इत्यादि. चरित्रलेखनाचे प्रारूप-यासंबंधीचे चिंतन-मनन-निर्धारण, चरित्र विषय झालेल्या व्यक्तीचे जीवन कार्य आणि तिचा कालखंड यांच्या परस्पर-संबंधाचे आकलन, चरित्र लेखनातील नव्या प्रयोगाचे स्वरूप. चरित्रलेखनाचे स्वयंमूल्य-मापन, चांगल्या चरित्रलेखनाची चरित्र-

काराची कल्पना, कलात्मकता, लालित्य, किंवा सर्जनशीलता यांचा चरित्रलेखनाशी जाणवणारा संबंध इत्यादी.

या अंकात वरील महत्त्वाच्या मुद्द्यांवर बांधेसूद विचार करणारे लेख अनेक प्रसिद्ध चरित्रकारांनी लिहिले आहेत. त्यात वेगवेगळे विचार प्रकट होत आहेत. चरित्रलेखकांची त्यांच्या चरित्रलेखनासंबंधीची दृष्टी प्रतीत होते आहे. मराठी चरित्रलेखनाची भरीव चौकट या प्रयत्नांमुळे वाचकांसमोर उभी ठाकते असा आमचा विश्वास आहे.

एकूणच या अर्धशतकातील चरित्र-लेखनाचे सुस्पष्ट चित्र, त्यातील प्रगती आणि विविध प्रयोगांसह सादर झाले आहे असे वाटते. चरित्रलेखनात जे विविध प्रयोग झाले त्यात 'आठवणी' हा प्रयोगही नोंद घेण्यासारखा आहे. श्री राजा मंगळवेढेकर यांचे 'आठवणीतील अण्णा गदिमा' हे पुस्तक त्याचे उदाहरण म्हणून सांगता येईल. तसेच एकाच व्यक्तीने एका व्यक्तीचे चरित्र लिहिण्यापेक्षा अनेक व्यक्तींनी एका व्यक्तीसंबंधीच्या आपल्या आठवणी सांगत सांगत त्या व्यक्तीचे समग्र चरित्र रंजकतेने उभे करणे हाही एक चरित्रलेखनाचा वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग म्हणावा लागेल. 'विशाखा'च्या दिवाळी अंकातील भालजी पेंढारकर, डॉ. श्रीराम लागू, अमोल पालेकर इत्यादींची चरित्रे अशा आठवणींच्या माध्यमातून उभी करण्याचा प्रयत्न झाला आहे. त्याला वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळाला.

कथा, कादंबरी या वाङ्मयप्रकाराच्या खालोखाल चरित्रलेखन वाचले जाते असे वाटते म्हणून आणि चरित्रलेखनाच्या अभ्यासकांना मार्गदर्शक ठरावा म्हणून आणि त्याचबरोबर नव्या चरित्रलेखकांना समाजातील भरीव काम करणाऱ्या व्यक्तींचे चरित्र लिहिण्यास उत्तेजन मिळावे म्हणून चरित्रलेखनाचे सम्यक् चित्र आम्ही वाचकांसमोर उभे केले आहे. अर्थात् यात काही उणिवा असण्याची शक्यता नाकारता येत नाही. आम्ही आमच्या बाजूने हे चित्र जास्तीत जास्त सुस्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. वाचकांच्या प्रतिक्रिया अपेक्षित आहेत.

मागील अंकात 'ज्ञानपीठ पुरस्काराचे मानकरी कोण असावे?' यासंबंधी वाचकांनी आपली मनोगते पाठवावीत असे 'आवाहन' केले होते. त्याला फारसा प्रतिसाद मिळाला नाही. त्यामुळे या अंकात त्यांचा समावेश करता आला नाही. अजूनही वाचकांनी आपली मनोगते पाठवावीत. 'ज्ञानपीठ पुरस्कारा'सारख्या अत्यंत महत्त्वाच्या पुरस्कारात मराठी लेखक खूपच मागे आहेत. त्याला चालना मिळावी म्हणून वाचकांना 'मनोगता'साठी आवाहन केले होते. या जिव्हाळ्याच्या विषयासाठी खरे तर मराठीप्रेमींनी भरभरून लिहिले पाहिजे असे वाटते.

एकाहत्तराव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी प्रा. द. मा. मिरासदार यांची निवड झाली ही साहित्यक्षेत्रातील अलिकडील आनंदवार्ता आहे. त्यांचे हार्दिक अभिनंदन!

ही दिवाळी आणि नवीन वर्ष म. सा. परिषदेच्या सर्व सभासदांना आणि एकूणच सर्व मराठीप्रेमींना, वाचकांना, लेखकांना भरभराटीचे जावो हीच शुभेच्छा! □

# स्वातंत्र्योत्तर कालखंडातील मराठी चरित्रवाङ्मय

प्रा. रा. ग. जाधव

प्रस्तुत निबंधात स्वातंत्र्योत्तर कालखंडातील मराठी चरित्रवाङ्मयासंबंधी सर्वसाधारण जिज्ञासू वृत्तीच्या वाचकाला जाणवणारी काही निरीक्षणे नमूद करण्याचा प्रयत्न केलेला आहे. गेल्या अर्धशतकातील चरित्रकारांचा व चरित्रनिर्मितीचा हा समग्र इतिहास नाही किंवा धावता ऐतिहासिक आढावाही नाही. मराठी चरित्रवाङ्मयाला प्रदीर्घकालीन परंपराही आहे. या परंपरेची चिकित्सक मांडणी करण्याचाही इथे प्रयत्न नाही. अर्थात निरीक्षणे ही इतिहाससापेक्षच असतात आणि परंपरालक्ष्यीही असतात. अशा अर्थानेच या निबंधात आवश्यक तेवढा चरित्रवाङ्मयीन इतिहास आणि परंपरा यांचा आधार घेतलेला आहे.

**स्वातंत्र्यपूर्वकालीन परंपरेचे सिंहावलोकन**

स्वातंत्र्योत्तर कालखंडातील मराठी चरित्रवाङ्मयाला साधारणपणे साडेसहाशे वर्षांची पूर्वपरंपरा आहे. गद्य व पद्य यांतून विभागलेली ही परंपरा, म्हटली तर अखंड आहे आणि म्हटली तर तुटक आहे. महानुभवांच्या 'लीळाचरित्र', 'श्री गोविंदप्रभू-चरित्र', 'स्मृतिस्थळ' या आद्य चरित्रकृती गद्यातच होत्याः तर 'आदि,' 'समाधी,' 'तीर्थावली' ही नामदेवांनी रचलेली ज्ञानेश्वर-कथा पद्यात आहे. विशेष म्हणजे चरित्रनायकांच्या समकालीनांनी, सहकाऱ्यांनी वा साक्षीदारांनी लिहिलेल्या या चरित्रकृती आहेत आणि चरित्रनायकांच्या जीवनाचे सारभूत आकलन समजावून घेण्यादेण्यासाठीच त्या निर्माण झालेल्या आहेत. चरित्रलेखनामागील सर्जनशील आत्मभानाच्या चक्क निदर्शक ठरणाऱ्या या साहित्यकृती मराठीच्या उगमस्थानी निर्माण व्हाव्यात, ही वस्तुस्थितीच मोठी अर्थपूर्ण आहे.

मराठी चरित्रवाङ्मयाची ही आधुनिकपूर्व परंपरा पुढे चरित्रनायकांची लीलावर्णने, विजयगाथा, आख्याने, पोवाडे, बखरी यांच्या रूपाने आणि भजनकीर्तनांच्या माध्यमांतून वाटचाल करताना दिसते. महिपतीबुवा ताहराबादकर हा हाडाचा चरित्रकार म्हणजे मराठीतीत पहिलाच परिपूर्ण चरित्रकार होय. हे अशा अर्थाने की, चरित्रलेखन हेच आपले लेखनसर्वस्व व जीवनसर्वस्व आहे, याचे प्रकट भान महिपतीबुवांना होते. नाथाजी, उद्धवचिदघन, दासोदिगंबर यांसारखे महिपतीपूर्व चरित्रकर्ते जसे महत्त्वाचे आहेत; त्याचप्रमाणे वारकरी पंथापेक्षा रामदासी संप्रदायाने चरित्रलेखनाकडे अधिक जाणीवपूर्वक लक्ष दिले, ही गोष्टही उल्लेखनीय आहे. राज्यकर्त्या अशा छत्रपती शिवाजी, संभाजी, राजाराम यांसारख्या

महापुरुषांची बखररूप चरित्रे त्यांच्या निकटकालीन बखरकारांनी लिहिली. मराठी चरित्रलेखनाच्या या आद्य धारेचा चिकित्सक अभ्यास होणे उद्‌बोधक ठरेल. प्रत्यक्षातील कर्तृत्ववान माणसे हाच चरित्रलेखनाचा विषय असल्याने प्रत्यक्षातील सांस्कृतिक पर्यावरणाचा, त्यातील मूल्यविषयक जाणिवांचा प्रभाव चरित्रलेखनावर उमटणे स्वाभाविक ठरते. माणसाचे व्यक्तिमत्त्व, त्याचे जीवन, त्याचे कर्तृत्व समजावून घेण्याची आणि त्यांची अर्थपूर्णता शोधण्याची प्रत्येक कालखंडाची रीत वेगवेगळी असते. मराठी चरित्रलेखनाची आद्यधारा लीलावर्णनपर, परमार्थबोधप्रवण, अलौकिकशोधक आणि गौरवपर आहे हे खरेच; पण व्यक्तिविमर्शाची, ऐहिक जिण्याची, मानवी कर्तृत्वाची आपल्या भूमिकेशी सुसंगत अशी जाणीवही या आद्यधारेत होती, हेही लक्षात घेतले पाहिजे. सामान्य माणसाचे उद्‌बोधन व उन्नयन करण्याचे प्रयोजन हे कोणत्याही लेखनाला कळतनकळतपणे इहवादी स्वरूप व वळण देत असते; कारण सामान्य माणसाचा जीवनसंघर्ष ऐहिकतेशीच निगडीत असतो. महानुभावी गद्य चरित्रे आणि महिपती इत्यादींची संतभक्तचरित्रे यांतून माणसाचे माणूसपण अनेक रंगरूपांतून निश्चितच प्रकट झालेले आहे. स्मृतिचित्रण, स्मरणगाथा, स्वभावदर्शन, लीलावर्णन, गोष्टीरूप दर्शन, ऐतिहासिक तपशील यांसारख्या चरित्रलेखनाच्या अंगभूत घटकांचे स्पष्ट भान आधुनिकपूर्व मराठी चरित्रकारांना होते. आधुनिक काळातील चरित्रवाङ्‌मयाच्या अभ्यासकांनी या पूर्वपरंपरेचे चिकित्सक भान राखले नसले, तरी प्रत्यक्ष चरित्रलेखनात चरित्रकारांनी मात्र त्या पूर्वपरंपरेचा वारसा कालोचित संस्करणासकट पुढे चालविला आहे. नवे संत व भक्त, नवे नायक, नवे लोकसेवक यांच्या चरित्रकथा तो वारसा चालवीत आहेत. प्राचीन चरित्रकारांनी अलौकिकतेवर भर देऊन लौकिकाचे रंग सूचित केले; तर आधुनिक चरित्रकारांनी लौकिकतेवर भर देऊन अलौकिकाचे अधोरेखन केले. दोहोंतील चरित्रात्मक कल्पनाशक्ती मूलतः लौकिक-अलौकिकाच्या द्वंद्वात गुंतलेली आहे, असे म्हणता येईल. एकोणिसावे शतक आणि विसाव्या शतकाचा पूर्वार्ध हा मराठी चरित्रवाङ्‌मयाच्या विकास-विस्ताराचा कालखंड होय. या सुमारे दीडशे वर्षांतील चरित्रलेखनाचे व चरित्रकारांचे पूर्वपरंपरेशी संभवणारे नाते काटेकोरपणाने स्पष्ट झालेले नाही. त्याचप्रमाणे इंग्रजी चरित्रे व चरित्रकार आणि व्यक्तिकेंद्रित इतिहास व इतिहासकार याचा जो आदर्श सामान्यतः मराठी चरित्रकारांनी अनुसरला, त्याच्या गुंतागुंतीच्या प्रभावाचा नेटका अभ्यासही झालेला नाही.

महाराष्ट्राच्या भूतकाळाने व वर्तमानकाळाने चरित्रविषय होऊ शकणाऱ्या अनेकविध क्षेत्रांतील नामवंत व्यक्ती चरित्रकारांपुढे ठेवल्या होत्या. त्याचप्रमाणे असामान्य प्रज्ञा, अद्वितीय प्रतिभा, अनन्यसाधारण कर्तृत्व इत्यादी स्वरूपातील असामान्यत्वाची अट चरित्रविषय व चरित्रकार यांच्या बाबतीत अनावश्यक आहे, याची जाणीव आधुनिक जीवनमूल्यांनी निर्माण केली होती. सामान्य व असामान्य या दोन टोकांमधील व त्या टोकांसकट कोणतीही व्यक्ती हा चरित्राचा विषय व चरित्रकारही बनू शकते, हे भान चरित्रात्मक सर्जनशीलतेचे विकसन करणारे होते. प्रत्यक्ष चरित्रलेखनाला जोराची चालना

देणारा आणखी एक संदर्भ होताः इंग्रजी सत्ताधाऱ्यांकडून व अभ्यासकांकडून वारंवार व विविध प्रकारे त्यांच्या सांस्कृतिक प्रभुत्वाचा अहंमन्य डांगोरा पिटला जात होता आणि देशी संस्कृतीचे विपर्यस्त अवमूल्यन केले जात होते. त्याची प्रतिक्रिया म्हणून इतिहासकालीन व वर्तमानकालीन कर्तृत्वांचा वा कर्तृत्ववानांचा चरित्रात्मक धांडोळा घेण्यास जोराची चालना मिळाली. या सांस्कृतिक अस्मितेच्या व आत्मशोधनाच्या प्रेरणेला, इंग्रजी चरित्रकृती व चरित्रकार यांच्या प्रभावातून पूरक अशी वाङ्मयीन दिशा प्राप्त झाली. मराठी चरित्रलेखनावरील या दुहेरी प्रेरणांचा कमीअधिक प्रभाव स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत व खरे तर त्यानंतरही, टिकून राहिल्याचे दिसते. वसाहतवादी प्रभावाचा अंमल अजूनही चालू आहे असे म्हटले जाते ते यामुळेच होय. जॉन गुंथरकृत 'इनसाइड इंडिया' या ग्रंथात सावरकरांचा उल्लेख नाही, म्हणूनच धनंजय कीर त्यांचे इंग्रजी चरित्र लिहिण्यास उद्युक्त झाले, ही १९५० सालची गोष्ट मोठी अर्थपूर्ण आहे.

एकोणिसावे शतक आणि विसाव्या शतकाचा पूर्वार्ध या प्रदीर्घ कालखंडातील मराठी चरित्रलेखनावरील काही दिशा व दृष्टिकोन उल्लेखनीय आहेतः विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी डॉ. जॉन्सनच्या चरित्रवजा निबंधातून एका व्रतस्थ परदेशी सारस्वताचा मोठ्या समरसतेने परिचय करून दिला. स्वतःचे वा स्वतः मानलेल्या आदर्शाचे प्रतिबिंब चरित्रकाराला आपल्या चरित्रनायकात दिसते. या आंतरिक गोवणुकीतूनच हे चरित्रलेखन कलात्मक गुणवत्ता, लालित्य यांचे वाटेकरी झाले. बॉस्वेलचे जॉन्सनचरित्र पुढे ठेवून लक्ष्मणशास्त्र्यांनी (विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे धाकटे बंधू) विष्णुशास्त्र्यांचे चरित्र लिहिले. चरित्रनायकातील नायकत्वाबरोबरच त्याचे भलेबुरे माणूसपण शोधण्याचा हा काहीसा पहिलाच मराठी प्रयत्न असावा! लिटन स्ट्रॅचीच्या 'एमिनंट व्हिक्टोरियन्स' मधील मोठ्यांच्या छोट्या गोष्टी चरित्रलेखनातून न वगळण्याचा धडा हलक्या हाताने गिरवण्याचा लक्ष्मणशास्त्र्यांचा प्रयत्न महत्त्वाचा आहे. व्यक्तीच्या जीवनाचा व कर्तृत्वाचा सर्वसाधारण कक्षेतीलच पण आगळावेगळा व प्रेरक ठरणारा विषय काशिबाई कानिटकरांनी डॉ.आनंदीबाई जोशी यांच्या चरित्रात हुडकला व साकार केला. समकालीन व निकटपूर्वकालीन अशा विविध क्षेत्रांतील साधारणांचा व असाधारणांचा चरित्रात्मक वेध घेण्याची दृष्टी या प्रकारे सुरू होऊन पुढे सतत प्रभावी होत गेल्याचे दिसून येते.

इतिहासातील महापुरुष व इतिहास घडविणारे निकटकालीन राष्ट्रपुरुष यांच्या चरित्रलेखनाच्या वाटा नवे संशोधन, नवे मूल्यमापन व अनुषंगाने कमीअधिक खंडनमंडन या दिशेने जात राहिल्याचे दिसते. छत्रपती शिवाजी, म.फुले, लो. टिळक, म. गांधी, पंडित नेहरू, डॉ. आंबेडकर यांसारख्या विभूती तर चरित्रलेखनाचे कधीच न संपणारे विषय ठरतात. उपेक्षित कर्तृत्ववानांची चरित्रे लिहून त्यांचे ऋण चुकते करण्याचा प्रयत्नही चरित्रकारांनी केला. सामाजिक सुधारणा, संशोधन, साहित्य, ललितकला, रंगभूमी, धार्मिक सुधारणा, आर्थिक व औद्योगिक क्षेत्र, राजकीय कर्तृत्व यांसारख्या अनेकविध क्षेत्रांतील व्यक्ती या चरित्रवाङ्मयात दाखल झाल्या.

व्यक्ती आणि वाङ्मय, व्यक्तीचा काल आणि कर्तृत्व, आठवणी आणि ओळखी अशा प्रकारच्या ढाच्यांतून स्वातंत्र्यपूर्वकालीन बरेचसे चरित्रलेखन झाल्याचे अभ्यासकांनी दाखवून दिले आहे. या तीनही प्रकारच्या रचनांमधून चरित्रनायक एक माणूस म्हणूनजिवंत स्वरूपात व एकसंधपणे साकारला जात नाही. चरित्रनायकाच्या संभत्रणाऱ्या अनेक चरित्ररूपांची त्यातून जाणीव तर होते, पण प्रत्यक्षात साकार होते ते त्याचे एकच रूप ! स्वातंत्र्योत्तर कालखंडात या जोडतंत्रातील उणीव चरित्रकारांना जाणवल्याचे दिसते.

स्वातंत्र्यपूर्वकालीन मराठी चरित्रवाङ्मयाने चरित्रलेखनाची व चरित्रवाचनाची एक व्यापक अभिरूची समाजात निर्माण केली. चरित्रविषयांची विविधता आत्मसात करताना कळत-नकळतपणे या दालनातील हस्तिदंती मनोरे ढासळत गेले. हे मनोरे वैभूतिकतेचे, अलौकिकतेचे, ऐकांतिक भक्तीचे वा द्वेषाचे, परंपरापूजनाचे वा परंपराद्रोहाचे होते. तरीदेखील चत्रिलेखनाच्या या विस्ताराच्या व वैभूतिकता- निवारणाच्या प्रक्रियेत एक मूकसंमत अशी मूल्यचौकट आधारभूत होतीच. श्रद्धा व विवेक, वृत्ती व वर्तन, जुने आणि नवे, पारंपरिक व आधुनिक, इहवादी व आध्यात्मिक, जड आणि चेतन, निसर्ग आणि माणूस अशा परस्परच्छेदक कल्पनांचा काहीएक अर्थपूर्ण मेळ त्या मूल्यचौकटीत घातलेला होता. व्हॉल्टेअरचे एक चिंतनीय वचन आहे. तो म्हणतो, "We owe consideration to the living; to the dead we owe truth only." याचा अर्थ जे जे गतकालीन आहे, गतार्थ आहे, केवळ इतिहास, परंपरा किंवा स्मृती यांच्या रूपानेच अवशिष्ट आहे; त्या त्या सर्वांबद्दल सत्य जाणून घेणे हीच आपली जबाबदारी असते. उलट जे जे विद्यमान आहे, जिवंत व जगत आहे, वर्तमानकालीन आहे, त्या त्या बावत सत्यापेक्षा तारतम्यविवेक वाळगणे, ही आपली जबावदारी आहे.

भूतकालीनाच्या शुद्ध सत्याचे वा सत्यशोधनाचे भूत मानगुटीवर पेलत आणि वर्तमानकालीनाच्या वा निकटपूर्वकालीनाच्या तारतम्यविवेकाचे जू सांभाळत स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी चरित्रलेखक वाटचाल करीत आहे. या चरित्रात्मक लेखनाच्या नैतिकतेचे स्पष्ट भान सर्वच चरित्रलेखकांना वा वाचकांना असेलच, असे म्हणता आले नाही; तरी स्वातंत्र्योत्तर कालखंडात उत्तरोत्तर ढासळत गेलेली व्यापक मूकसंमत मूल्यचौकट ही चरित्रलेखनाच्या सत्यता व तारतम्य या दुहेरी भिंगांच्या दृष्टीपुढे समस्याही निर्माण करीत आहे व त्यातून मार्ग काढण्यासाठी नव्या नव्या वाटाही शोधत आहे, असे दिसते.

स्वातंत्र्यपूर्वकालीन चरित्रकोशाचा वारसाही गेल्या पन्नास वर्षांच्या कालखंडात त्रोटकपणे व खंडित स्वरूपात चालू राहिला असला, तरी चित्रावांच्या चरित्रकोशासारखे पण नवे व सुधारित बृहतप्रकल्प मराठीत साकार झाले नाहीत. राष्ट्रीय चरित्रकोश मराठीत नाहीत. कोशसाहित्य म्हणजे माहितीचे संकलन होय; ती वाङ्मयीन निर्मिती नव्हे हे खरेच! तथापि चरित्रवाङ्मयाची अभिरूची जोपासणारे व अनेक प्रकारे उपयोगी ठरणारे कोश हे महत्त्वाचे साधन आहे.

चरित्रवाङ्मयाची पद्धतशीर तत्त्वमीमांसा स्वातंत्र्यपूर्वकाळात झालेली नाही व स्वातंत्र्योत्तर

अनुक्रमणिका

काळातही झालेली नाही. प्रा. अ. म. जोशी, डॉ. सदा कऱ्हाडे, जान्हवी संत, डॉ. रावते, डॉ. द. न. गोखले, डॉ. जयंत वष्ट इत्यादींचे अभ्यास उपलब्ध आहेत; तथापि मराठी चरित्रवाङ्‌मयाच्या तुलनेत हे सर्वच अभ्यास अपुरे असल्याचे जाणवते. चरित्रवाङ्‌मयाची तत्त्वमीमांसा आपल्या देशी परंपरेचा सूक्ष्म व सखोल अभ्यास करूनच होणे, अगत्याचे आहे. पश्चिमी प्रारूपांची (मॉडेल्सची) उसनवारी स्वतंत्र चरित्रवाङ्‌मयाची एवढी प्रदीर्घ परंपरा असलेल्या मराठी अभ्यासकांनी करण्याची गरजही नाही.

**स्वातंत्र्योत्तर कालखंड**

**सांस्कृतिक पर्यावरण :**

स्वातंत्र्योत्तर कालखंडातील म्हणजे गेल्या सुमारे पन्नास वर्षांतील मराठी चरित्रवाङ्‌मयाला अत्यंत झपाट्याने बदलणाऱ्या भौतिक, सांस्कृतिक पर्यावरणाचा, त्यांतील अत्यंत जटिल गुंतागुंतीचा, आपल्या वाङ्‌मयीन उपसंस्कृतीमधील विघटनकारक व विकेंद्रीकरणाच्या प्रक्रियांचा, विश्वात्मकता व देशीयता या दोन टोकांदरम्यान आंदोलत राहणाऱ्या हव्यानकोशा जाणिवांचा आणि इतिहास-परंपरेच्या भारवाहक संवेदनशीलतेला झिडकारणाऱ्या मनोवृत्तीचा असा विविध प्रकारचा व अर्थांचा संदर्भ आहे. लोकशाहीकरणाच्या प्रक्रियेचा प्रभाव वाङ्‌मयनिर्मिती व वाङ्‌मयाचे प्रतिसादक्षेत्र यांवर तीव्रतेने उमटत आहे.

या व्यापक व व्यामिश्र संदर्भव्यूहाचा बारकाईने वेध घ्यावयाचा, तर गेल्या अर्धशतकातील प्रत्येक दशकाचा समग्रपणे सांस्कृतिक मागोवा घेणे इष्ट आहे. या कालखंडातील नवसाहित्याच्या पहिल्या पर्वानंतरचे साठोत्तरी दशक, सत्तरी-ऐंशीची दोन दशके आणि अलीकडची पंधरावीस वर्षे हे सगळेच टप्पे बदलत्या वाङ्‌मयीन अभिरूचींचे कमी-अधिक प्रमाणात निदर्शक ठरणारे आहेत. शिक्षणाचा प्रसार आणि ग्रामीण समाजात उत्तरोत्तर उत्तेजित होत गेलेल्या सांस्कृतिक वाङ्‌मयीन-आकांक्षा हाही एक महत्त्वाचा प्रभावघटक आहे.

**चरित्रवाङ्‌मयाचे मुक्तद्वार**

चरित्रवाङ्‌मय हे कथासाहित्याप्रमाणेच सर्वसामान्यांचे, लोकांचे वाङ्‌मय आहे. सामान्य वाचकाला आपल्या सामान्यत्वाची कटू जाणीव किंचितही न करून देता ते त्याचे हमेशा स्वागतच करीत आलेले आहे. विशेषीकरणाच्या प्रक्रिया इतर वाङ्‌मयप्रकारांत ज्या प्रमाणात घडत गेल्या, त्या प्रमाणात त्या चरित्रवाङ्‌मयात घडलेल्या नाहीत. सामान्य वाचकाशी कळत-नकळतपणे जास्तीत जास्त संवादी व सन्मुख राहण्याची चरित्रवाङ्‌मयाची प्रकृती असते. त्यामुळे वाङ्‌मयक्षेत्रात निर्माण होणाऱ्या लहानमोठ्या वादविवादांचा, यांतील अवघड शास्त्रीयतेचा व तात्त्विकतेचा उगम ज्याप्रमाणे इतर प्रकारच्या वाङ्‌मयातून होतो, तसा प्रकार चरित्रवाङ्‌मयाच्या बाबतीत कमी प्रमाणात संभवतो. चरित्रवाङ्‌मयीन वादविवाद हे विद्वान, विचारवंत वा सांप्रदायिक यांच्यापाशी थबकतात, सामान्य वाचकांना त्यांचा उपसर्ग होत नाही. परिणामतः एक स्वच्छ, सुबोध व स्वागतशील असे वाचनक्षेत्र सर्वसामान्य वाचकाला चरित्रवाङ्‌मय उपलब्ध करून देत असते. सर्व वयोगटांतील स्त्रीपुरुषांना आपल्या

वाचकपणावरील विश्वास दृढ करण्यास कथात्मक साहित्यावरोवरच चरित्रवाङ्मय हेदेखील तत्परतेने मदत करते व ती भूमिका टिकवण्यासाही पोषक ठरते.

**संस्कार व शिकवण : बोधवादी चरित्रलेखन**

स्वातंत्र्योत्तर कालखंडात चरित्रवाङ्मयाची ही सनातन गरज वालसाहित्यातील चरित्रकार, पाठ्यपुस्तकांचे शिल्पकार, संस्कारवादी साहित्याचे पुरस्कर्ते, सामाजिक व राष्ट्रीय उद्‌वोधनाचे समर्थक आदींनी विविध क्षेत्रांतील जुन्या-नव्या थोरामोठ्यांची लहानमोठी चरित्रे लिहून पूर्ण केलेली आहे. विशेष म्हणजे मानवी पुरुषार्थांची अद्ययावत क्षेत्रे या वोधवादी चरित्रदृष्टीने टिपलेली आहेत. स्टीफन हॉकिंग, आनंदवनीचे उद्योगी वावा आमटे, राळेगणसिद्धचे अण्णा हजारे, एव्हरेस्टविजेता तेनसिंग यांसारखे चरित्रनायक त्यांतून आढळतात. संस्कारसंपन्नता, संस्कारदायकता आणि निखळ कर्मयोग हींदेखील मनुष्यचरित्राची सत्येच आहेत. या सत्यांचे संवेदन व प्रकटन हे या प्रकारच्या चरित्रवाङ्मयचे वैशिष्टय आहे. वालकुमारांचे व सामान्य वाचकवर्गांचे हे संस्कारलक्ष्यी चरित्रवाङ्मय निष्ठेने संपन्न करणारे भा.रा.भागवत, राजा मंगळवेढेकर, सुमती पायगावकर यांसारखे कितीतरी चरित्रकार उल्लेखनीय आहेत. गेल्या शतकातील दरमहा एक चरित्र देण्याची 'वालवोध' कार विनायक कोंडदेव ओक यांची चौतीस वर्षांची अतूट परंपरा मात्र स्वातंत्र्योत्तर कालखंडात जपलेली दिसत नाही.

**समग्रलक्ष्यी चरित्रवाङ्मय :**

विविध क्षेत्रांतील कर्तृत्ववान व्यक्तीसंबंधी समग्रलक्ष्यी चरित्रलेखन करण्याची स्वातंत्र्यपूर्वकालीन परंपरा स्वातंत्र्योत्तर कालखंडातही टिकून आहे. काल आणि कर्तृत्व, व्यक्ती आणि वाङ्मय असा विश्लेषक दृष्टिकोन स्वातंत्र्योत्तर समग्रलक्ष्मी चरित्रलेखनात आहेच. पण काल, कर्तृत्व, व्यक्ती व वाङ्मय या संकल्पनांच्या आशयात व उपयोजनात विस्तार व विकास झाल्याचेही लक्षात येते. नवे संशोधन, नवीन प्रकारची चरित्रसाधने, नवे ज्ञानविज्ञान, नवी इतिहासदृष्टी आणि व्यक्ती-समष्टी- संवंधाचे नवे व्यामिश्र भान या सर्वांचा कालोचित पण कमीअधिक प्रभाव या समग्रलक्ष्यी चरित्रलेखनावर पडल्याचे दिसते. जन्ममरणाच्या दोन टोकांमधील व्यक्तीचे समग्र चरित्र व समग्र सत्य मूर्त करण्याचा प्रयत्न चरित्रकार करतो. परंतु बीजवृक्ष-न्यायातील एकात्मदर्शक अंतर्वाह्य जैविक संगती हेच खरे तर समग्रतेचे प्रतीत होणारे स्वरूप असते. समग्र चरित्र व समग्र रूप हे चरित्रकृतीच्या अंतर्गत घाट व घटक यांच्या एकरूपतेवर अवलंवून असते. सामान्यतः वीज व वृक्ष यांच्यातील विसंवादांनी अनेक समग्रलक्ष्यी चरित्रे भरलेली आढळतात.

**एकोणिसाव्या शतकाचे देणे**

एकोणिसावे शतक हे विसाव्या शतकाच्या उतरार्धाच्या जणू मानगुटीवरच वसले आहे, हे मराठी संशोधन, साहित्य व इतर प्रकारचे वैचारिक वाङ्मय पाहता लक्षात येते. स्वातंत्र्योत्तर कालखंड हा देशीयतेच्या आत्मभानाचा व सर्वांगीण परिवर्तनलक्ष्यी जाणिवांचा कालखंड आहे. या परिवर्तनप्रक्रियेची व देशीय अस्मितेची विविधरंगी प्रस्फुरणे एकोणिसाव्या

शतकानेच प्रथम व तीव्रतेने अनुभवली. म्हणूनच सामान्यतः एकोणिसावे शतक व टिळकयुग या सुमारे सव्वाशे वर्षाच्या कालखंडातील कर्तृत्ववान माणसांचे जीवनकार्य हुडकण्याचे आणि आधीच हुडकलेले असेल, तर त्याचे पुनर्निरीक्षण करण्याचे प्रयत्न चरित्रकारांनी केलेले आहेत. स्वातंत्र्यपूर्व कालखंडात शिवाजी महाराज व लो. टिळक हे भरपूर चरित्रकृतींचे नायक ठरले; तर स्वातंत्र्योत्तर काळात लोकहितवादी, महात्मा फुले, आगरकर इत्यादींकडे अधिक लक्ष वळल्याचे दिसते. समग्रलक्ष्यी चरित्रवाङ्मयाच्या दृष्टीने एकोणिसावे व टिळकयुगापर्यंतचे विसावे शतक म्हणजे अजूनही 'न नांगरलेली जमीन' आहे, हे 'स्त्रीपुरुषतुलना करणाऱ्या गेल्या शतकातील ताराबाई शिंदे या आद्य मराठी स्त्री-विचारवंताच्या उदाहरणावरून सहज लक्षात येईल.

**व्रतस्थ चरित्रकार**

स्वातंत्र्योत्तर कालखंडात व्रतस्थ म्हणता येतील, अशा चरित्रकारांची एक स्पृहणीय मालिका दिसून येते. या कालखंडाच्या आगेमागे असणारे न. र.फाटक, गं.दे.खानोलकर, त्याचप्रमाणे शं.गो. तुळपुळे, चां.भ.खैरमोडे, धनंजय कीर, शं.दा.पेंडसे, द.न.गोखले, वि.स.वाळिंबे, वि. ग. कानिटकर, सुमती देवस्थळे, सदाशिव आठवले, य.दि फडके, नलिनी पंडित, वि. रा. करंदीकर, वीणा गवाणकर, वि. श्री. जोशी, रा. चिं. ढेरे, गोविंद तळवळकर, अरविंद ताटके, म. श्री. दीक्षित, वा. सी. बेंद्रे, बाळशास्त्री हरदास यांसारख्या चरित्रकारांनी स्वातंत्र्योत्तर मराठी चरित्रवाङ्मय संपन्न केले आहे. स्वतंत्रपणे केलेले संशोधन, नव्या चरित्रसाधनांचे संपादन व चिकित्सक वापर, चरित्रनायकाच्या समग्र जीवनाचा सारभूत वेध घेण्याचा प्रयत्न, मूल्यमापनाची स्वतंत्र भूमिका या सर्व बाबतींत आपापली वैशिष्ट्ये व वेगळेपण जपण्याचा कमीअधिक यशस्वी प्रयत्न या चरित्रकारांनी केलेला आहे. चरित्रलेखनामागे हेतुगांभीर्याची बैठक आवश्यक असते, चिंतनमननाचा आधार हवा असतो, सत्यशोधनाची निर्मळ ऊर्मी असावी लागते. या सर्व बाबतींत सहेतुकपणे तडजोड न करण्याची शिस्त सामान्यपणे या सर्वच चरित्रकारांनी पाळलेली दिसते.

**समग्रलक्ष्मी मीमांसक चरित्रलेखन**

समग्रलक्ष्यी चरित्रलेखनाचा नव्हे; तर समग्रलक्ष्यी चरित्रमीमांसेचा एक अभिनव प्रयोग डॉ.सदानंद मोरे यांनी आपल्या 'तुकारामदर्शन' या ग्रंथात केला आहे. मराठी चरित्रवाङ्मयाच्या दृष्टीने पाहता, हा चरित्रनायकाच्या मूल्यमापनाच्या प्रदीर्घकालीन परंपरेचे पुनश्च मूल्यमापन करणारा व त्यातून तुकारामचरित्राला एक ऐतिहासिक व अद्ययावत मूल्यमापक परिमेक्ष्य देणारा प्रयत्न म्हणता येईल. काल आणि कर्तृत्व तसेच व्यक्ती आणि वाङ्मय या चरित्रलेखनाच्या रूढ चौकटीचा गुणात्मक कायापालट करण्याचे या प्रयोगाचे वैशिष्ट्य अभ्यसनीय आहे. चरित्रात्मक सत्यतेचा शोध केवळ नव्या माहितीच्या व साधनांच्या आधारेच घेता येतो असे नव्हे; तर उपलब्ध माहिती तथा मूल्यमापने व चरित्र यांच्यातील गुंतागुंत नीटपणे उलगडून दाखविण्याऱ्या व्यासंगपूर्ण विश्लेषण-संश्लेषणातूनही घेता येतो. 'तुकाराम-दर्शनाने ही बाब अधोरेखित केल्याचे दिसते.

### सौंदर्यलक्ष्यी चरित्रलेखन

समग्रलक्ष्यी चरित्रलेखनाला एक प्रकारे कलावादी, सहृदयवादी रसिकतेचे व आनंदशोधक परिमाण देण्याचे प्रयत्नही स्वातंत्र्योत्तर कालखंडात झाल्याचे दिसून येते. चरित्रलेखनाला कथाकादंवरी न करता चरित्रालाच कथाकादंवरीरूपात भावून व समजून या प्रकाराचे चरित्रलेखन झाल्याचे लक्षात येते. या प्रकाराचा प्रयत्न एका विशिष्ट अर्थाने मराठी चरित्रवाङ्मयाच्या गंगोत्रीशी निगडीत असल्याचे दिसते. लीळाचरित्र व नामदेवाची आदि-समाधी-तीर्थवळी ही ज्ञानेश्वरांची चरित्रकथा यांच्या मुळाशी व्यक्तिजीवनाची परमोच्च कलात्मकता जाणण्याची वृत्तीच असावी! श्रीचक्रधर व ज्ञानेश्वर ही खरी तर प्रत्यक्षातील माणसे! त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाने त्या प्रत्यक्षाला कल्पिताची कळा आणली आणि यातूनच चरित्रकारांची काव्यात्म कल्पकता, सौंदर्यवृत्ती जागृत झाली.

निबंधमालाकारांनी डॉ. जॉन्सनच्या चरित्राचा सुभग घाटाचा कलात्मक निबंधच केला. व्यक्तिजीवन, विशेषतः थोरामोठ्यांचे जीवन, खरे तर, एक सुंदर निबंधच असतो; एक सौंदर्यसंपन्न रूपबंध असतो. त्या सौंदर्यरूपाची प्रचिती घेणे आणि देणे, यालाच चरित्रलेखन व चरित्राचे सत्य म्हणावयाचे ! आचार्य अत्र्यांनी लिहिलेली 'शापित प्रतिभावंत' हे ऑस्कर वाइल्डवरील व जवाहरलाल नेहरूंवरील 'सूर्यास्त' ही चरित्रकथने; माधुरी पुरंदऱ्यांचा पिकासो, वीणा गवाणकरांचा 'कार्व्हर', मोहिनी वर्दे यांच्या रखमाबाई, सरोजिनी वैद्यांच्या लंडनच्या आजीबाई, मालनी बेडेकरांचे 'खरे मास्तर' यांसारखे या प्रकारात मोडणारे चरित्रलेखन सहजपणे आठवते. चरित्रात्मक कादंबऱ्यांचा एक पर्याय चरित्रकारातील या प्रकारच्या कलात्मक संवेदनशीलतेने साध्य होऊ शकणाऱ्या जीवनसौंदर्यवादी चरित्रलेखनातून उपलब्ध होतो. या प्रकारच्या लेखनासाठी विशिष्ट प्रकृतीचेच चरित्रनायक आणि चरित्रकार आवश्यक असतात काय, या प्रश्नाचे उत्तर आताच देणे अकाली ठरेल आणि त्याचे निर्विवाद उत्तर बहुधा कधीच देता येणार नाही. व्यक्तीच्या चरित्रात वा चारित्र्यात कुठेतरी मनुष्यजीवनाच्या मूलभूत राजस कलात्मक रूपाचे प्रेरक भान असले पाहिजे व आपल्या जिण्याच्या आकलनात, अनुभूतीत व अर्थपूर्णतेत ते भान तिने जागृत राखले पाहिजे एवढेच; याउपर ती व्यक्ती प्रत्यक्षात कलावंत, साहित्यिक वा संत असलीच पाहिजे असे नाही. सौंदर्यलक्ष्यी चरित्रलेखनाच्या संदर्भात चरित्रनायक व चरित्रकार या दोहोंनाही हा विचार लागू आहे. या प्रकारच्या चरित्रलेखनाचा विचार हा असा इथे मांडताना, मला अवचितपणे माधव जूलियनांची आठवण झाली. जूलियनांच्या वाट्याला ऑस्कर वाइल्डचे चरित्रकार अत्रे आले नाहीत, तर 'झेंडूच्या फुलांचे' कर्ते केशवकुमारच आले...! जूलियनांच्या वाट्यास एखाद्या माधुरी पुरंदरे याव्यात, असे मात्र वाटत राहते.

### वाङ्मयसेवकांची चरित्रे :

ऐतिहासिक तथा चरित्रात्मक समीक्षेची एक आटोपशीर चौकट घेऊन शिस्तबद्ध रीतीने मराठी वाङ्मयसेवकांची चरित्रचित्रे गं. दे. खानोलकरांनी सादर केली. व्यक्ती आणि वाङ्मय हाच रुढ साचा कोशरचनेच्या वळणाने या चरित्रलेखनातून वापरल्याचे दिसून येते.

साहजिकपणेच या लेखनतंत्रामुळे वस्तुनिष्ठता, सारभूतता, संक्षेप यांसारख्या निकषांवर भर देण्यात आला. साहित्यिकांचे प्राधान्याने साहित्यलक्ष्यी असे कोशसदृश चरित्रलेखन खानोलकरी वैशिष्ट्य म्हणता येईल. यातून लेखककवींचे चरित्र व वाङ्मय ठळक अंगांनी समजते हे खरेच; परंतु त्यांचे परस्परसंबंध ठळकपणाने उमजतीलच असे मात्र नाही.

हे चरित्रलेखन समग्रलक्ष्यी नसल्याने चरित्रनिर्मितीच्या संश्लेषक बाजूची अपेक्षा करणे, अनाठायी ठरेल.

**द्वंद्वात्मक भूमिका व चरित्रलेखन :**

मानव आणि महामानव, माणूस आणि कलावंत, बलशाली इतिहासपुरुष आणि दुबळा मानवपुत्र, मानवी जाणीव आणि नेणीव या प्रकारच्या द्वंद्वात्मक भूमिकेतून व्यक्तीचे चरित्र समजून घेण्यादेण्याची रीत तशी जुनीच आहे. फरक पडतो या कल्पनांचा व त्यांच्या द्वंद्वात्मक संबंधाचा जो आशय असतो त्यात! याचेही कारण आधुनिक काळातील ज्ञानविज्ञानांचा झालेला विकास हे होय.

स्वातंत्र्योत्तर कालखंडातील काही व्रतस्थ चरित्रकारांनी या प्रकारच्या द्वंद्वात्मक दृष्टीने चरित्रलेखन करण्याचे स्पृहणीय कार्य केले आहे. धनंजय कीर, वीणर गवाणकर द. न. गोखले, सुमती देवस्थळे, यांसारख्या चरित्रकारांची या संदर्भात आठवण होते. व्यक्तिचरित्र हे एक सर्वंकष स्वरूपाचे म्हणजे वैचारिक, भावनिक, तात्त्विक आणि आध्यात्मिक अशा सर्व प्रकारचे कडवे आव्हान आहे व ते आव्हान आपण स्वीकारले पाहिजे, अशी काहीशी या वर्गातील चरित्रकारांची भूमिका असावी, असे दिसते. व्यक्तिचरित्राचे संपूर्ण सत्य निर्विवादपणे उघड करणे ही गोष्ट खपुष्पाप्रमाणेच अशक्य कोटीतील आहे, याचे सुजाण भानही या चरित्रकारांना असतेच असते. संपूर्ण वा समग्र सत्य म्हणजे इवल्याशा बीजातून फलपुष्पांनी बहरलेला आणि नंतर सुकून गेलेला वृक्ष पाहिल्याची प्रचिती येणे. याखेरीज समग्र सत्याची कल्पना करणे चरित्रलेखनाच्या संदर्भात संभवत नाही. प्रत्यक्षात बीज एक पण वृक्ष दुसराच असा किंवा बीजाशिवायच वृक्ष अथवा वृक्षाविना बीज असा प्रकार अनुभवास येतो. चरित्रलेखनाचे समग्र सत्य बाहेरच्या चरित्रविषयात नसते; तर ते त्या लेखनातूनच जन्मते व गोचर होते. व्यक्तिचरित्राची जटिल गुंतागुंत एका बाजूने उलगडत जाते हे खरे; पण दुसऱ्या बाजूने ती अधिकच गुंतागुंतीची होत जाते हेही खरे आहे. मग एखाद्या शीलवतीबाई केतकरांना पुढे येऊन 'मीच हे सांगितले पाहिजे,' असेही म्हणावे लागते आणि हे मीचे सांगणेही अधिक सांगण्याची गरज कायमच ठेवते.

द्वंद्वात्मक पद्धतीमधून व्यक्तिविमर्शावर स्वाभाविकपणेच भर दिला जातो. व्यक्तिविमर्शपर चरित्रलेखनाची अंतिम व आदर्श प्रारूपे (मॉडेल्स) अर्थातच दुःसाध्य असतात व हेही स्वाभाविकच म्हटले पाहिजे. प्रत्येक माणूस स्वतःही स्वतःला यावज्जीव पूर्णपणे समजू शकत नाही हे खरेच आहे. परंतु चरित्रलेखनातील व्यक्तिविमर्शाला या खरेपणाशी खरे तर कसलेच सोयरसुतक नसते, नसावेही ! लहानथोर व्यक्ती तिच्या जीवनकक्षेत का होईना, पण जास्तीत जास्त व आतून-बाहेरून समजणे वा समजावून देणे, ही निर्मितीचा आनंद

घेणारी व देणारी बाब आहे. या गोष्टीची अभिरूची असणे, हेच सुसंस्कृत समाजाचे व त्याच्या चरित्रवाङ्मयाचे महत्त्वाचे लक्षण ठरते. द. न. गोखल्यांचे 'चरित्राचे चरित्र' केवळ चरित्रलेखनाच्या आकारिक (फॉर्मल) समस्येचे चिंतन नाही, चरित्राच्या पद्धतिशास्त्राचेही शोधनबोधन नाही, तर समोरासमोर आलेले दोन आरसे एकमेकांची बिंबे व प्रतिबिंबे ओळखू पाहतात, तेव्हा नेमके काय घडते ते रूढ परिभाषेतून सांगण्याचा प्रयत्न आहे, असे वाटते.

**विचारप्रणालीय दृष्टिकोन :**

समग्रलक्ष्यी चरित्रलेखनाच्या मुळाशी विचारप्रणालीय बांधीलकीच्या प्रेरणा वा भूमिकाही असू शकतात. या प्रकारच्या चरित्रलेखनाची परंपराही जुनीच आहे. चरित्रलेखनातून विचारप्रणालीय वळण स्वीकारण्याचे वा सूचित करण्याचे प्रयत्न जिवंत व प्रगमनशील अशा सर्वच समाजांत होत असतात. यास मराठी समाज व मराठी चरित्रवाङ्मय अपवाद मानण्याचे कारण नाही. मराठीतील नामदार गोखले, लो. टिळक, स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. आंबेडकर यांच्यावरील काही चरित्रे या दृष्टीने जाणकारांना सहज आठवतील. चरित्रवाङ्मयासंबंधीचे बरेचसे वादविवाद हे मुळात विचारप्रणालीय खंडनमंडनाच्या स्वरूपाचे असतात. विचारप्रणालीशी बांधीलकी असणारे विचारवंत व अनुयायी वर्ग यांना व्यग्र व वावदूक करणाऱ्या या प्रकारच्या चरित्रलेखनाविषयी सामान्य वाचक मात्र अधिक तटस्थ व अधिक स्वीकारशील राहतो. वादविवादातून इतिहास-परंपरेची रंगरूपेही उजळ होत जातात.

प्रचार-प्रसाराचे एक साधन म्हणून इतर साहित्यप्रकारांप्रमाणेच चरित्रवाङ्मयही वापरले जाते. यात विशेष वेगळे आक्षेपार्ह असे काही नाही. चरित्रलेखनातील सत्यव्रताची परीक्षा घेण्यासाठीच प्रचारी चरित्रलेखन कारणीभूत ठरते. कुठल्याच प्रकारची असत्यता वा अर्धसत्यता कुठल्याच प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीला फार काळपर्यंत तारू शकत नाही. या विसाव्या शतकाने बांधीलकीच्या भस्मासुरांचे उदयास्त पाहिले आहेत.

**चरित्रवाङ्मयाची विकसित कक्षा :**

स्वातंत्र्योत्तर कालखंडातील मराठी चरित्रवाङ्मय व्यक्तिजीवनाच्या विविधरंगी मौलिकतेला व इहवादी जीवनदृष्टीला स्वागतशीत वृत्तीने सामोरे गेलेले आहे, यात शंकाच नाही. शिक्षक, विद्यार्थी, नट, कलावंत, संगीतकार, क्रीडापटू, चित्रपट-कलावंत, व्यासंगी विद्वान, कर्मयोगी सेवक, ध्येयवादी कार्यकर्ते, लेखक, कवी, विचारवंत, शास्त्रज्ञ, संशोधक, तंत्रज्ञ, उद्योगपती, अर्थतज्ज्ञ यांसारख्या अनेक लहानथोर व्यक्तींची चरित्रे मराठीत निर्माण झाली व होत आहेत. आपल्या सर्जनशील वास्तवाभिरूचीचा विकास-विस्तारच यांतून सूचित होतो. कल्पित माणसांच्या कहाण्यांपेक्षा प्रत्यक्षातील माणसांच्या चरित्रकथा लोकांना अधिकाधिक आवडू लागल्याचे लक्षात येते. सामान्य माणसाचे विशिष्ट प्रकारचे स्वप्नरंजन त्यातून त्यास प्रतीत होत असावे. आपल्या असफलतेची, अपूर्णतेची, अगतिकतेची एक प्रकारची स्वप्नपूर्तीच या चरित्रकथांतून सामान्य माणूस जणू अनुभवत असतो. किंवा

असेही म्हणता येईल की, सामान्य माणसाला कर्तृत्वसंपन्न चरित्रनायक होण्याची नैसर्गिक स्पृहा असते, तिचे खरेखुरे प्रतीकात्मक प्रत्यंतर चरित्रवाङ्मयातून त्यास येते. मनातील उन्नयनाची ज्योत हे वाङ्मय विझू देत नाही.

**चरित्रवाङ्मयाच्या तीन विकसित दिशा :**

स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी चरित्रवाङ्मयाचा विस्तार वैशिष्ट्यपूर्ण असा तीन दिशांनी झाला, हेही लक्षात येते. एक दिशा आत्मचरित्रलेखनाची, दुसरी चरित्रात्मक कथाकादंबऱ्यांची आणि तिसरी प्रत्यक्ष सहवास व स्मृती यांच्या आधारे लिहिलेल्या ललित व्यक्तिचित्रणाची ! चरित्रात्मक सर्जनशीलतेचा किंवा कल्पनाशक्तीचा विस्तारच या तीन धारांतून सूचित होतो. दलित-ग्रामीण वाङ्मयीन सर्जनशीलतेच्या वाबतीत आत्मचरित्रलेखन ही अपरिहार्यता होती. आणि प्रत्येक व्यक्ती ही चरित्राविषय आहे, हे नवे मौलिक भान समाजाला आले असल्याने आत्मचरित्र ही एकूण समाजाचीच एक वाङ्मयीन अपेक्षा होती. स्वातंत्र्योत्तर काळात झपाट्याने सुगीस आलेले आत्मचरित्रांचे भरघोस दाणेदार पीक मोठे अर्थपूर्ण आहे. या मराठी आत्मचरित्रांचे आत्मचरित्र एखाद्या द. न. गोखल्यांनी लिहावयास हवे, असेही वाटते. परंपरागत चरित्रवाङ्मयाने चरित्रनायकासंबंधी ज्या ज्या अर्हता-अटी कळत-नकळतपणे घातल्या वा स्वीकारल्या होत्या, त्या दूर करण्याचे व परंपरागत चरित्रनायकाचे खास अधिकार (प्रिव्हिलेजेस) रद्द करण्याचे कार्य स्वातंत्र्योत्तर मराठी आत्मचरित्रांनी केले. चरित्रलेखन आणि आत्मचरित्रलेखन यांच्या संबंधाचा व परस्परपूरकतेचा तौलनिक अभ्यास करणेही मोठे उद्‌बोधक ठरणारे आहे. थोरांची चांगली चांगली चरित्रे अवघ्या दोन तपांच्या कालखंडात व्रतस्थ वृत्तीने लिहिणाऱ्या धनंजय कीरांना तेवढेच चांगले आत्मचरित्र (कृतज्ञ मी कृतार्थ मी) मात्र लिहिणे जमले नाही. आणि त्यांनी लिहिलेले डॉ. आंबेडकरांचे चरित्र वाचून त्या आधारे आपण आपले चांगले आत्मचरित्र लिहू शकू, असू आत्मविश्वास खुद्द डॉक्टरांनाच वाटू लागला. या गोष्टी मोठ्या अर्थपूर्ण आहेत. व्रतस्थ चरित्रकारांनी त्याच व्रतस्थ वृत्तीने आपापली आत्मचरित्रेही लिहावीत, अशी अपेक्षा करणे उचित ठरेल काय ? असे घडत राहिले, तर त्या आत्मचरित्रांचे मोल कदाचित चरित्राच्या चरित्रापेक्षाही मोठे ठरेल, असे वाटते. खरे तर चरित्रकारांचे चरित्र लिहिण्यास स्वातंत्र्योत्तर मराठी चरित्रवाङ्मयाने खूपच संधी उपलब्ध करून दिलेली आहे.

प्रायोजित चरित्रलेखनही, अल्प प्रमाणात का होईना, स्वातंत्र्योत्तर कालखंडात झालेले आहे. निकटच्या कुटुंबियांनी किंवा वारसदारांनी आपल्या कुटुंबातील कर्तबगारांची चरित्रे लिहिली आहेत. शं. वा. किर्लोस्करांचे 'यांत्रिकाची यात्रा', दुर्गा भागवतांचे 'राजारामशास्त्री भागवत, वीणा देवांचे 'आशक मस्त फकीर इ. छोट्या-मोठ्या चरित्रकृती या संदर्भात आठवतात. या प्रकारचे हक्काचे चरित्रकार सर्वच कर्तबगारांना लाभतात असे नव्हे. त्याचप्रमाणे स्वेच्छाप्रेरित चरित्रकार या कामी पुढे येतीलच असे नाही. या परिस्थितीतूनच बहुधा प्रायोजित चरित्रलेखन निर्माण होत असावे. (उदा; खानोलकरांचे 'वालचंद हिराचंद' हे चरित्र) पण एवढेच नाही. हक्काचे कुटुंबीय चरित्रकार आणि स्नेहातील प्रायोजित



अनुक्रमणिका






चरित्रकार या दोनही सुविधा अनेकांना उपलब्ध नसतात. कदाचित या परिस्थितीचाही काहीएक प्रभाव मराठी आत्मचरित्रांच्या उदंड निर्मितीवर असावा, असे वाटते. या निरीक्षणातून आत्मचरित्रांचा व आत्मचरित्रकारांचा अधिक्षेप करण्याचा मुळीच उद्देश नाही. आपापल्या छोट्यामोठ्या क्षेत्रात कर्तृत्व दाखविणारे लहानथोर समाजात असतात, तथापि त्यांची समुचित दखल अनेक कारणांनी समाजाकडून घेतली जात नाही. या संदर्भात आचार्य अत्र्यांच्या पत्रकारितेची आठवण होते : वाढदिवस, पुस्तक प्रकाशने, सामाजिक, राष्ट्रीय व वाङ्मयीन समारंभ, सोहळे आणि सणवार, ऐतिहासिक महत्त्वाचे दिनविशेष, जयंत्या आणि पुण्यतिथ्या इत्यादी अनेक प्रकारच्या निमित्तांनी आचार्य अत्रे लहानथोरांचा परिचय आपल्या वाचकांना करून देत. समाजाची स्मृती व संवेदनक्षमता क्षीण असते व म्हणून लहानमोठ्या कर्तृत्ववान व्यक्तींची ओळख व आठवण समाजाला वारंवार करून देण्याची गरज असते असे त्यांचे म्हणणे असे. हा दृष्टिकोन मोठा अर्थपूर्ण आहे.

चरित्रात्मक कथाकादंबऱ्या या चरित्रात्मक सर्जनशीलतेच्या एका विकसित अंगाचेच अपत्य होत. चरित्रलेखनाच्या रूढ मंत्रतंत्रातील काही बोचक मर्यादा या नव्या वाटेच्या मुळाशी असणे शक्य आहे. कथाकादंबऱ्यांच्या रूढ निर्मितीसंबंधीचे काहीएक असमाधानही त्या वळणामागे असणे शक्य आहे. चरित्रलेखनातील वस्तुनिष्ठतेचे व वास्तवतेचे निकष कदाचित सर्जनशील कल्पनाशक्तीचा ऱ्हास घडवून आणतात, याची जाणीव तिथे असावी! किंवहुना कथाकादंबऱ्यांसारख्या कल्पित निर्मितीमधून कल्पनाशक्तीचे बोचरे कल्पनादारिद्र्य जाणवलेले असावे. चांगल्या चरित्रात्मक कथाकादंबऱ्यांना चांगला चरित्रकार व चांगला कादंबरीकार या दुहेरी भूमिका चांगल्या प्रकारे पेलणाऱ्या निर्मात्याची गरज असते. असे नसेल, तर मग एकतर चरित्राची कादंबरीच होते किंवा कादंबरीचे चरित्र तरी होते आणि परिणामत: चरित्रात्मक कादंबरी फक्त नाममात्र ठरते.

चरित्रात्मक कादंबरी इतिहासबाह्य अशा पौराणिक चरित्रनायकांच्या बाबतीत मात्र काहीशी यशस्वी व बरीचशी लोकप्रिय ठरल्याचे दिसून येते. 'ययाती' व 'मृत्युंजय' या साहित्यकृती या संदर्भात उल्लेखनीय ठरतात. या प्रकारचे यश व लोकप्रियता 'दुर्दम्य' सारख्या चरित्रात्मक कादंबरीला का मिळू नये, हा सूक्ष्म अभ्यासाचा विषय आहे व तसा काहीसा अभ्यास झालेलाही आहे. चरित्रलेखन, कादंबरीलेखन आणि लो. टिळकांविषयी विशुद्ध अशी भक्ती किंवा विरोध भक्ती यांचे संकलित संपादित बळ दुर्दम्यला लाभले नाही, एवढेच म्हणता येईल.

मात्र स्वातंत्र्योत्तर कालखंडातील व्यक्तिमूल्यांचा प्रभाव, सांस्कृतिक-सामाजिक परिवर्तनाचे तेवढेच प्रभावी दडपण, प्रत्यक्षाचे वा वास्तवाचे अतिसंवेदन व यातून कळत-नकळतपणे होत राहणारी सर्जक कल्पनाशक्तीची गळचेपी अशा सर्व उलटसुलट प्रभावांचा रोख चरित्रात्मक कादंबरीची दुर्दम्य गरज अधोरेखित करण्याकडेच आहे. व्यक्तिचरित्राचे खरेखुरे रहस्य पूर्णपणे प्रत्यक्षात नाही आणि प्रत्यक्षाचे दुसरे स्वरूप परोक्षातही असते, या प्रकारच्या चरित्रात्मक जाणिवेचा प्रभाव नव्या प्रकारच्या चरित्रात्मक कादंबरीच्या इष्टतेचा

निदर्शक आहे. चरित्रलेखनाची सत्यता चरित्रनायकाच्या जीवनाची एकात्म अर्थपूर्ण लय दाखविण्यात वा ऐकविण्यात असावी! चरित्रात्मक कादंबरीचा रोख या प्रकारची लय टिपण्याकडे असतो. निखळ चरित्रलेखन हेदेखील तशाच रोखाने जात असते; परंतु या वाटचालीत त्याला लाभलेली शिदोरी ही चरित्रात्मक कादंबरीलेखनापेक्षा कमी असते. यापुढील चरित्रकारांना आणि कादंबरीकारांना स्वातंत्र्योत्तर मराठी चरित्रवाङ्मयाने दिलेले मोठेच आव्हान म्हणजे चरित्रात्मक कादंबरी होय. चरित्रवाङ्मयाचा विकास घडवून आणणारे हे आव्हान आपण स्वीकारणार काय?

रेखाचित्रात्मक स्फुट स्वरूपाचे व्यक्तिदर्शन ही स्वातंत्र्योत्तर काळातील एक वाढती व वाचकप्रिय अशी चरित्रवाङ्मयाची शाखा आहे. व्यक्तिचरित्रातील वाढत्या कुतूहलाची व व्यक्तिमूल्याच्या विकसनशील जाणिवेची ती निदर्शक आहे. आवडती माणसे, आठवणीतील व्यक्ती, जगावेगळी नादिष्ट-छांदिष्ट माणसे इत्यादींच्या रेखाचित्रणाबरोबरच विविध क्षेत्रांतील नामवंतांच्या आचारविचारांची मार्मिक निरीक्षणे नोंदविणारा हा लेखनप्रकार आहे. विशेषत: राजकीय नेते, सामाजिक कार्यकर्ते, लेखक व कवी, शिक्षक-प्राध्यापक व पत्रकार यांचा प्रत्यक्ष सहवास व संबंध या प्रकारच्या लेखनास प्रेरक ठरतो. संबंधित व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचे, विचारांचे, कार्याचे वा साहित्यनिर्मितीचे बारीकसारीक पण अर्थपूर्ण पैलू या लेखनातून दाखवलेले असतात. मार्मिक अवलोकन, वेधक कल्पनाशक्ती व मूल्यलक्ष्यी चिंतन यांच्या बळावर ही रेखाचित्रे चरित्रवाङ्मयाचे सांगाती ठरतात. एक प्रकारे चरित्रवाङ्मयाच्या लघुकथा असेही त्यांना म्हणता येईल. कथात्मक वा ललित लेखात्मक चरित्रलेखन असेच त्यांचे प्राधान्याने स्वरूप असते. व्यक्तिजीवनाच्या काहीएक सत्यता विजेरीच्या झोताप्रमाणे झटकन व लखकन उजळून टाकण्याचे कार्य या प्रकारच्या लेखनातून होऊ शकते. एखादा झोत व्यक्तिजीवनाचे समग्र मर्मरूपच साक्षात्कारित करणाराही असू शकतो. चरित्रलेखनास उद्युक्त करण्यास आणि त्यास वास्तव स्वरूपाची सूचक साधने पुरविण्यास या रेखाचित्रांचा उपयोग होतो. या रेखाचित्रांत रमलेला वाचक कळत-नकळतपणे चरित्रवाङ्मयाच्या दिशेने वळतो. एकाच व्यक्तीच्या आठवणींनी जशी चरित्रलेखनाची एक दिशा उजळली जाते; तशीच अनेक व्यक्तींच्या आठवणींनीदेखील चरित्रलेखन संपन्न होऊ शकते. या संदर्भात पुण्याच्या 'विशाखा' या वार्षिकातील भालजी पेंढारकरांसारख्या ज्येष्ठ-श्रेष्ठ चित्रपटमहर्षीचे अनेकांच्या आठवणींनी साकारलेले चरित्र उल्लेखनीय आहे. आठवणीतील अण्णा-गदिमा आणि अत्रे या प्रयोगांचाही या संदर्भात उल्लेख करता येईल.

व्यक्तिजीवनाची ही अनुभवचित्रे प्राधान्याने साहित्यिकांपुरती सीमित झाल्यासारखी दिसली, तरी या कक्षेतून बाहेर पडण्याचा प्रयत्नही होत असल्याचे दिसून येते. लेखनविषयांच्या कक्षा बहुक्षेत्रीय होण्यासाठी बहुक्षेत्रीय लेखकवर्गाचीही गरज असते. स्वातंत्र्योत्तर काळातील आत्मचरित्राच्या प्रवाहाने बहुक्षेत्रीय लेखकवर्ग निर्माण करण्याचे महत्त्वाचे काम पार पाडले आहे. चरित्रवाङ्मयाच्या प्रवाहाला हे कार्य अद्यापि पुरेशा समाधानकारकपणे करता आलेले नाही. परंतु 'श्रद्धांजली' सारख्या (विनय हर्डीकर)

व्यक्तिदर्शनपर पुस्तकांतून बहुक्षेत्रीय अनुभव घेणारा लेखक भेटतो. तथापि बहुक्षेत्रानुभव असणाऱ्या एका लेखकापेक्षा अनेक क्षेत्रांतील अनेक लेखक असणे, ही चरित्रवाङ्मयाच्या नव्या शाखेची अधिक महत्वाची गरज आहे.

रेखाचित्रात्मक स्फुट चरित्रलेखन सामान्यपणे नैमित्तिक प्रेरणांनी निर्माण होते. तथापि समकालीन व निकटपूर्वकालीन अशा सहवासप्राप्त नामवंतांचे उद्बोधक दर्शन घडवणे म्हणजे चरित्रवाङ्मयच केवळ नव्हे; तर समाज व संस्कृती यांच्याही दृष्टीने एक विश्वसनीय व अर्थपूर्ण मानवी दस्तऐवज घडवणे, असे ठरते. त्यातून मानवतावादी सांस्कृतिक भानच प्रकट होते व जपले जाते. सुसंस्कृत इहवादी जीवनशैलीचेच हे निदर्शक आणि सुसंस्कृत समाजाचे लक्षणही आहे. या वस्तुस्थितीची जाणीव ठेवणे चरित्रवाङ्मयाच्या दृष्टीने तर आवश्यकच म्हटले पाहिजे. विद्याधर पुंडलीक, रवींद्र पिंगे, शांता शेळके, चंद्रकांत पाटील, रामदास भटकळ, चंद्रकांत वर्तक यांसारखे अनेक लेखक या साहित्यप्रकारात रमलेले व रमवणारे म्हणून उल्लेखिता येतील.

**छायाचित्रात्मक व्यक्तिदर्शन :**

स्वातंत्र्योत्तर चरित्रवाङ्मयातील एक आगळावेगळा प्रयोग म्हणजे छायाचित्रात्मक सटीप व्यक्तिदर्शन ! मौज प्रकाशनाने श्रेष्ठ लेखक पु. ल. देशपांडे यांच्यावरील या प्रकारचे प्रकाशन सिद्ध केले आहे. स्वत:ची व स्वकीयांची छायाचित्रे व त्यांचे जतन केलेले आल्बम हे आधुनिक हौशी जीवनशैलींचे एक लक्षणच म्हटले पाहिजे. रूढ भाषेऐवजी छायाचित्रांच्या माध्यमातून घडणाऱ्या या प्रकारच्या चरित्रदर्शनातून, 'चित्रे छान पण चरित्र म्लान', असा प्रत्यय कुणाला येतो; तर अनेकांना हा सगळाच आल्बमी चरित्रावतार उथळ व हास्यास्पद वाटतो. तसेच पाहिले तर व्यक्तिचरित्राविषयी असणारे एका वेगळ्या रंगरूपाचे माणसाचे कुतूहल छायाचित्रात्मक व्यक्तिदर्शन परिपूर्ण करीत असते. साचेबंद संवेदनशीलतेला मात्र हा प्रकार रूचणारा नाही हे जसे खरे; त्याचप्रमाणे संवेदनशीलतेची जडता दूर करणाऱ्या नव्या उपक्रमांचे स्वागत करणे, ही बाबही तितकीच खरी व महत्त्वाची आहे.

**निसर्गसृष्टीतील सजीवांची चरित्रे :**

माणसाने निर्माण केलेल्या माणसाच्या चरित्रवाङ्मयासंबंधी बोलताना एका वेगळ्या चरित्राविषयाकडे मनाचे लक्ष वेधले जात आहे हा वेगळा चरित्रविषय म्हणजे या निसर्गसृष्टीतील सजीवांचा, वृक्ष, वेली, पशू, पक्षी इत्यादींचा ! मनुष्य आणि हे सर्व सजीव वर्षानुवर्षे एका जीवपोषक पर्यावरणीय अधिवासात (इकोसिस्टिममध्ये) सहजीवन (सिम्बॉयसिस) कंठत आले आहेत. निसर्गातील व मानवी सहवासातील या सजीवांनाही जन्म-जीवन-मरणाचे एक अर्थपूर्ण चरित्र असते. 'मी जेनी', (अनंतराव कुलकर्णी), माऊली (आनंद यादव), सत्तांतर (व्यंकटेश माडगूळकर), गहिरं (अरविंद गोखले), सर्ज्या (शिंदे) इत्यादी साहित्यकृतींनी या सजीवांच्या चरित्रकहाण्या साकारल्या आहेत. कदाचित त्यांचे स्वरूप चरित्रात्मक कादंबऱ्या असेही आहे. या पशुपक्ष्यांना, वृक्षवेलींना कल्पित नव्हे, तर प्रत्यक्षातील चरित्रलेखनाचे विषय करणे शक्य नाही काय ? निसर्ग व



अनुक्रमणिका

मानव यांच्यातील निकट नात्याचे नवे पर्यावरणीय भान निर्माण झाले आहे. 'सर्ज्या' सारखी चरित्रलेखने म्हणूनच इत:पर अपेक्षित आहेत.

**अक्षर चरित्रकृती :**

अक्षर ठरणाऱ्या चरित्रकृती, चरित्रकार व चरित्रनायक यांचा खात्रीचा सूत्रपाठ उपलब्ध नाही आणि कधी काळी तो उपलब्ध होईलसे वाटत नाही. या संदर्भात परदेशी चरित्रकृती व चरित्रकार पाहण्यास प्रतिबंध नाहीच; तथापि आपली प्रदीर्घ देशी परंपरा नव्या वाङ्मयीन जाणिवांच्या व ज्ञानविज्ञानांच्या प्रकाशात सूक्ष्मपणे व समग्रपणे समजून घेणे हे अधिक महत्त्वाचे आहे. या परंपरेचे सांस्कृतिक पोत नीटपणे समजून घेण्याचीही गरज आहे. अनेक प्रकारचे अंतर्गत देशी प्रभाव व वहिर्गत विदेशी प्रभाव यांच्या अखंड आदानप्रदानातून येथील सांस्कृतिक कर्तृत्व व कर्तृत्ववान निपजले आहेत. देशी संस्कृतीच्या सम्यक ज्ञानावाचून आपल्या मानवी कर्तृत्वाचे व कर्तृत्ववानांचे अक्षर चरित्रवाङ्मय निर्माण होणे कठीण आहे. अक्षरत्व मुळात समाजविशिष्ट व संस्कृतिविशिष्टच असते, त्याची विश्वात्मकता आनुषंगिक व अनेकदा अपघाती योगांनी प्रत्ययास येते.

**व्यक्तिजीवनाची सत्यता :**

व्यक्तिजीवनाची सर्वात मोठी व सर्वमान्य असू शकणारी सत्यता म्हणजे तिचे खरेखुरे जगणे, तिचे जगण्याचे चैतन्य, तिची कुडी आणि आत्मा यांतून भरभरणारी, झिरपणारी जीवनोर्मी ! तिची मांसलता आणि मानसिकता यांची कंपायमान स्पंदने ! व्यक्तीचे हे अंतर्बाह्य चैतन्य प्रतीत करून देणे, हेच खरे तर चरित्राचे आद्य व अंतिम उद्दिष्ट असते. व्यक्तिजीवनातील जैविक चैतन्याची जाणवणारी व प्रकटणारी लयतत्त्वे चरित्रघटनांतून प्रकट करीत जाणे, हेच चरित्रवाङ्मयाच्या सौंदर्यशास्त्राचे आणि नीतिशास्त्राचे अधिष्ठान आहे. प्रत्यक्षात आपल्या जगण्यातील विघडलेली लय वा हरवलेला स्वर हा प्रचितीचा विषय ठरतो. चरित्रवाङ्मयातील विघडलेली लय किंवा हरवलेला स्वर त्याप्रमाणेच प्रतीतिगम्य असतो. पण या प्रकारच्या प्रचितीची सखोल मीमांसा करणारी चरित्रवाङ्मयाची समीक्षा आपल्याजवळ नाही. अशी समीक्षाही लवकरच निर्माण होईल, याची मला तरी खात्री वाटते.

**कांचनमृग :**

चरित्रलेखक हा सतत कांचनमृगाची भुलावण व मारिचाच्या फसव्या हाका यांच्या तावडीत सापडलेला असतो. इतिहासपुरुष असलेला चरित्रनायक त्याला इतिहासमीमांसेत गुंतवू पाहतो, राष्ट्रीय चरित्रनायक त्याला राजकीय वादविवादात डांबून ठेवतो, लेखककवी साहित्यक्षेत्री बंदिस्त करतात, कलावंत कलामीमांसेत व्यग्र करतात, साधुसंत धर्माचे व अध्यात्माचे साकडे घालतात, कार्यकर्ते कार्यचर्चेत ओढतात. चरित्रनायकाच्या कार्यकर्तृत्वाचे हे चकचकते सुवर्णरूप महत्त्वाचे असतेच; पण ते त्याच्या एकूण जीवनलयीचे घटक आहेत, घाट नव्हे, याचे भान राखावे लागते. चरित्रलेखनातील या भानाच्या उपस्थितीची वा अनुपस्थितीची जाणीव मात्र वाचकाला झाल्याशिवाय राहात नाही. सत्य हे या सुवर्णरूपांचेच केवळ असून भागत नाही, ते समग्र जीवनलयीचेही सत्य असावे लागते.

**आजउद्याची समस्या**

चरित्रवाङ्‌मयातील गताचे सत्य व वर्तमानाचे तारतम्य या व्हॉल्टेअरच्या सूत्राजवळ पुन्हा परतावे लागते, ते विद्यमान सांस्कृतिक पर्यावरणाच्या संदर्भात ! आपल्या विद्यमान समाजाला व संस्कृतीला भूतकाळाच्या सत्याची व वर्तमानाच्या तारतम्याची खरोखरच निकड जाणवते काय ? या प्रश्नाचे उत्तर सर्वांनीच आपापल्या परीने शोधले पाहिजे. विशेषत: चरित्रकारांनी आणि ज्या समाजासाठी ते चरित्रनिर्मिती करतात, त्या समाजानेही या प्रश्नाचा वेध घेतला पाहिजे. आपला भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ हे सर्वच काळ सत्यनिष्ठेपेक्षा तारतम्यानेच समजावून घेण्यादेण्याकडे विद्यमान प्रवृत्ती आहे आणि या तारतम्याविवेकाचे अधिष्ठान तात्कालिक फायदेतोटे हेच आहे. आजउद्याच्या मराठी चरित्रकारांना या वास्तवाशीही पहिला सामना खेळावा लागेल, असे मला वाटते. आणखी एक : प्रत्येक पिढीचे स्वत:चे व स्वतंत्र चरित्रकार व चरित्रकृती असणे, हे प्रगत समाजाचे एक लक्षण असते. यासाठी अर्थातच प्रत्येक पिढीजवळ स्वत:चे व स्वतंत्र मूल्यभान असणे आवश्यक असते. मूर्तिपूजन व मूर्तिभंजन या दोनच टोकांत हिंदकळणारे सांस्कृतिक मूल्यभान हे कितपत स्वत:चे व स्वकाळाचे आहे, हेही आजउद्याच्या चरित्रकारांना ठरवावे लागेल.

□

प्रा. रा. ग. जाधव
११८० सदाशिव पेठ, अनपट बिल्डिंग, पुणे ४११ ०३०.





अनुक्रमणिका






# प्रा. न. र. फाटक आणि अ. का. प्रियोळकर यांचे चरित्रलेखन

डॉ. सौ. मृणालिनी पोतनीस

कै. प्रा. न. र. फाटकांनी लिहिलेली आणि विशेष गाजलेली अशी जी तीन महत्त्वाची चरित्रे आहेत त्या न्या. रानडे, गोखले आणि टिळक या तीनही थोर व्यक्तींनी जवळजवळ एकच कालखंड स्वकर्तृत्वाने गाजवला. इंग्रजी अंमलाने स्तिमित आणि दिङ्मूढ होण्याचा अव्वल इंग्रजी काळ मागे पडला आणि प्रबोधन काळाची सुरुवात झाली, तो हा कालखंड. (इ. स. १८७५ ते १९२०) एकूणच समाजात विचारमंथन वेगात सुरू झाले होते. बालविवाह, विधवांचे केशवपन, सती, हुंडा अशा दुष्ट चालीरीती, सर्वत्र पसरलेले घोर अज्ञान, स्पृश्यास्पृश्यतेचा अतिरेक, स्त्रीशिक्षणाला, स्त्रियांच्या पुनर्विवाहाला बंदी, स्त्रीची सगळ्या बाजूंनी होणारी कोंडी असे समाजप्रगतीला खुंटवणारे कितीतरी समज-गैरसमज, परकीय अंमलाने कंगाल बनू लागलेला देश आणि मिशनऱ्यांचा वाढता ख्रिश्चन धर्मप्रसार यातून देशाला वाचविण्यासाठी ज्या अनेक विचारवंतांनी आपल्या सर्वंकष बुद्धीच्या जोरावर आणि देशहिताविषयी वाटणाऱ्या सच्च्या तळमळीतून कार्य केले त्यांपैकीच या तीन थोर महान व्यक्ती होत.

न. र. फाटकांनी लिहिलेल्या चरित्रापूर्वी रानड्यांची तीनचार इंग्रजी, मराठी चरित्रे प्रसिद्ध झाली होती. परंतु ती त्रोटक असल्याने न्यायमूर्तींच्या श्रेष्ठतम व्यक्तित्त्वाचा चौफेर विचार त्यात होऊ शकलेला नाही. रानड्यांचेच चरित्र ज्यातून मुख्यत्त्वे साकार होते ते रमाबाईंचे आत्मचरित्र कितीही हृदयंगम, रसाळ आणि सत्याधारित असले तरी समाजाच्या विविध क्षेत्रात ज्यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा खोल ठसा उमटवला तो तितका समर्थपणे या छोट्याशा आत्मवृत्तात व्यक्त होत नाही. त्यांचे समग्र कार्य समाजापुढे येणे फाटकांना जेवढे आवश्यक वाटले तेवढेच त्यांचे दूरगामी विचार, समाजाला घेऊन पुढे जाण्याची त्यांची कार्यपद्धती पुढील काळातही मार्गदर्शक होईल याची फाटकांना खात्री वाटली.

'बरीच वर्षे लांबणीवर पडलेले हे पुण्यकर्म न. र. फाटकांनी भक्तियुक्त अंत:करणाने, आस्थापूर्वक आणि पुष्कळ परिश्रम घेऊन तडीस नेले.' म्हणून रमाबाईंनी प्रस्तावनेत विशेष आनंद व्यक्त केला आहे. रमाबाई या चरित्राचे वैशिष्ट्य सांगताना रानड्यांचे विशेषत्व दाखवणारी यथातथ्य










माहिती, विश्वसनीयता आणि चटकदारपणा यांचा उल्लेख आवर्जून करतात.

प्रा. फाटकांनी या चरित्रासाठी जी माहिती गोळा केली त्यासाठी भरपूर श्रम केलेले दिसतात. रानडेकालीन विविध वृत्तपत्रे, डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनचे अहवाल आणि बॉम्बे एज्युकेशनचे रेकॉर्ड, सार्वजनिक सभेचे अंक, सोशल कॉन्फरन्सचे रिपोर्ट, विविध ज्ञानविस्ताराचे अंक, रानड्यांशी संबंधित व्यक्तींची चरित्रे किंवा आठवणी, नोंदी यांचा उपयोग त्यांनी केला.

माधवरावांचे बालपण, शैक्षणिक जीवन चितारताना माधवरावांच्या कुशाग्र बुद्धीचा, अभ्यासू वृत्तीचा, चिंतनशीलतेचा उल्लेख प्रा. फाटक वरचेवर करतात. त्याचवेळी तत्कालीन अभ्यासक्रम, बुद्धिमान मुलांच्या गुणांना वाव देणारा, प्रोत्साहन देणारा अध्यापक वर्ग याबद्दलही लिहितात. असेच उल्लेख गोखले व टिळक यांच्याही चरित्रात आले आहेत. बालपणीच्या घटनांना किंवा कुलवृत्तांताला तीनही चरित्रात प्रा. फाटक फार मोठे स्थान देत नाहीत. चरित्रव्यक्तीच्या कर्तृत्वाचे परिशीलन मात्र अधिक विस्ताराने आणि कसोशीने करतात.

आईच्या मृत्यूनंतर वडिलांनी तावडतोब केलेले दुसरे लग्न, स्वतः माधवरावांचा अवघ्या बाराव्या वर्षी झालेला विवाह, बालवयात वैधव्य आलेली बहीण हे सारे प्रसंग तत्कालीन समाजव्यवस्थेवर प्रकाश टाकत असल्याचे लेखकाला जाणवते.

माधवरावांनी विद्यार्जन आणि अध्यापन या दोहोंसाठी घेतलेले अविश्रांत श्रम, क्रमिक पुस्तकांव्यतिरिक्त चिकाटीने केलेले अवांतर अफाट वाचन, स्वतःच्या विद्यार्थ्यांतही अशा वाचनाची गोडी निर्माण करण्याचे प्रयत्न, बुद्धीचा व्यापक आणि खोल उपयोग, गुरुजनांचा संपादलेला लोभ, अध्यापन कौशल्याबद्दल वेळोवेळी वार्षिक अहवालात आलेले स्तुतीपर रिपोर्ट यांचे फाटकांनी केलेले कितीतरी साधार उल्लेख रानड्यांच्या ज्ञानपिपासू आणि ज्ञानदानात अग्रणी अशा व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकतात.

न्यायमूर्तींची रूपवैशिष्ट्ये, गुण-वैशिष्ट्ये, स्वभाववैशिष्ट्ये सांगताना प्रा. फाटक समकालीन जबाबदार व्यक्तींच्या लेखांचे, आठवणींचे दाखले देतात. माधवरावांच्या इंग्रजी व मराठी भाषेतल्या अस्खलित व चित्तहारी भाषणांचे श्री. मलबारींनी केलेले सविस्तर वर्णन श्री. फाटकांनी चरित्रात दिले आहे. श्री. रानड्यांचे विविध पैलू उलगडून दाखवण्यासाठी प्रा. फाटकांनी उपयोजलेली ही युक्ती वाचकाला माधवरावांच्या काळात ओढून नेते.

न्या. माधवरावांच्या प्रथम पत्नीचे निधन झाल्यानंतर वडिलांच्या इच्छेने त्यांनी तेरा वर्षाच्या रमेशी वयाच्या बत्तीसाव्या वर्षी लग्न केले. या लग्नाने त्यांना तत्त्वच्युतीच्या दोषारोपाच्या गदारोळात ढकलून दिले. प्रा. फाटकांनी मात्र चरित्रनायकाला फारसा दोष न देता त्यांना चरित्र लिहिताना सावरून घेतलेले दिसते.

इंदुप्रकाशातून माधवरावांनी सर्वांगीण सुधारणेचा उपदेश मोठ्या प्रमाणात केला. सार्वजनिक सभा, विधवा विवाहोत्तेजक सभा, प्रार्थनासमाज आदी संस्थांद्वारे त्यांनी

अनुक्रमणिका






आपले सुधारणावादी सामाजिक विचार, प्रार्थनावादी धार्मिक विचार, शिक्षण-विषयक नवा दृष्टिकोन जनतेपर्यंत पोचवण्याचे काम अव्याहत केले. पुराणमतवाद्यांचा त्याकाळी जो सतत विरोध या सुधारकांना होत होता त्याचे चित्रणही लेखकाने सविस्तर केले आहे. आणि त्याकाळी गाजलेल्या सामाजिक सुधारणा-विषयक वादांना चरित्रातून मूर्तरूप दिले.

कायमधारापद्धत, मध्य आशियातील प्रश्न, देवस्थानांची व्यवस्था, देशी संस्थांनांचा कारभार, इलबर्ट विल, संमतिवयाचा कायदा, बडोद्याच्या महाराजांची पदच्युती, सावकार-शेतकऱ्यांचे दंगे, स्वामी दयानंद सरस्वतींच्या मिरवणूक प्रसंगी घातलेला गदारोळ वगैरे घटनांचा तपशीलवार परामर्श न. र. फाटकांनी घेऊन माधवरावांची त्या त्या प्रकरणातील भूमिका स्पष्ट केली आहे. समाजकार्यधुरीणाचे चरित्र लिहिताना त्याच्या कार्यामागच्या घटनांचे तपशील दिल्याशिवाय कार्यकारणभावाचे आकलन होणे कठीण आहे. प्रत्येक घटनेत माधवरावांच्या शांत, विचारी, विवेकी वृत्तीने घेतलेले निर्णय समाजसुधारणेचे पाऊल पुढे पाडण्यास कसे कारण झाले किंवा शासनाचे कोठे चुकते हे निर्भीडपणे पण विवेकी वृत्तीने दाखवून देताना माधवरावांच्या मोठेपणाचे प्रत्यंतर कसे येते ते या चरित्रात दिसते.

राज्यसुधारणा आणि जबाबदार राज्यपद्धती घडवून आणण्यासाठी प्रागतिक, सनदशीर राजकारणाचा पाया माधवरावांनी घातला. पहिल्या फिमेल हायस्कूलच्या उभारणीला केलेले सहाय्य, पं. रमाबाईंच्या शारदासदनाला दिलेला पाठिंवा आदींचा उहापोह फाटकांनी चरित्रात विस्ताराने केला आहे. जेणेकरून आजच्या वाचकालाही त्यावेळच्या प्रश्नांचे, घटनांचे स्वरूप स्पष्ट व्हावे, प्रत्येक सार्वजनिक विषयावर रानड्यांची जागरूक नजर असे. चिंतन, विचारमंथन आणि त्यातून परिपक्व झालेले आपले विचार लेख आणि भाषणांमधून निर्भीडपणे जनतेपर्यंत, शासनापर्यंत पोचवण्याचे अखंड घेतलेले व्रत म्हणजे माधवराव हे समीकरण वाचकांच्या मनात या चरित्रावरून पक्के होते.

प्रा. न. र. फाटकांनी लिहिलेले दुसरे चरित्र ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचे. गोखले न्यायमूर्तींना गुरूस्थानी मानीत आणि त्यांच्याप्रमाणे सामाजिक सभेमार्फत सामाजिक सुधारणा आणि राजकीय हक्क सनदशीर मार्गाने प्राप्त करून घेण्यासाठी झटत. म. गांधींचे गुरु असलेले गोपाळराव भारत सेवक समाजाचे (सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी) आद्य प्रवर्तक होते.

'माझे चरित्र किंवा स्मारक नको' या गोपाळरावांच्या अंतिम इच्छेप्रमाणे चरित्रलेखन हे सोसायटीचे काम नव्हे असे सांगणारे काही सभासद असले तरीही त्यांच्या कामाची ओळख पुढील पिढीला व्हावी अशी मनापासून इच्छा असणाऱ्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीने हे काम न्या. रानड्यांच्या चरित्रनिर्मितीनंतर प्रा. न. र. फाटकांकडे सोपवले. रानड्यांच्या चरित्रलेखनाच्या वेळी माहिती गोळा करीत असतानाच ना. गोपाळ कृष्ण गोखले आणि लो. टिळक यांच्या चरित्रलेखनालाही पूरक

अशी कितीतरी माहिती त्यांच्याजवळ जमत होती. इ. स. १९२५ च्या अखेरीस गोपाळरावांच्या चरित्राची बरीच प्रकरणे लिहून झाली पण आर्यभूषण छापखान्याला लागलेल्या आगीत ती भस्मसात झाली. त्याबरोबर त्या चरित्रासमवेत सगळे संदर्भही जळून गेले. नंतर इतरांनी लिहिलेली अनेक चरित्रे जिज्ञासापूर्ती करणारी नव्हती. स्नेह्यांच्या दीर्घकाळ मागे लागण्याने आणि संदर्भही जमू लागल्याने गोपाळरावांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने प्रस्तुत लेखकाने लेखनाला प्रारंभ केला आणि इ. स. १९६७ मध्ये चरित्राची पहिली आवृत्ती प्रसिद्ध झाली.

माणुसकी व शीलसंवर्धन याला महत्त्व देणारे गोखले राजकारणात धर्माभिमाणांची लुडबुड नको असे ठामपणे म्हणत. जातीधर्मविरहित संपूर्ण समाजाची धारणा होण्यासाठी जनता पुरेशी साक्षर व सज्ञान असली पाहिजे अशा मताचे ते असल्याने शिक्षणाचे पुरस्कर्तेही होते. उन्नत समाजाची मानसिकता कशी असावी यासंबंधी गोपाळरावांच्या विचारांचा मोठेपणा हेरण्यात लेखकाची वैचारिक पातळी जाणवते. सोसायटीतील भांडणाच्या हीन स्वरूपा-बद्दलच्या उल्लेखाच्या संदर्भात न. र. फाटक टिळकांना दूषण देतात आणि लिहितात की- 'टिळकांच्या कज्जेकफावतीची सोसायटी-तल्या मंडळींना किळस आली होती.' लेखकाने लिहिलेल्या तीनही चरित्रात रानडे व गोखले यांना लेखक झुकते माप देताना दिसतात.

राज्यकारभारात हिंदी जनतेला जास्तीत जास्त वाव मिळावा यासाठी शिष्टाईला काँग्रेसतर्फे गोपाळराव १९०६ मध्ये इंग्लंडला गेले. विलायतेच्या मंडळींत भारतीय जनतेबद्दल विश्वास निर्माण करण्याचे कठीण काम गोखले प्रकृती बरी नसतानाही करीत होते. पण भारतातील जहालांचा पवित्रा त्यांचे जुळवीत आलेले काम मोडून टाकीत होता. इंग्लंडमध्ये जाऊन पार्लमेंटमध्ये भारतीयांवरील अन्यायांची दाद सनदशीर मार्गाने लावून घ्यावी, राज्यशासनात अधिकाधिक अधिकार भारतीयांनी प्राप्त करून घ्यावे यासाठी त्यांची सारखी धडपड चालू होती. शासनाची अडचण व लोकांची गरज या दोन्ही बाजूंवर लक्ष ठेवून दोन्ही बाजूंना सूचना देणे, जी बाजू निश्चित पटेल ती बाजू विरुद्ध बाजूला पटवून देणे, शासनाचा खर्च कमी व्हावा म्हणून निरनिराळी खाती विचारात घेऊन कपात सुचवणे हे काम गोखल्यांनी सतत केले. मोठ्या पगाराच्या युरोपियनांचा भरणा कमी करून हिंदी माणसे नेमल्यास मोठ्या खर्चाची गरज भासणार नाही. आणि बेकारीच्या असंतोषाला आळा बसेल या मताचा त्यांनी आग्रह धरला. हिंदी माणसांना काम करण्याची सवड द्या म्हणजे आपोआपच माणसे तयार होत जातील असे ते म्हणत. सक्तीच्या मोफत प्राथमिक शिक्षणाचा ठराव त्यांनी पुन्हा पुन्हा मांडला. लोकमत तयार होण्यासाठी जागोजाग भाषणे दिली. मोर्लेसाहेबांना वरचेवर भेटून भारतीयांच्या राजकीय आकांक्षा, बंगालच्या फाळणीचा अन्याय, पूर्व बंगाल मधील जुलूम त्यांच्या कानावर घातला. गोपाळरावांचे असे विविध स्तरांवरचे, वेळ खाणारे, कटकटीचे काम त्यांनी संयम ठेवून,

सनदशीर मार्गाने, किती कष्ट घेऊन केले याची कल्पना वाचकाला या ग्रंथावरून नक्कीच येते.

चैनीला फाटा असलेले कमी खर्चाचे राहणीमान आणि पोशाखातला साधेपणा हे या काळाचे व्यवच्छेदक लक्षण होते. त्यानुसारच या तिघांचाही पोशाख असे. ब्रिटिश राज्यकारभाराच्या अर्थव्यवस्थेचे आकलन त्यांना चांगले होते आणि त्यांची अर्थशास्त्रीय व्याख्याने विद्यार्थी वर्गाचे आकर्षण होती.

गोपाळरावांचे मराठी, मोडी, इंग्रजी हस्ताक्षराचे नमुने आणि अंत्यदर्शनाचा फोटो, चरित्रात हस्ताक्षर, पत्राचा नमुना आणि अनेक फोटो आहेत. चरित्रव्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश पडण्यास त्यांचे सहाय्य होते.

लो. टिळकांच्या चरित्राबाबतही मित्रांचा आग्रह हीच चरित्रलेखनामागची प्रमुख प्रेरणा आहे असे न. र. फाटक लिहितात. आणखीन एक कारण निवेदनाच्या अखेरीस लेखक देतात ते म्हणतात, 'टिळकांच्या खऱ्या थोरवी विषयी भरपूर आदर असूनही टिळकांनी जे जे केले ते सारेच बावनकशी शुद्ध होते, असे प्रस्तुत लेखकाच्या प्रत्ययास कधीच आले नाही व त्याप्रमाणेच त्याने टिळकांच्या काही कृतींचे विवेचन केले आहे.'

गोखले चरित्रात एकूण एकोणीस प्रकरणे व परिशिष्टे यांचा समावेश आहे तर टिळक चरित्रात एकूण तेवीस प्रकरणे असून दोन्हीत विषयवार कालानुक्रमे त्यांचा अंतर्भाव केला आहे. अभ्यासकाला सोईचे जाईल अशा तऱ्हेने प्रत्येक प्रकरणातील प्रमुख घटनांचे पानक्रमांक नोंदले आहेत.

टिळक, कॉलेजचे पहिले वर्ष तालमीत घालवतात आणि सुरुवातीचे किरकोळ शरीर मल्लासारखे कमावतात. लेखक या घटनेचा उल्लेख करून लिहितात- 'जे कार्य मनापासून पत्करले त्याची अंतिम सिद्धीपर्यंत पाठ सोडायची नाही हा टिळकांचा उपजत बाणा कॉलेजातही कायम होता.

टिळकांची आणि आगरकरांची मैत्री, डोंगरीच्या किल्ल्यावरची कैद आणि देशसेवेला वाहून घेण्याचा दोघांनी केलेला निश्चयही त्यांच्या उत्तरायुष्यातल्या कारकीर्दीची नांदी होती. सुधारणा की स्वातंत्र्य याबाबतीत घेतलेल्या टोकाच्या भूमिकांनी त्या दोघांत मरेपर्यंत वितुष्ट आले तरी आगरकरांच्या मृत्यूलेखात टिळक आगरकरांचा गौरवपूर्ण उल्लेख करतात. देशासाठी फार मोठ्या स्वार्थत्यागाला तयार असलेल्या या दोन तरुणांबद्दल रानडे लोकांना सांगतात की यांचा हिरमोड होऊ न देता त्यांना शक्य तेवढी मदतच करायला हवी.

गणेशोत्सव, शिवजयंती उत्सव साजरे करण्यामागे आपला धर्म, इतिहास यांविषयीचा आदर जनमानसात वृद्धिंगत करण्याचा त्यांचा हेतू होता. त्यातून राष्ट्रैक्य साधण्याचा टिळकांचा विचार होता. 'केसरी' मधून आलेल्या टिळकांच्या विविध लेखांचा, मतांचा परामर्श घेताना लेखक त्यातील उतारेच्या उतारे देऊन टिळकांनी केलेल्या लोकसंग्रहाच्या कार्याचे चित्र उभे करतात. कई महाराज प्रकरण, चिरोल प्रकरण, मॉंटेग्यू भेट, राजकीय हक्क पदरात पाडून घेण्यासाठी केलेले निर्भीड प्रयत्न,

सोसलेला कारावास, कॉंग्रेस प्रवेश अशा कितीतरी राजकीय, सामाजिक घटनांचा लेखकाने साद्यंत इतिहास लिहिला आहे. टिळकांच्या ग्रंथनिर्मितीचे उल्लेख करून लेखक थांबत नाहीत तर त्यातला विषय कशा तऱ्हेने मांडला आहे, टिळकांच्या बुद्धीचे विचारांचे दर्शन त्यातून कसकसे होते हे कितीतरी विस्ताराने लेखक लिहितो. मंडालेच्या तुरुंगात लिहिलेला आणि अतिशय मान्यता पावलेला 'गीतारहस्य' ग्रंथाचा परिचय विस्तृत विवेचनासह देऊन लेखक टिळकांच्या बुद्धीचे, स्मरणशक्तीचे, विषयमांडणीचे कौतुक करतात. टिळकांच्या कितीतरी गुणांना लेखकाने चरित्रात चांगला न्याय दिला आहे.

प्रा. न. र. फाटकांच्या चरित्रलेखनातील वैशिष्ट्यांचा एकत्रितपणे विचार केला तर अगदी प्रथम जाणवते ते त्यांनी गोळा केलेले संदर्भ. तत्कालीन वृत्तपत्रे, नियतकालिके, राजकीय कागदपत्रे, शैक्षणिक आर्थिक अहवाल, आधी झालेली चरित्रे-आत्मचरित्रे किंवा तत्कालीन राजकीय, सामाजिक संस्थांकडे असलेली माहिती, समकालिनांच्या आठवणी, पत्रसंग्रह, लेखसंग्रह, संकीर्ण नोंदी, तत्कालीन इंग्रज अधिकाऱ्यांची मते असे माहितीचे अनेक स्रोत जमवून, त्यांना काळजीपूर्वक अभ्यासून, त्यांची विश्वासार्हता तपासून लेखकाने टिपणे काढली. खुद्द चरित्रव्यक्तीने लिहिलेले लेख, दिलेली भाषणे, प्रसिद्ध झालेले ग्रंथ, झडलेले वाद यांचे बारकाईने वाचन, मनन, चिंतन करून स्वभाव गुणदोष जाणून घेतले. चरित्रनायकांच्या उक्ती आणि कृती यात कोठे विसंगती आढळते का, त्यांची तत्त्वनिष्ठा किती, कार्यनिष्ठा किती, कार्यसिद्धीसाठी श्रमले किती, कसे याचे सोदाहरण, साधार स्पष्टिकरण देता देता, चरित्रव्यक्ती त्याच्या व्यक्तिमत्त्वासह चरित्रातून खरीखुरी उभी राहील यासाठी लेखकाचा सतत प्रयत्न दिसतो. अंगिकारलेले कार्य आणि त्याच्या सिद्धीसाठी केलेल्या प्रयत्नात आलेल्या अडचणींना चरित्रव्यक्तीने कशाप्रकारे तोंड दिले, समाजाला कसे मार्गदर्शन केले, आपल्या कृतीने इष्ट हेतू कसा साध्य केला, किंवा त्यात कसे अपयश आले, झालेल्या पिछेहाटीतून पुन्हा उभे राहण्याचे कसे प्रयत्न केले याचे साद्यंत, साक्षात विवेचन लेखक करताना दिसतो. पाश्चात्य प्रगत देशाचा तुलनात्मक विचार या विचारवंतांनी कसा केला. केवळ वर्तमानच नव्हे तर आपल्या आणि पाश्चात्य देशांच्या इतिहासाचा डोळसपणे विचार करून देशपरिस्थितीवर घडलेले परिणाम त्यांनी कसे निरखले, द्रष्टेपणाने भविष्यकाळाचा विचार कसा केला याचा चरित्रकार सूक्ष्मदृष्टीने अभ्यास करताना दिसतो. विशेषत: स्वत: केलेल्या प्रत्येक विधानाची किंवा लिहिलेल्या घटनांची विश्वासार्हता दृढ करण्यासाठी त्या काळातल्या अनेक थोर, विश्वसनीय नेत्यांची, कार्यकर्त्यांची पत्रे, लेख, पुस्तके यातून ती माहिती उद्‌धृत करून ताडून पाहिली आहे. लिहित असलेल्या चरित्रात पुराव्यांच्या नोंदी करण्याचा लेखकाने कोठेही कंटाळा केलेला नाही. आणि हे सर्व करताना स्वत:ची स्वतंत्र बुद्धी वापरून चरित्रव्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाच्या अस्सल-कमअस्सल पणाचा वेध घेतला आहे.

एवढ्या बारकाव्यांसह केलेले लिखाण क्लिष्ट होऊ नये याचीही खबरदारी लेखक घेतो आणि पाचसहाशे पृष्ठांची ही मोठी चरित्रे कंटाळवाणी न करता वाचकाला त्या काळात ओढून नेतो. त्या थोर नेत्यांच्या समवेत फिरते ठेवतो. तो सगळा काळच जिवंत करतो आणि स्वत:च्या स्वतंत्र विचारशक्तीने त्या काळाचा, त्या व्यक्तीचा आणि त्या व्यक्तीच्या बाजूने किंवा विरोधात असणाऱ्या अन्य कितीतरी व्यक्तींच्या वैचारिक दृष्टिकोनांचा लाभ घडवतो. वाचकाच्या बुद्धिलाही प्रगल्भ बनवण्याचा प्रयत्न करतो.

जास्तीत जास्त माहिती देण्याच्या प्रयत्नातून पुनरुक्तीसारखे क्वचित आढळणारे दोष चरित्रकाराला मान्य आहेत तरीही भरपूर परिश्रमातून उभ्या राहिलेल्या या चरित्रांना लेखकाने एक वेगळीच उंची गाठून दिली आहे. या कालखंडाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला उत्कृष्ट संदर्भग्रंथ म्हणूनही या चरित्रांचा मोठ्या प्रमाणात लाभ घेता येईल.

□

रावबहादुर दादोबा पांडुरंग आणि डॉ. भाऊ दाजी लाड यांची चरित्रे प्रा. प्रियोळकरांनी लिहिली. आणि ती सर्वमान्य झाली. या दोन्ही व्यक्ती समकालीन, अव्वल इंग्रजी कालखंडातल्या आणि प्रतिकूल समाजपरिस्थितीत सुधारणावादी दृष्टिकोन बाळगणाऱ्या होत्या. दादोबांचे कार्य मुख्यत: शिक्षणक्षेत्रात झाले त्यामुळे त्यांच्या आत्मचरित्रात शिक्षणविषयक वैचारिक घडणीचे दर्शन होते. दादोबांनी इ. स. १८६८ साली आपले आत्मचरित्र लिहायला घेतले. इ. स. १८८२ पर्यंतचे उल्लेख अधूनमधून असले तरी १८७४ पर्यंतची हकीगत त्यात आली आहे. अंत:काळच्या आजारपणामुळे त्यांच्या हातून ते पूर्ण झाले नाही. प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी पुष्कळच परिश्रमाने चरित्राला आवश्यक असे सर्व कागदपत्रं, लेख, तत्कालीन नोंदी मिळवून, अभ्यास करून उत्कृष्ट चरित्रग्रंथ तयार केला. संबंधित व्यक्तींचे फोटो देऊन त्यांत चांगली भर घातली. या चरित्रलेखनाची प्रेरणा देण्याचे श्रेय रा. भास्करराव तर्खडकर यांना लेखक देतो आणि मुंबई युनिव्हर्सिटी, रॉयल एशियाटिक सोसायटी, पारशी पंचायत, प्रार्थनासमाज आणि विविध कॉलेजेस व ग्रंथालय यांनी उपयुक्त माहिती पुरविल्याबद्दल तेथील अधिकाऱ्यांचे आभार मानतो.

दादोबांच्याच काळातले भाऊ दाजी, लोकहितवादी, बाळशास्त्री जांभेकर, केरो लक्ष्मण छत्रे, नाना मोटोजी आदि विद्वान मंडळींची राष्ट्रनिष्ठा, देशाभिमान, समाजसेवे-विषयी तळमळ वादातीत असली तरी इंग्रजी राजवटीने आणलेले स्वास्थ्य आणि सुरक्षितता त्यांना अमान्य नव्हती. पाश्चात्यांची सुयंत्रित विज्ञाननिष्ठा आपल्याकडील निष्क्रिय तत्त्वज्ञानाच्या अवडंबरापुढे त्यांना श्रेष्ठ वाटली. शिवाय स्वार्थलोलुप, विषयलंपट पेशव्यांच्या भोंगळ

शासनापेक्षा ही शिस्तबद्ध, विज्ञानाधिष्ठित शासनव्यवस्था आपला समाज त्यांच्यासारखा सुशिक्षित आणि देशाचा राज्यकारभार चालवण्याइतका कुशल बनेपर्यंत टिकून राहणे त्यांना जास्त सयुक्तिक वाटले. त्याकाळातले एल्फिन्स्टन, माल्कम, बार्टल फ्रिअर यांसारखे इंग्लिश गव्हर्नर किंवा कॅ. जर्विस, सर अर्स्किन, पेरी वगैरे उदारहृदयी, विद्याव्यासंगी आणि हिंदी लोकांच्या कल्याणासंबंधी कळकळ असणारे अधिकारीही आपल्या न्यायनिष्ठेने भारतीयांची मने जिंकीत होते. त्यामुळे स्वाभाविकच येथील जनतेच्या मनात ब्रिटिश शासनाविषयी विश्वासाची, शांततेची, सुरक्षिततेची भावना निर्माण होऊ लागली. या अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनाने आणि सहवासाने विद्यासंपादनाची अभिलाषा वाढीस लागली. दादोबांच्या आत्मचरित्रात सुरुवातीला इंग्रजांबद्दल विलक्षण अभिमान दिसत असला तरी नंतरच्या अधिकाऱ्यांच्या उद्दामपणामुळे पुढे पुढे तो मावळत चाललेला दिसतो.

दादोबांची आई पंधराव्या बाळंतपणात गेली हा उल्लेख, दादोबांचे चौदाव्या वर्षी झालेले लग्न किंवा खालच्या जातीतल्या हुशार मुलांचेही शिक्षण एतद्देशीय उच्च वर्गातल्या व्यक्तीच्या सांगण्याने एकाएकी थांबवण्याचा निर्णय या गोष्टी स्त्रियांच्या तत्कालीन दयनीय अवस्थेचे, बालविवाहाच्या विचित्र चालीचे आणि जातीभेदाच्या विलक्षण रेट्याचे लाजिरवाणे दर्शन या पुस्तकातून घडवतात.

तेव्हाच्या इंग्रजी, मराठी शाळा, संस्कृत पाठशाळा, मनापासून शिकवण्याची पद्धत, इंग्रजी शिक्षणाआधी देशीभाषांचे ज्ञान विद्यार्थ्याला घेण्याची सक्ती, परकी भाषेतले ज्ञान देशी भाषेत येण्यासाठी भाषांतरित पुस्तकांना लावलेली बक्षिसे इ. बाबी शिक्षण विषयक प्रयोगांवर प्रकाश टाकतात. दादोबांचे आत्मचरित्र १८४७ पर्यंतचेच असल्याने त्यांच्या कर्तृत्वाचा पुढील काळ विशेषत: त्यांच्याकडे १८४८ मध्ये आलेले शाळा तपासणीचे काम, पुढे मिळालेले असिस्टंट कलेक्टरचे काम, दादोबांचे शिक्षण विषयक विचार इत्यादींची माहिती प्रियोळकरांनी चरित्रात विस्ताराने दिली आहे. 'मराठीतील पाणिनी' हा किताब मिळवून देणारा दादोबांचा प्रसिद्ध व्याकरण ग्रंथ, त्यांचा शिशुबोध, माबाईच्या रसाळ ओव्या या साहित्यविषयक थोर कार्याचा परिचय या चरित्रातून प्रियोळकरांनी वाचकांना करून दिला आहे.

इंग्रजी शिक्षणाने, विशेषत: रा. हेंडरसन, विल्सन यांच्यासारख्या अतिशय आदरणीय पण कट्टर मिशनऱ्यांच्या सहवासाने तरुण वयातल्या दादोबांच्या हिंदू धर्मावरील श्रद्धेला तडा जाऊ लागला. दोन संस्कृत शास्त्रींच्या शिकवणुकीतून त्यांना खऱ्या हिंदूधर्माची ओळख पटली. जातीभेद, मूर्तीपूजा मानणाऱ्या भटभिक्षुकांच्या कर्मठ हिंदू धर्मापेक्षा भागवतादि ग्रंथात सांगितलेला हिंदूधर्म आणि त्यातील मानवतावादी विचार पटून पुढे मानवधर्मसभेची स्थापना दादोबांनी केली. एक ईश्वर, एक जात, मनुष्यधर्म हाच धर्म, विवेकाला अनुसरून कर्म, ईश्वरानुग्रहार्थ भक्ती आणि सन्मार्गाचे शिक्षण ही या मानवधर्माची मूलतत्त्वे होती.

दादोबांनी अंगिकारलेल्या या तत्त्वांचाच पुढे परमहंस सभेत अंतर्भाव झालेला दिसतो. परमहंस सभा आणि तिचे सभासद झालेले अनेक सुधारक विद्वज्जन दीर्घकाळ वादाचा विषय कसे बनले याबद्दल सविस्तर विवेचन करून सुधारणावाद्यांच्या वैचारिक भूमिकेचा शोध चरित्रकार घेतात. आणि एकूणच धार्मिक मतांतील स्थित्यंतराची दिशा जाणवून देतात.

मराठी वाङ्मयात एका उत्तम ग्रंथाची भर पडल्याचा उल्लेख करून श्री. पां. वा. काणे म्हणतात. 'कित्येक वर्षे संशोधन करून दादोबांच्या आत्मचरित्रातील निर्देशांचा खुलासा करण्यासाठी ज्या टीपा दिल्या आहेत. त्या अत्यंत महत्त्वाच्या आहेत...

शंभर सव्वाशे वर्षांपूर्वीची समाजव्यवस्था, चालीरीती, शिक्षणाचे विषय व खळबळ व फरक यांचे चांगले ज्ञान या पुस्तकाने होते...

महाराष्ट्रातील शिक्षणाचा व मिशनऱ्यांच्या धार्मिक आणि शिक्षणविषयक चळवळींचा इतिहास लिहिणारास हे पुस्तक अमूल्य मदत करील.

प्रा. अ. का. प्रियोळकरांनी अभ्यास-पूर्वक लिहिलेले दुसरे चरित्र डॉ. भाऊ दाजी लाड यांचे आहे. दादोबा व डॉ. दाजी या दोन्हीही व्यक्ती न्या. रानड्यांपूर्वी जवळ जवळ वीस वर्षे आधी जन्माला आलेल्या आहेत. प्रबोधनकाळ १८७५ ते १९२० धरला जातो म्हणजे त्याकाळाची चाहूल त्यांच्याच काळात लागली असे त्यांच्या चरित्रांवरून म्हणावे लागते.

पारतंत्र्याच्या घट्ट वेडीत जखडलेल्या समाजात ज्या काही मोजक्या व्यक्तींना थोडी आधीच जाग येऊ लागली होती. आपले अज्ञान जाणवू लागले होते. धर्मातील त्रुटी, बोचक चालीरीती अस्वस्थ करू लागल्या होत्या आणि समाजाला हे जाणवून द्यायला पाहिजे याची तीव्र आच ज्यांना स्वस्थ बसू देत नव्हती अशांमध्ये डॉ. भाऊ दाजी लाड यांचे नांव अग्रक्रमाने घ्यावे लागते.

या चरित्रापूर्वी डॉ. भाऊंची तीनचार चरित्रे प्रसिद्ध झाली होती. पण अभ्यासू विद्यार्थ्यांच्या दृष्टीने ती उपयोगी नव्हती. दादोबा पांडुरंगांच्या चरित्रासाठी माहिती गोळा करता करता अनेक थोर पुरुषांची माहिती चरित्रकाराच्या नजरेखालून गेली. तेव्हाच काही निवडक चरित्रे लिहिण्याचा निर्धार लेखकाने केला. डॉ. भाऊ दाजींसारख्या बहुविध कर्तृत्वाच्या पुढाऱ्याचे अधिकृत चरित्र असू नये याबद्दल 'नेटिव ओपिनियन' ने खेद व्यक्त केला होता. हा खेद दूर होण्याजोगेच हे चरित्र लेखकाच्या हातून उतरले आहे. फोटोंमुळे त्याचे स्थान अधिकच उंचावले आहे.

त्यावेळच्या निष्क्रिय समाजाला उद्देशून डॉ. दाजी एका भाषणात म्हणतात, 'हिंदू मनात एक अंधश्रद्धा घर करून बसली आहे की हे कलियुग आहे. या श्रद्धेचा फार वाईट परिणाम झाला आहे. हिंदूंचा समाज त्यामुळे या प्रगतिशील युगात मागासत जाणार आहे. हिंदूंना यापुढे वाईट दिवस आहेत असे मानून प्रवाहपतिताप्रमाणे वागत आहेत. तर उलट बाकीचे सुधारलेले जग अधिक सुखी व चांगल्या जीवनाची प्रतीक्षा करीत आहे.' स्वत:च्या कर्तृत्वाने समाजाला असे

ठणकावून सांगणाऱ्या डॉ. भाऊंचे विविध विषयांतील ज्ञानसंपादन आणि संशोधन कल्पनातीत आहे. सुधारक विचारातून समाजसेवा हा त्यांच्या आयुष्याचा स्थायीभाव असला तरी वाङ्मयीन रसिकतेतून केलेली नाट्यसेवा आणि ग्रंथसंग्रह हेही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे महत्त्वाचे पैलू या चरित्रातून जाणवतात. कागद गिरणी, कापड गिरणीचा उपक्रम आणि लायसेन्स विलांविरुद्धचे आंदोलन, ब्रिटिश शासनाकडून येथील जनतेच्या प्रश्नांची दाद लावून घेण्यासाठी केलेली धडपड, भाषणे-लेख यांतून स्त्री-शिक्षण, विधवापुनर्विवाह, सुधारलेल्या धार्मिक मनांचा पुरस्कार, प्रसार, पुराणेतिहास संशोधनाचे कार्य, कुष्ठ रोगावरील औषध शोधून काढून अनेक रोगपीडितांवर केलेले उपचार, गरीबांसाठी चालवलेला धार्मिक दवाखाना अशा कितीतरी समाजोपयोगी कार्यांनी व्यग्र असलेल्या त्यांच्या जीवनाचे यथातथ्य चित्रण चरित्रकार आपल्या ग्रंथात करतो. कोठेही अतिशयोक्तीने चरित्रव्यक्तीला गौरविले जाऊ नये परंतु त्यांच्या कार्याचे योग्य मूल्यमापन व्हावे यासाठी संदर्भ, पुरावे, नोंदी, पत्रे भाषणे जशीच्या तशी मुळातून लेखक उदधृत करतो.

एलफिन्स्टन कॉलेज, ग्रँट मेडिकल कॉलेज सोसायटी, बॉम्बे असोसिएशन, ईस्ट इंडिया असोसिएशन, बोर्ड ऑफ एज्युकेशन, नागदेवी चॅरिटेबल डिस्पेन्सरी, मेकनिक्स इन्स्टिट्यूट, पेटीट इन्स्टिट्यूट, एशियाटिक सोसायटी, अशा कितीतरी संस्थांचे ते सभासद होते. उपाध्यक्ष, अध्यक्ष, चिटणीस अशा पदांवरून जबाबदारीचे काम त्यांनी केले. या त्यांच्या कार्यव्यापृत जीवनाचा आढावा लेखक घेतो. चरित्रव्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कळून येण्यासाठी तिचा काळ जाणून घेण्याची गरज असते म्हणून त्या व्यक्तीचा ज्या संस्थांशी, ज्या व्यक्तींशी संबंध आला त्यांची माहिती विस्ताराने देणे लेखकाला आवश्यक वाटले. डॉ. दाजींच्या कार्याची माहिती देण्याच्या ओघात संस्थांची माहिती आलीच आहे. पण इतर संबंधीतांची माहिती, त्यांचे कार्य यासाठीही वेगळी प्रकरणे चरित्राच्या शेवटी घातली आहेत. शिवाय डॉ. भाऊंनी शैक्षणिक, धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, ऐतिहासिक अशा विविध क्षेत्रांमध्ये उच्च स्तरावरून काम केल्यामुळे एकूणच तो काळ सर्वांगांनी वाचकांसमोर उभा राहतो.

डॉ. भाऊ दाजी गरीबांचे कनवाळू होते म्हणूनच त्या दोघा भावांची आर्थिक ओढग्रस्त असूनही धर्मार्थ दवाखाना कित्येक वर्षे चालवला. परंतु चरित्रकार म्हणतो, 'दरजी केसमात्र केवळ गरीबाच्या कैवाराने ते लढले नाहीत. त्याच्यामागे राजकीय हेतू दिसतो. हिंदी माणसाला गुलामाप्रमाणे वागविण्याच्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या मस्तवाल वृत्तीला आळा घालण्याचा तो एक यशस्वी प्रयत्न होता.'

डॉ. भाऊ दाजी हिंदी लोकांना राजकीय हक्क मिळावे यासाठी बॉम्बे असोसिऐशनतर्फे ब्रिटिश शासनाशी भांडले. भारतीयांवर होणाऱ्या अन्यायाच्या निवारणासाठी ५००० सह्यांची अर्जी लिहून

इंग्लंडला रवाना करण्यात त्यांनी पुढाकार घेतला. तरीही इंग्रजांबद्दल त्यांना आदर होता. शिवाय लोकांनी नवी विद्या, नवे राजकीय शिक्षण आत्मसात करेपर्यंत त्यांना इंग्रजी पांगुळगाड्याची आवश्यकता आहे असे दादोबांसारखे डॉ. भाऊंचे मत त्यांनी दिलेल्या भाषणांमधून स्पष्ट होते.

या चरित्रग्रंथासाठी आवश्यक अशा साधनांच्या जुळवाजुळवीसाठी आणि चरित्रलेखनासाठी चरित्रकाराने चिकाटीने घेतलेल्या परिश्रमांचा, त्याच्या कळकळीचा उल्लेख करून मा. यशवंतराव चव्हाण पुस्तकाला लिहिलेल्या पुरस्कारात पुढे लिहितात की —

'आता जसजसा काळ जाईल तसतसा या शतकाचा अभ्यास करणारे साक्षेपी संशोधक आढळणार नाहीत. पुढील चरित्रलेखकांना पुरेशी चरित्रसाधने कदाचित उपलब्ध होणारही नाहीत. यासाठी त्या कालखंडाबद्दलची पुष्कळशी माहिती देणारी, त्याचे मर्म उकलून सांगणारी त्या काळातील पुरुषांची चरित्रे आवश्यक ठरतात. या ग्रंथात असे सर्व साहित्य आहे. म्हणून भाऊ दाजींचे हे चरित्र एका वेगळ्या धर्तीचे आहे असे मानले पाहिजे. इतिहासाची मीमांसा करणारी जशी चरित्रे हवीत तशी त्या कालखंडाचे तपशीलवार चित्रण करणारहीही चरित्रे हवीत. हे चरित्र या दुसऱ्या वर्गातले आहे म्हणूनच ते अभ्यासकांना उपयुक्त ठरेल.'

□

डॉ. सौ. मृणालिनी पोतनीस
१४६, गुरुवार पेठ,
मामलेदार कचेरीसमोर, पुणे ४११ ०४२.













# एक कृतार्थ चरित्रकार : धनंजय कीर

जयंत वष्ट

स्वातंत्र्योत्तर मराठी चरित्र वाङ्मयाचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार करताना आपल्याला जे महत्वाचे चरित्रकार लक्षात घ्यावे लागतात त्यात डॉ. धनंजय कीर अग्रगण्य आहेत.

कीरांच्या लेखनाचा आरंभ जरी व्यक्तिचित्र रेखाटनांनी इंग्रजीतून झाला असला तरी चरित्रलेखन हेच आपले कार्यक्षेत्र म्हणून पुढील काळात त्यांनी निश्चित केल्याचे दिसते. हे चरित्र लेखनही प्रारंभी इंग्रजीतून आणि नंतर मराठीतून झालेले आहे.

कीरांच्या प्रारंभीच्या राजकीय व्यक्तींच्या रेखाटनांची दखल जाणकारांनी घेतली. विशेषत: त्यांचे सावरकरांचे व्यक्तिचित्रण उत्तम साधल्याने ते कदाचित सावरकर चरित्राकडे वळले असावेत. अर्थात सावरकर हे त्यांना पूजनीय होतेच. पण 'जॉन गुंथर' च्या इनसाईड इंडिया' या ग्रंथात सावरकरांचा उल्लेख कोठेच नसल्याने त्यांना खटकले, हेही तात्कालिक कारण होतेच. सावकरांविषयीच्या लेखनास ज्या काळी बंदी येण्याची शक्यता (१९४७-४९) होती नेमक्या त्याच काळात कीरांनी सावरकर साहित्याचा-साधनांचा अभ्यास केला व २८ मे १९५० ला आपला 'सावरकर अँड हिज टाईम्स' हा ग्रंथ स्वत:च प्रकाशित केला. कीरांनी लिहिलेला हा पहिला चरित्रग्रंथ.

या चरित्रग्रंथातून कीरांची संशोधकीय वृत्ती स्पष्टपणे जाणवते. चरित्र नायकाचे जीवन यथातथ्य लिहिण्याचे ठरविल्याने कीरांनी सावरकरांची जी स्वभाववैशिष्ट्ये व वर्तनवैशिष्ट्ये नोंदविली त्याने सावरकरांशी ते किती समरस झाले होते तेही स्पष्टपणे दिसतात. परिणामत: महापुरुषाने कसे दिसावे याबाबतची प्रचलित धारणा कीरांनी मोडली, पण चरित्रातून व्यक्त होणाऱ्या वस्तुनिष्ठ व काटेकोर वृत्तीमुळे चरित्र वाङ्मयाच्या तत्कालीन अभ्यासकांना व वाचकांना हा ग्रंथ मान्यता पावला. स्वत: सावरकरांनी हे लेखन होत असताना पाहिले होते व 'तुम्ही' आपले चरित्रकाराचे कर्तव्य चांगल्या रीतीने बजावले' असे कीरांचे कौतुकही त्यांनी केले. काही समीक्षकांनी या पहिल्याच ग्रंथास 'ग्रेट' म्हटल्याचे दिसते. म. य. भिडे यांच्या भाषेत म्हणावयाचे झाले तर कीरांनी त्या हिऱ्याचे पैलू हाताळले, उजाळले, प्रकाशमान केले. सवंग लोकप्रियतेला वळी न पडता मार्मिक भाष्यकार नि भविष्यद्रष्टे असे धनंजय कीर सर्वजनांना गवसले. (पृ. ४९)

केवळ सावरकरांचा संस्कार कीरांवर बालपणी झाला होता एवढेच या यशाचे कारण

नसून चरित्रनायक समजून घेण्याची, समरसतेची त्यांची दिशा व पद्धती योग्य होती हेही आहे. 'भारत ज्योती' च्या ९ मे ७१ च्या अंकात आर. पी अय्यर यांचे सावरकर चरित्राविषयीचे मत येथे जुळणारे आहे. ते म्हणतात, 'लिटनस्ट्रॅची व एमिल लुडविग ह्या दोन श्रेष्ठ चरित्रकारांच्या लिखाणाचा सुंदर मिलाफ चरित्रकार कीर यांच्या ठायी झाला आहे. स्ट्रॅचीच्या चरित्रलेखनातील व्यक्तिदर्शन व सुंदर मनोविश्लेषण व लुडविगकृत चरित्रातील राजकीय विश्लेषण व राजकीय दृष्टी ह्या सर्व गोष्टी प्रामुख्याने कीरांच्या सावरकर चरित्रात आढळतात.'

सावरकरांची स्पृश्यास्पृश्य विषयक मते कीरांच्या उदार मानवतावादी मनाला पटली होती. तीच मते पुढे नेण्याचे कार्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर करीत असल्याचे पटल्याने १९५२-५४ या काळात कीरांनी आंबेडकर समजून घेण्याचा प्रयत्न केला व त्यांचा 'आंबेडकर : लाईफ अँड मिशन' हा ग्रंथ १९५४ मध्ये प्रसिद्ध झाला. सावरकर चरित्रातून लाभलेली चौकस, हंसक्षीरन्यायाची वृत्ती व आलेला अनुभव आंबेडकरांचे चरित्र लिहिताना उपयोगी पडला. साधनांची, नियतकालिकांतील कात्रणांची, पत्रव्यवहारांची जुळवाजुळव, त्यासाठी होणारे शारीरिक कष्ट, मानसिक ताणतणाव, येणाऱ्या अनेकविध अडचणी यातून कीर खरोखरच या निमित्ताने तावून सुलाखून निघाले. 'आमच्या काळातील एका थोर व्यक्तिमत्त्वाचे अत्यंत प्रामाणिक चरित्र' या शब्दांत सावरकरांनी या आंबेडकर चरित्राचा गौरव केला. तर या ग्रंथाबद्दल भारतातील उपेक्षित, मागासवर्गीय व अनुसूचित जाती जमातींच्या इतिहासात आपले हे पुस्तक महत्त्वाचे ठरणारे आहे व त्याबद्दल ही मंडळी आपली ऋणी राहतील अशा स्वरूपाचे मत आंबेडकरांचे सचीव नानकचंद रट्टू यांनी नोंदविले तर खुद्द आंबेडकर प्रसन्नपणे म्हणाले की, 'आता आत्मचरित्र लिहिणे सोपे जाईल' व चरित्राच्या संहितेची अप्रकाशितच पाने मागितली.

आंबेडकर चरित्राच्या वेळेपासूनच किंवा थोड्याशा आधीपासून कीर टिळक चरित्राची जुळवाजुळव करीतच होते. १९५५-५६ मध्ये त्यास टिळक जन्मशताब्दीच्या निमित्ताने बहुधा अधिक गती आली असावी. तेल्या तांबोळ्यांचे पुढारी, भारतीय असंतोषाचे जनक व स्वातंत्र्य लढ्यास सर्वार्थाने गती देणारे म्हणून कीरांना त्यांच्याविषयी आकर्षण होतेच. लो. टिळकांविषयी केळकर, करंदीकर यांचे ग्रंथ असतानाही कीरांनी टिळक-विचार मांडला. या ग्रंथाबाहेरचे नवे संदर्भ शोधले. कीरांच्या टिळक चरित्रावरून लोकमान्यांनी भारताच्या स्वराज्य संग्रामास प्रखरता, स्फूर्ती व प्रेरणा दिली हे जसे कळते तसेच राजकीय बाबतीत प्रगतिशील व प्रभावी असणारे टिळक सामाजिक प्रश्नांबाबत शेवटपर्यंत पुनरूज्जीवनवादी आणि अपरिवर्तनवादी राहिले हेही दिसून येते. विशेषत: टिळक-आगरकर पत्रव्यवहार, कर्मवीर शिंदे यांचे कडील अस्पृश्यता निवारण कार्याविषयीची माहिती, टिळक व रशियन वकिलातीचा पत्रव्यवहार यातून दिसणाऱ्या टिळकांच्या राजकारणी व्यक्तिमत्त्वाविषयीची कीरांची मते व त्यांनी केलेले निर्भीड मूल्यमापन येथे दिसते. यात, विभूतिपूजक वा पक्षपाती अशी भूमिका नाही तर टिळकांच्या प्रतिपक्षियांनाही त्यांनी न्याय



अनुक्रमणिका






दिला आहे. असे ग. वि. केतकरांनी 'केसरी' तून लिहिले. १९५९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'लो. टिळक : फादर ऑफ अवर फ्रीडम स्ट्रगल' नंतर कीर या अस्पृश्यता निवारणाच्या भूमिकेतून इतिहासाकडे वळताना दिसतात. गतशतकातल्या सामाजिक परिवर्तनासाठी आपले सारे आयुष्य खर्चणाऱ्या म. ज्योतिराव फुले यांच्या चरित्राचा अभ्यास त्यांनी १९५९ मध्ये सुरू केला.

म. फुले यांचा काळ मागच्या शतकातला. आणि त्यांच्या चरित्रासाठी गोळा करावयाची साधने अल्प तसेच विखुरलेली व अनुपलब्ध. हे अत्यंत कष्टाचे व दीर्घोद्योगी कार्य कीर जवळ जवळ पाच-सहा वर्षे करीत होते. या काळात कीरांनी पंचवीस हजार पानांचे वाचन केल्याचे नोंदविले आहे. अधू दृष्टी, शारिरीक व्याधी व नोकरी सांभाळून या कार्यास न्याय देता येणे कठीण हे लक्षात येताच १९६२ मध्ये त्यांनी मुंबई महानगरपालिकेतल्या आपल्या नोकरीचा राजिनामा दिला व पूर्ण वेळ चरित्र लेखनास वाहून घेतले. बाबासाहेब आंबेडकरांबरोबरच्या एका भेटीत 'म. फुले यांचे चरित्र लिहिण्याची आपली इच्छा' बाबासाहेबांनी व्यक्त केली असता व प्रकृती अस्वास्थ्यामुळे हे जमेल की नाही अशी शंकाही व्यक्त केली असता कीर उत्स्फूर्तपणे उद्‌गारले होते. 'बाबासाहेब ! ते कार्य आपण करू शकला नाहीत तर मी ते तडीस नेण्याचा प्रयत्न करीन.'

अखेर १९६३ मध्ये म. ज्योतिराव फुले : फादर ऑफ अवर सोशल रेव्होल्यूशन' च्या प्रसिद्धीने हे आश्वासन कीरांनी पूर्ण केले. महात्मा फुले यांना आंबेडकर 'गुरू' का मानीत याचे उत्तर आपल्याला कीरांच्या चरित्रातून मिळते. त्यावेळच्या महाराष्ट्राचे सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक दर्शन तर या ग्रंथातून होतेच पण त्या पार्श्वभूमीवर म. फुले यांचे क्रांतिकारक कार्य, त्यांनी हाताळलेला अस्पृश्यांचा सामाजिक/शैक्षणिक प्रश्न यातून दिसणारे व्यक्तिमत्त्वही उजळून उठते. स्त्रीशिक्षण, शेतकरी कामकरी वर्गाच्या उन्नतीचे प्रयत्न, इ. अनेक कार्यांच्या निमित्ताने म. फुल्यांचे यथार्थ व्यक्तित्व दर्शविण्याचा बराचसा यशस्वी प्रयत्न कीरांनी केला आहे.

आणि हे सारे १९४७ ते १९६३ पर्यंतचे चरित्रलेखन कीरांनी इंग्रजीतून केले आहे. कीरांचे शालेय शिक्षण केवळ मॅट्रिकपर्यंत झाले होते. अशा या माणसाने स्वपरिश्रमाने इंग्रजी भाषेवर प्रभुत्व मिळवावे हा खरोखरच चमत्कार वाटावा असे आहे. अर्थात इंग्रजी अनुलेखन व डिक्शनरींचा सातत्याने अभ्यास करण्याची हौसही येथे आहेच. विचार विनिमयाचे साधन म्हणून भाषेचा उपयोग करणाऱ्या कीरांच्या इंग्रजी संबंधी प्रा. निस्सीम हासकेल म्हणतात, 'कीर यांची भाषाशैली सोपी असून केवळ साधन म्हणून त्यांनी तिचा वापर केला आहे. त्यांच्या शैलीस अलंकाराचा सोस नाही. तरीही ती सुंदर आहे. कारण आशय व्यक्त करणे हा तिचा उद्देश सफल झाला आहे. स्वत:शी इमान राखणारे परिपक्व व्यक्तिमत्त्व त्यांच्या शैलीत स्पष्टपणे प्रतिबिंबित होते. (लोकसत्ता २३-४-७३) आपले चरित्रनायक हे अखिल भारतीय व जागतिक स्तरावर सर्वांना वाचता यावेत. भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील तसेच त्यांचे सामाजिक कार्यही सर्वत्र समजावे या उद्देशाने कदाचित



अनुक्रमणिका

कीरांनी हे इंग्रजीतून चरित्रलेखन केले असावे. इंग्रजी प्रमाणेच १९६५ नंतर ते मराठीतही चरित्रलेखन करताना दिसतात. १९६६ मध्ये त्यांनी 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' हा मराठी चरित्रग्रंथ पूर्ण केला. 'इंग्रजीप्रमाणेच मराठीतही मी लिहिलेली चरित्रे मराठी वाचकांसाठी उपलब्ध करून द्यावीत' अशी अनेक स्नेही, चाहते आंबेडकरांचे अनुयायी तसेच यशवंतराव चव्हाणांसारख्यानी व्यक्त केल्याने आपण अधिक माहितीची भर घालून सुगम, साधार नि समग्र आंबेडकर चरित्र जनतेस सादर करीत आहे असे कीरांनी या पहिल्या मराठी चरित्रग्रंथाच्या प्रस्तावनेत नमूद करून ठेवले आहे. यानंतर १९६७ मध्ये कीरांनी 'शेतकऱ्याचा आसूड' या फुले यांच्या ग्रंथाचे संपादन डॉ. स. ग. मालशे यांच्या सहकार्याने पूर्ण केले आहे. १९६८ मध्ये म. ज्योतिराव फुले : आमच्या समाजक्रांतीचे जनक' हा मराठी चरित्रग्रंथ प्रकाशित झाला. म. फुले यांच्या समग्र साहित्याचे वाचन/मनन या निमित्ताने झालेले होतेच. थोडक्यात कीरांना म. फुले यांनी प्रभावित केले होते. परिणामत: समग्र फुले वाङ्मयाचे संपादन त्यांनी १९६९ मध्ये डॉ. स. ग. मालशे यांच्या सहकार्याने पूर्ण केले.

१९५९ मध्ये लो. टिळकांवरील ग्रंथ पूर्ण केल्यानंतरही कीरांच्या मनात टिळक होतेच. राजर्षी शाहू महाराज व टिळक यांच्या व्यक्तिमत्त्वाची आणखी एक बाजू मांडणारा ग्रंथ त्यांच्या नजरेसमोर होता. व्याख्यानरूपात तो त्यांनी शिवाजी विद्यापीठात ६९ व ७० मध्ये श्रोत्यांसमोर मांडलाच होता. समाजाच्या वेगवेगळ्या स्तरांचे प्रतिनिधित्व करणारी पण एकाच अस्पृश्यता निवारणासारख्या सामाजिक विचारांनी भारलेली ही दोन व्यक्तित्वे कीरांच्या लो. टिळक आणि राजर्षी शाहू : एक मूल्यमापन' या ग्रंथामुळे पुन्हा एकदा उजळून निघाली. (१९७१)

सावरकरांच्या इंग्रजी चरित्राचा अनुवाद श्री. द. पां. खांबेटे यांनी १९७२ मध्ये मराठी वाचकांना सादर केला. 'महापुरुषाची जडणघडण', समाजक्रांती : नवी दृष्टी, नवी सृष्टी,' 'राजकीय विचार सरणी' या आंबेडकरांच्या जीवनावर मराठवाडा विद्यापीठात औरंगाबादला दिलेल्या व्याख्यानांचे पुस्तकही १९७२ मध्ये प्रसिद्ध झाले.

या साऱ्या काळात १९६९ पासून त्यांच्या मनात गांधी विचाराला प्रारंभ झाला होता. हे गुंतागुंतीचे व्यक्तिमत्त्व त्यांना समजून घेण्याची ओढ लागली होती. टिळकोत्तर स्वातंत्र्यलढ्यावर प्रभाव पाडणारे हे अग्रगण्य व्यक्तिमत्त्व व गांधींचे हरिजन विषयक, अहिंसा विषयक तत्त्वज्ञान, मानवताविषयक विचार यातून कीर यांनी गांधींचे चरित्र लिहिण्यास सुरूवात केली होती. जवळ जवळ चार वर्षे साधनसामग्री जमविण्याच्या निमित्ताने कीरांनी ४० हजार पृष्ठांचे वाचन केले. सुमारे ८१९ पृष्ठांचे वृहत गांधी चरित्र 'म. गांधी पोलिटिकल सेंट अँड अनआर्मड प्रॉफेट' १९७३ मध्ये प्रसिद्ध झाले.

अनुभवांनी गांधींकडे पाहण्याचा कीरांचा दृष्टिकोन हा आंबेडकर, सावरकर चरित्रांच्या लेखनामुळे अधिक चिकित्सक झालेला होता. गांधींच्या निमित्ताने गांधी युगाचा व भारताच्या अहिंसक सत्याग्रह चळवळीचा सारा भाग तेथे लिहिला गेला होता. आपल्या आत्मचरित्रातून स्वत:च्याच चुका शोधणारे, एका बाजूने निरहंकारी, मानवतावादी तर दुसऱ्याबाजूने दुटप्पी











राजकारणातले हेकट गांधीही त्यांना दिसले होते. टिळक/गोखले, गांधी/टिळक हे संघर्ष त्यांनी लक्षात घेतले होते. जीनांची अरेरावी गांधींच्या भित्रेपणाला कशी स्पष्टरूप देत होती इ. अनेक परस्पर विसंगत घटना-प्रसंगातून कीर गांधीपर्यंत जात होते. गांधींचे व्यक्तित्त्वाचा हा अभ्यास त्यांना खरोखरच आव्हान ठरलेला होता. त्यातून कीर कोणत्याही अर्थाने गांधीजींची विचारसरणी मानणारे नव्हते. त्यांची मते गांधी विरोधीही होती. आणि तरीही अत्यंत कष्टपूर्वक, व्यासंगाची पराकाष्ठा करून आणि शक्य तेवढी तटस्थता बाळगून त्यांनी गांधीचरित्र पूर्ण केले. या लेखनाने गांधीवादी मंडळींनाही गांधींविषयी विचार करण्यास लावले.

१९७३ मध्ये कीरांना साठवर्षे पूर्ण झाली. त्यानंतरही नवे नवे लेखन संकल्प चालूच होते; पण जन्मभराची अधूदृष्टी अधिक त्रास देत होती, व्याधी डोके वर काढू लागल्या होत्या, तरीही 'कृष्णराव अर्जुन केळुस्कर: आत्मचरित्र व चरित्र' व 'लोकहितकर्ते बाबासाहेब बोले' या दोघांवरचे चरित्रग्रंथ त्यांनी मराठीत लिहिले. 'कृतज्ञ मी कृतार्थ मी'. हे आपले चरित्रलेखन निर्मिती प्रक्रिया सांगणारे आत्मचरित्रही लिहिले. स्वत:विषयी अत्यंत प्रामाणिक निवेदन करीत आपल्या मर्यादा मान्य करीत कृतार्थतेच्या बरोबरच कृतज्ञतेची भावनाही व्यक्त केली.

'तीन तपांहून अधिक चाललेल्या या चरित्रलेखन प्रवासाकडे व कीरांनी निवडलेल्या चरित्रनायकांकडे पाहाता गेल्या जवळजवळ दीडशे वर्षांतील भारताच्या राजकीय/सामाजिक इतिहासाचा अभ्यास/ कीरांनी आपल्या लेखनातून केल्याचे दिसते व गेल्या दीडशे वर्षातील भारतातल्या घडामोडींशी ग्रंथाद्वारे सुपरिचित असलेला एखादा अमेरिकन पंडित उद्या भारतात आला तर या महानगरीतल्या ज्या मोजक्या व्यक्तींची गाठभेट त्याला घ्यावीशी वाटेल त्यात थोर चरित्रकार धनंजयराव कीर यांचे नाव निश्चित असेल. आपापल्यापरी महामानवाची चमक दाखविणाऱ्या आधुनिक भारतीय नेत्यांच्या धनंजयरावांनी लिहिलेल्या चरित्रांनी त्या पंडिताची जिज्ञासा अंशत: तरी तृप्त केली असेल.' या वि. स. खांडेकर यांच्या उद्‌गारांची सत्यता पटते.

सावरकर, आंबेडकर, टिळक, फुले, गांधी, शाहूमहाराज हे कीरांनी निवडलेले चरित्र-नायक स्वभावत:च भिन्नप्रकृती व प्रसंगी राजकारणात/समाजकारणात परस्परविरोधी भूमिका मांडणारे होते. उदा. एका दृष्टीने टिळक, सावरकर, आंबेडकर हे म. गांधींचे विरोधकच. कीरही तितकेच निपक्षपाती व चिकित्सक आणि चरित्रकाराला तर चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेत असताना त्याला एकरूप/समरस व्हावे लागते. त्याच्या मनोभूमिकांतून त्याच्या जीवनातील (बौद्धिक व सार्वजनिक) घटना/प्रसंगांत डोकावून त्यांचा वेध घ्यावा लागतो. या परकीय प्रदेशास काही वेळा व्यक्तित्व प्रवेश असे काहीसे म्हणावेसे वाटते, पण त्याशिवाय चरित्रकार काहीच सांगू शकत नाही. कीर त्या त्या चरित्रलेखन काळात त्या त्या व्यक्तिमत्त्वाशी स्वत्व न लपवता समरसता पावताना दिसतात. मग त्यांच्या चरित्रनायक निवडीमागचे सूत्र कोणते हा विचार साहजिकच मनात येतो.

अनुक्रमणिका






हे सर्वजण आपापल्या परीने बंडखोर आहेत व उपेक्षितांना वर उठविण्यासाठी धडपडणारे, आपली आयुष्ये वेचणारे आहेत. या संदर्भात कीरांना एकदा विचारले असता ते म्हणातात, 'म. फुले, राजर्षी शाहू, वीर सावरकर, डॉ. आंबेडकर ह्यांना भारतीय समाज मूळापासून बदलावयाचा होता. ते केवळ समाजसुधारक नव्हते. ते समाज क्रांतिकारक होते... हे चौघे मानवतावादी होते.' एकंदरित बुद्धीप्रामाण्यातून उगम पावणाऱ्या मानवतावादी दृष्टीने पाहून व समाजाच्या उपेक्षित मागासवर्गीय घटकांची परिस्थिती लक्षात घेऊन त्यांच्यासाठी आपापल्या परीने दास्यविमोचनासाठी आयुष्य वेचणाऱ्या चरित्रनायकांची निवड कीरांनी केली व त्यांना समजून घेण्यासाठी प्रचंड मेहनत घेऊन हा खटाटोप कीरांनी केला असे दिसते. मनात कोठेतरी समाजाच्या दुर्लक्षित दुर्बल घटकांनाही त्यांचे हक्क मिळाले पाहिजेत ही जाणीव होतीच, त्यांचा आक्रोश ऐकू येत होता. मग त्या आक्रोशावर मात करण्यासाठी जीवन खर्ची घालणारे चरित्रनायक कीरांना भावतात व ते त्या त्या चरित्रग्रंथाकडे वळतात असे लक्षात येते.

एकदा एखादा लेखनविषय ठरला की त्यासाठी आवश्यक त्या साधनांचा न कंटाळता सातत्याने शोध घेण्याची संशोधकीय वृत्ती हा कीरांचा स्थायी भाव असल्याने ते त्या चरित्रनायकाची इत्थंभूत सर्व उपलब्ध माहिती मिळवतात. त्यांच्या जीवनातील सामाजिक, राजकीय घटना, त्या घटनांशी त्यांचे असणारे आंतरिक नाते, त्यांना येणारे अनुकूल प्रतिकूल अनुभव, मूळापर्यंत जाऊन कीर आपल्या चरित्रनायकांना भिडतात; स्वत: कोणताही मुखवटा धारण न करता, विभूतीपूजनापासून स्वत:ला कटाक्षाने दूर ठेवत त्यांची विचारसरणी (त्यातल्या त्रुटींसह, विसंगतींसह) समजून घेण्याचे मानसिक ताण, मानसिक श्रम ते घेतात व यातून आपला चरित्रनायक रेखाटतात.

या साऱ्यासाठी ते विविध लेखन साधने/संदर्भ एकत्र करतात. मनात त्यांचा कसा उपयोग होईल याचा सतत विचार करीत असतानाच त्या साधनांची विश्वासनियतेच्या दृष्टीने श्रेणीही ठरवतात. सामान्यत: शासकीय नोंदी जरी विश्वासार्ह असल्या तरी त्या नेत्यांनी / राज्यकर्त्यांनी त्यांच्या सोयीनुसार केलेल्या असतात. सावरकर वा गांधी, टिळक वा शाहू यांच्या विषयीच्या ब्रिटीश दप्तरांतील नोंदी या नेहमीच त्यांच्या सोयीने केलेल्या असल्याने त्यातले घटना व भाष्य हे चरित्र नायकाच्या व्यक्तिमत्त्वावर निपक्षपातीपणे प्रकाश टाकतीलच असे नव्हे. पण राज्यकर्त्यांची त्यांच्याकडे पाहण्याची नेमकी दृष्टी चरित्रकार लक्षात घेऊ शकेल. हे भान जरी कीरांचे चरित्रलेखन स्वातंत्र्योत्तर काळातील असले तरी त्यांचे कार्य स्वातंत्र्यपूर्व काळातील असल्याने, राखलेले दिसते. चरित्रनायकांविषयीची चरित्रे चाळताना ते ते चरित्रकार आपल्या चरित्रनायकांकडे कोणत्या दृष्टीने पाहातात हेही कीर लक्षात घेतात. आपल्या चरित्रलेखनात अभिनिवेश वा प्रचारकी कृती येत नाहीना याबावत कीर दक्ष आहेत. चरित्रनायकांच्या आत्मचरित्रांबावत, विशेषत: सावरकर वा गांधीची चरित्रे लिहिताना कीरांना हे विशेषत्वाने लक्षात घ्यावे लागले असावे. सावरकरांच्या आत्मपर लेखनातून दाखविले गेलेले सावरकर हे सावरकरांना लोकांनी कसे

पहावसे वाटत होते, तसे होते. तर गांधी आपल्या अहिंसा/सत्याग्रह/सत्याच्या प्रयोगांतून स्वत:कडेच वेगवेगळ्या भूमिकेतून पाहता पाहता आत्मपरीक्षण करतात. अशा लेखनाची साधनात्मक मर्यादा कीर जाणतात व योग्य तेवढीच दखल घेतात. आपल्या चरित्रनायकांची अखिल भारतीय स्तरावरची व्यक्तिमत्त्वे लक्षात घेता समकालीनांची त्यांच्या विषयीची मतेही ती ती व्यक्तिमत्त्वे समजून घेताना कीरांना ध्यानात ठेवावी लागतात.

ग्रंथरचनांतून वा या व्यक्तिंविषयीच्या वृत्तपत्रे/मासिक आदि कालीकांतून मिळणाऱ्या माहितीचा/बातम्यांचा उपयोग कीरांनी सावधानतेने पण साधार केला आहे. चरित्रनायक रेखाटताना समकालीनांचे चुकून अवमूल्यन तर आपल्या हातून होत नाही ना याची दक्षता कीरांना सतत घ्यावी लागली आहे. विशेषत: गांधी/सावरकर/आंबेडकर या एकाच काळातील चरित्रांबाबत त्यांना हे अधिक प्रकर्षाने जाणविले असेल पाहिजे.

कीरांची चरित्रलेखन प्रक्रिया या व अशा अनेक विचारांतून होत असल्याने व त्यासाठीची सामग्रीही जमविण्यास वेळ लागत असल्याने व्यक्तिमत्त्वांत डोकावणे हे कार्य ते त्यांच्या सोयीने करतात. साहजिकच ही प्रक्रिया अधिक कालावधीची ठरते. पण एकदा ही प्रक्रिया आटोक्यात आली की प्रत्यक्ष संहिता मात्र त्यामानाने लवकर तयार होताना दिसते. आधाराशिवाय काहीही लिहावयाचे नाही ही वृत्ती बाळगल्याने हे असे होणे स्वाभाविकच वाटते.

ज्या चरित्रनायकावर चरित्रकार लिहित असतो तो काळ त्या त्या वेळी प्रकाशात येत असतो. जिवंत होत असतो. चरित्राबरोबरच तेथे त्या काळाचेही मूल्यमापन/शोधन होत असते. समकालीन सामाजिक/राजकीय परिस्थिती, चरित्रनायकाचा जीवनक्रम, आणि त्याचे व्यक्तिमत्त्व या तिन्ही अंगांचा विचार कीरांनी आपल्या लेखनात केला आहे. त्यांच्या चौफेर व्यासंगामुळे व चौकस वृत्तीमुळे त्यांनी परिस्थितीचा वेध तर अचूकपणे घेतला आहेच, पण या लेखनात सातत्याने एक शिस्त राखली आहे. वाहावत जाण्याचा प्रकार सहसा नाही. कीरांनी आपले चरित्रनायक जीवनक्रमाच्या अंगाने रेखाटले आहेत. जीवनक्रमातून परिस्थितीपर्यंत येताना ते प्रसंगाप्रसंगांनी तसेच लहान मोठ्या कृतींतून चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाकडे पोहोचतात. त्यांचे हे सर्व नायक तसे दीर्घ जीवीच. त्यामुळे तपशीलवार जीवनक्रम मांडणे व सुबोधपणे शिस्तबद्ध विवेचन करणे, गुंतागुंतीच्या घटनाही आपापल्या परीने उलगडणे ही त्यांची धाटणी अंती जीवनक्रमास प्राधान्य देताना दिसते. कीरांच्या चरित्रलेखनाची वीण ही अशी घट्ट आहे. चरित्र नायकांविषयीची जाण पक्की आहे. त्यांचे प्रत्येक चरित्रनायक हे वेगवेगळ्या संस्कारांतून विकास पावणारे, भिन्न विचारसरणीचे व कार्यवृत्तीचे आहेत. त्यांची प्रेरणास्थानेही भिन्न आहेत. पण कीर त्या त्या लेखनप्रसंगी त्या त्या चरित्रनायकाशी समरसता साधू शकतात. स्वत्व वा तटस्थता न सोडता ते त्या व्यक्तिमत्त्वाचा निर्भीडपणे वेध घेतात. मनोवैज्ञानिक कल्पनीयता साधार तार्कीकतेने ते साध्यापर्यंत पोहोचतात. चरित्रनायकाच्या वृत्ती वा कृतीविषयी, ती जर पटत नसेल तर, विरोधी मतही नोंदवितात. अभ्यासपूर्वक सिद्ध होत जाणारी कीरांची ही मते



अनुक्रमणिका






त्यांच्या चरित्रलेखनाची बलस्थाने ठरतात.

जीवनक्रम आणि व्यक्तिमत्त्व यांच्या संदर्भातच परिस्थितीचे अवलोकन केले पाहिजे व त्यामुळे जीवनक्रमास अधिक स्पष्टता येऊन उठावदार झाले पाहिजे अशी बहुदा कीरांची धारणा असावी. ते जीवनक्रमात परिस्थितीही एकत्र गुंफित प्रसंगाप्रसंगाने व्यक्तिमत्त्व रेखाटनाकडे जातात. काहीवेळा कीर परिस्थितीत/प्रसंगात वा घटनेत अडकून व्यक्तिमत्त्वाकडे पुरेसे लक्ष देत नसल्याचेही क्वचित घडले आहे. तर कधी कधी लेखन विखुरलेले वा वीण सुटलेले होते पण अशी स्थळे फारच अल्प प्रमाणात दिसतात. एखाद्या ठिकाणी चरित्रनायकाच्या कर्तृत्वापुढे कीरांची तटस्थताही ढळते तर कधी नाटकी निवेदनाचा मोहही ते आवरू शकत नाहीत. पण हे सारे अपवादात्मक स्थितीत आढळते.

कीरांनी विचारांती/अभ्यासांती निश्चित केलेल्या लेखनपद्धतीत ते जीवनक्रमास अधिक महत्त्व देताना दिसतात व त्यामुळे सर्वसामान्यतः चरित्रकारांकडून अपेक्षित व्यक्तिमत्त्वाला प्राधान्य देण्याच्या उद्दिष्टापासून दूर जातात. फुले यांच्या चरित्रात साधने व माहिती यांच्या अप्राप्यतेमुळे असे कदाचित घडले असेलही पण सावरकर, आंबेडकर, गांधी, यांच्या चरित्रांत इतकी भरपूर माहिती उपलब्ध असताना जीवनक्रमापेक्षा व्यक्तिमत्त्वास अधिक महत्त्व देणे योग्य ठरले असते. कदाचित परिस्थिती व जीवनक्रम हे स्थूल मानाने नोंदणे शक्य असते व व्यक्तिमत्त्वाचे आकलन त्या मानाने सूक्ष्मात जावून मानसशास्त्रीय अंगाने अमूर्ततेतून साकार करावे लागते. आपल्या चरित्रग्रंथांतून चरित्रकार परिस्थिती व जीवनक्रम यांची सांगड अशा कलात्मकतेने गुंफतो की व्यक्तिमत्त्व त्यातून आपोआपच वाचकांच्या मनावर उमटावे, प्रतिबिंबित व्हावे, वाचकांच्या मनात हे/व्यक्तिमत्त्व प्रतिबिंबित करण्याच्या प्रयत्नात कीर थोडे कमी पडतात की काय असे अभ्यासकांना वाटत राहाते. व्यक्तिमत्त्वाची सर्व लक्षणीय अंगे वाचकांसमोर विविध घटकांच्या एकसंघतेतून अशी पुढे यावीत की तो चरित्रनायक पुरता मनात ठसावा. या प्रक्रियेत काही वेळा राजकीय जीवन तपासताना सामाजिक जीवनाकडे म्हणावे तितके लक्ष दिले जात नाही तर प्रसंगी सामाजिक जीवनापुढे राजकीय कार्यातून जाणवणाऱ्या व्यक्तिमत्वास गौणत्व येते. म्हणजेच समग्र व्यक्तिमत्त्वाचे परिपूर्ण दर्शनापासून चरित्रकार थोडासा ढळतो. चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाची उकल करणे मध्यवर्ती ठेवून त्याच्या अंतरंगात तळापर्यंत उतरता उतरता पुढे जात राहण्याच्या प्रक्रियेत मग थोडी बाधा आल्यासारखे होते. साक्षेपाने व्यक्तिमत्त्व दर्शन होवू शकत नाही. उदा. गांधींचे राजकीय व्यक्तिमत्त्व पाहात असताना त्यांच्यातली हिंदू मानसिकता वा धार्मिकतेचा धागा कच्चाच राहतो. मुसलमानांचा अनुनय करणारे हिंदू संस्कारातून विकास पावणारे गांधी समजणे अवघड जाते. पण हे अगदी अपवादात्मकरित्या कीरांच्या बाबतीत घडलेले आहे. अमर्याद अभ्यास करताना पडणाऱ्या काही अपरिहार्य मानवीमर्यादा म्हणून सोडून देण्यासारखे आहे.

कीरांचे चरित्रग्रंथ जसजसे प्रसिद्ध होत गेले तसे त्यावर टीका, टिपणी, समीक्षा केल्या गेल्या. सावरकर, सीपीरामस्वामी अय्यर, आर पी अय्यर, अ. स. भिडे, रट्टू, शंकरानंद

शास्त्री अशा अनेक नामवंतांनी व 'द मेल', 'भारत ज्योती', 'टाईम्स ऑफ इंडिया', 'ऑर्गनायझर', 'पूना डेली न्यूज', 'हिंदू', 'क्वेस्ट', 'फ्री प्रेस', 'संडे ट्रिव्यून', इ. अनेक वृत्तपत्रांनीही त्यांची 'दखल घेतली. आंतरराष्ट्रीय स्तरावर द वर्ल्ड', ग्लासगो, 'टाईम्स लिटररी सप्लीमेंट', 'लंडन, फ्रेंच वृत्तपत्रे, वर्मिंग हॅम न्यूज, लंडन, आदि अनेकांनी दखल घेतल्याचे चरित्रग्रंथ परदेशीही वाचले गेल्याचे लक्षात आले.

अत्रे, सावरकर, आंवेडकर, यांच्या वरोवरच अनेक नामवंत जाणकारांनी कीरांना यशाची पावती दिली. या चरित्रांतून ते ते नायक आमच्या समोर साक्षात उभे करताना त्यांचे डोळे जरी अधू झाले तरी त्यांनी राष्ट्राचे डोळे उघडले. समाजास जागे करून नवी दृष्टी दिली.

मराठी चरित्रलेखनाच्या परंपरेत कीरांचे हे लेखन मार्गदर्शक ठरले. त्या संदर्भात एक समीक्षा मांडून कीरांविषयीचे जाणकारांचे मत स्पष्ट करतो. प्रो. निस्सीम इसिकेत म्हणतात, "Mr. Keer is one of the most important biographers on Indian Scene. He is wholly non-egoistic in his treatment of his subject and we learn virtrally noting about the biographer as we read biography. Mr. Keer is a highly disciplined, impersonel art, unerringly guided by humility in making his judjements. out spoken and at the same time restrained in both praise and blame."

□

जयंत वष्ट
१०२५, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.





अनुक्रमणिका

# चरित्रलेखक आचार्य अत्रे

न. म. जोशी

आचार्य अत्रे यांची शब्दकळा प्रामुख्याने नाट्यवाङ्मयाद्वारा सर्वसामान्य रसिकांना परिचित झालेली असली, तरी तिचा ललित विलास कथा, कादंबरी, विडंबन, आत्मचरित्र, चरित्र आणि अन्य प्रासंगिक लेखनातूनही प्रकर्षाने जाणवत राहतो आणि शब्दप्रभू आचार्य अत्रे यांची वैचारिक उंचीही लक्षणीय आहे, याची साक्ष पटते. विशेषत: आचार्यांच्या चरित्रलेखनात त्यांच्या विचारबहुल प्रतिभाविलासाचा प्रत्यय येतो; आणि चरित्रलेखनाच्या दालनातही अत्रे यांची लेखणी कशी लीलया संचार करते, त्याचे दर्शन घडते.

**चरित्रलेखन**

आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाचा विवेचक मागोवा घेण्याआधी आचार्यांचे चरित्रलेखन कोणते, याची समग्र नोंद करणे उचित होईल. पुस्तकाचे प्रकाशनवर्ष लक्षात घेऊन, कालानुक्रमे आचार्यांची खालील पुस्तके चरित्र या वाङ्मय प्रकारात वर्गीकृत केली आहेत :

१) दूर्वा आणि फुले (१९४५)
२) मराठी माणसे, मराठी मने (१९५६)
३) महात्मा फुले (१९५८)
४) विनोबा (१९५८)
५) दलितांचे बाबा (डॉ. आंबेडकर) (१९६०)
६) अब्राहम लिंकन (१९६०)
७) सूर्यास्त (१९६४)
८) इतका लहान, इतका महान (१९६६)
९) समाधीवरील अश्रू (१९६९)
१०) मृत्यूचे चुंबन घेणारा महाकवी (१९७३)
११) क्रांतिकारकांचे कुलपुरुष (१९८३)
१२) शापित कलावंत ऑस्कर वाईल्ड (१९८४)
१३) गडकरी सर्वस्व (१९८४)
१४) हुंदके (दुसरी आवृत्ती) (१९८९)

यांतील काही पुस्तकांमध्ये अत्रे यांनी लिहिलेले चरित्रविषयांचे प्रासंगिक लेख आहेत, तर काही लेख म्हणजे, त्यांनी पूर्वी केलेली भाषणे आहेत. रूढार्थाने ज्यांना आपण चरित्र म्हणतो, तशा प्रकारची ही चरित्रे नाहीत. अत्रे यांना त्या त्या वेळी त्या त्या चरित्रनायकांचे दर्शन जसे घडले, त्यांना ते ते चरित्रनायक जसे दिसले, त्याप्रमाणे त्यांनी त्या चरित्ररेखा रंगविल्या आहेत.

**'मी जसा आहे, तसाच रंगवा'**

चरित्रलेखनाच्या तंत्रमंत्राचा विचार करताना ऑलिव्हर क्रॉमवेलचे उद्गार

आधारभूत मानण्यात येतात. क्रॉमवेलने म्हटले आहे :

'Paint me as I am.'

(मी जसा आहे, तसेच माझे चित्रण करा.)

चरित्रलेखनाची एक चौकट असते. चौकटीत जी मोकळी जागा असते, ती मुक्तपणे वापरण्याचे स्वातंत्र्य लेखकाला असते. पण चौकट मोडून बाहेर डोकावण्याचे स्वातंत्र्य घेतले, तर चरित्र या साहित्यप्रकारालाच आव्हान ठरते. आचार्य अत्रे यांना या चौकटीचे तंत्र माहीत होते. पण अनेक वेळा त्यांना चौकटीबाहेरच जाण्याचा मोह झालेला दिसतो. याला कारण एकच आहे, की आचार्य अत्रे हे मनस्वी लेखक असल्यामुळे चरित्रनायकाचा जो पैलू ज्या प्रमाणात त्यांना भावत असे, त्या प्रमाणात त्या पैलूचे झगझगीत दर्शन आचार्य अत्रे घडवीत असत.

आचार्य अत्रे यांची अमर्याद जीवनशैली त्यांच्या लेखनशैलीतही प्रतिबिंबित होणे स्वाभाविकच होते; आणि ही अमर्याद लेखनशैली अन्य कोणत्याही साहित्यप्रकारापेक्षा अत्रे यांच्या चरित्रलेखनात प्रकर्षाने जाणवते. ऑलिव्हर क्रॉमवेलने 'मी आहे, तसाच रंगवा' असे सांगतानाही चेहऱ्यावरील आठ्या आणि व्रण रंगवा, असे सांगितले होते. आचार्य अत्रे आपल्या चरित्रनायकांच्या चेहऱ्यावरील आठ्या आणि व्रण रंगवतातच; पण कधी हे व्रण जास्तही असतील किंवा कमीही असतील. आचार्य अत्रे यांना आपले चरित्रनायक आपल्या रंगाने रंगवावयाचे असतात.

**विविध व्यक्तींच्या चरित्ररेखा**

नाना शंकरशेट, बाळशास्त्री जांभेकर, महात्मा फुले, लो. टिळक, महर्षी कर्वे, पंडिता रमाबाई, गाडगेमहाराज, स्वा. सावरकर, नाट्यछटाकार दिवाकर, आचार्य विनोबा भावे, डॉ. आंबेडकर, साने गुरुजी, राम गणेश गडकरी, श्यामाप्रसाद मुखर्जी, रँग्लर परांजपे, सोनोपंत दांडेकर, वेदमूर्ती सातवळेकर, विन्स्टन चर्चिल, महात्मा गांधी, सरदार पटेल, कर्मवीर भाऊराव पाटील, द. वा. पोतदार, लालबहादुर शास्त्री, खांडेकर, माटे, अ. ह. गद्रे, कृष्णराव मराठे, वा. म. जोशी, पं. नेहरू, इत्यादी विविध क्षेत्रांतील व्यक्तीसंबंधी आचार्यांनी चरित्रलेखन लिहिले. यापैकी बरेच लेख 'नवयुग' व 'मराठा' या पत्रांमधून नैमित्तिक स्वरूपात लिहिले असले, तरी त्या लेखांना नित्यमहत्वाचे अक्षरवैभव प्राप्त झाले आहे. 'सूर्यास्त' ही पंडित नेहरूंसंबंधी लेखमाला आणि 'इतका लहान, इतका महान' ही लालबहादुर शास्त्री यांच्यासंबंधी लेखमाला आहे. स्थलविस्तार-भयास्तव या ठिकाणी सर्वच नावांची यादी देता येत नाही. तशी ती देणे योग्यही नाही आणि आवश्यकही नाही.

पण यावरून ध्यानात येते, की महत्त्वाची गोष्ट म्हणजे, आचार्यांच्या चरित्ररेखा या जीवनाच्या विविध क्षेत्रांतील आहेत. समाजसुधारक, पत्रकार, कलावंत, राजकारणी, नेते, साहित्यिक, समीक्षक, शिक्षणतज्ज्ञ, वेदाभ्यासक, अधिकारी अशा अनेक क्षेत्रांतील महानुभावांची चरित्रे आचार्यांनी रेखाटली आहेत. सामान्यपणे आतापर्यंत ज्या ज्या चरित्रांचे लेखन



अनुक्रमणिका







वाङ्‌मयीन महात्मतेच्या दृष्टिकोनातून मान्यता पावले, त्याचा आढावा घेतला, तर असे ध्यानात येते, की एखाद्या चरित्रकाराने पाच-दहा चरित्ररेखा फार तर हाताळल्या असतील. आचार्य अत्रे यांचा लेखनविषयविस्तार या पार्श्वभूमीवर लक्षात घेण्यासारखा आहे. प्रासंगिक लेखन करावयाचे म्हटले, तरी इतक्या मोठ्या प्रमाणावर कर्तृत्ववान व्यक्तीचा जीवनशोध घ्यायचा हे केवळ अत्रेच करतात.

## घाईतले वाङ्‌मय

आचार्य अत्रे यांचे बहुसंख्य चरित्रलेख हे वृत्तपत्रीय लेखन आहे. साहित्याच्या क्षेत्रात साहित्याचे-विशेषतः, चरित्रात्मक साहित्याचे-मानदंड मानण्यात येतील, अशी चरित्रे मर्यादित संख्येने असतात. अशी चरित्रे लिहिलीच नाहीत. विनोबा आणि गाडगेबाबा यांची छोटी चरित्रे अत्रे यांनी लिहिली. ही चरित्रे सुबोध आहेत. लेखनशैली प्रसादगुणयुक्त आहे. पण चरित्रनायकाच्या दर्शनातून जीवनदर्शन घडविण्याचा चमत्कार चांगल्या चरित्रात घडतो आणि वाचकाच्या जाणिवेला विस्तृत परिमाण लाभते, तसे मात्र आचार्यांच्या चरित्रलेखनात घडते किंवा नाही, हा चर्चेचा विषय ठरेल.

सर्वच वृत्तपत्रीय लिखाण 'घाईतले वाङ्‌मय' या स्वरूपाचे असते. येते आणि जाते, असे ते वाङ्‌मय. यातील फारच थोडे वाङ्‌मय राहते. संगृहीत होण्याचे भाग्य सहसा अशा वृत्तपत्रीय लेखनाला लाभत नाही. आचार्यांचे घाईतील वाङ्‌मय हे मात्र संगृहीत झाले आणि त्याला साहित्याचा दर्जा मिळाला. हे साहित्य प्रामुख्याने चरित्रविषयक साहित्य आहे. प्रासंगिक लेखनाला साहित्यरूप लाभण्याची किमया आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनात दिसून येते, ती त्यांच्या उत्कट शैलीमुळे.

## विसंगती आणि सुसंगती

आचार्य अत्रे यांच्या उपलब्ध चरित्रसंग्रहांत आता जो मुद्दा मांडला जाणार आहे, तो कदाचित दिसून येणार नाही. पण चरित्रलेखसंग्रहात ग्रथित न झालेले त्यांचे अन्य चरित्रलेख वाचले, तर आचार्य अत्रे यांच्या भूमिकेतील विसंगती सहज ध्यानी येते. एकाच व्यक्तीसंबंधी त्यांनी उलटसुलट, स्तुतिपर आणि निंदाव्यंजक लेखन केलेले आढळते. याचे कारण आचार्य अत्रे यांच्या स्वभावातील प्रबळ रागद्वेष. राग अनावर झाला, की कोणाचाही, कसलाही मुलाहिजा न ठेवता आचार्य प्रतिपक्षावर तुटून पडत. असे त्यांचे तुटून पडणे त्यांच्याच चरित्रनायकांच्या नशिबी आलेले आहे. पण अनावर रागाची भरती ओसरली, ओहोटी सुरू झाली, की चित्र बदलते आणि आचार्यांना त्याच व्यक्तीच्या ठिकाणी गुणसमुच्चय दिसू लागतो. एका बाजूने ही विसंगती दिसेल, तर अत्रे यांच्या स्वभावरचनेचा विचार केला तर, तीच सुसंगती वाटेल.

साने गुरुजी, विनोबा भावे, सेनापती बापट, गाडगेबाबा, डॉ. आंबेडकर व म. फुले, आचार्य अत्रे यांची उपास्यदैवते होती. यांतील प्रत्येकाचा कोणता ना कोणता एखादा गुण आचार्यांच्या मनाला भावणारा, त्यांना अंकित करून टाकणारा वाटत होता.

विनोबांचा विचारवैभवविलास, साने गुरुजींची अपार करुणा, सेनापती बापट यांच्या क्रांतिकारी मुद्रेवरील अखंड निर्व्याज हास्य, गाडगेबाबांचा दीनदलितांविषयी उमाळा, डॉ. आंबेडकर यांची अपार ज्ञाननिष्ठा, म.फुले यांची सामाजिक समतेसाठी केलेली बंडखोरी या गुणांवर आचार्य अत्रे लुब्ध होतात आणि आपल्या लेखणीद्वारा शब्दफुलांची उधळण करतात. आचार्यांनी लिहिलेली ही प्रासंगिक चरित्रे वाचकाला विचार करायला लावणारी आहेत, असे म्हणण्यापेक्षा ती वाचकाला भारावून टाकणारी आणि मंत्रमुग्ध करणारी आहेत, असे म्हणणे अधिक युक्त होईल. आपल्या चरित्रनायकाविषयी अत्यंत उत्कटतेने उचंबळून लिहिणे हे आचार्यांचे वैशिष्ट्य. ते जागोजागी या लेखांत आढळते; आणि याच चरित्रनायकांविषयी आचार्यांनी आधी काय लिहिले, नंतर काय लिहिले, याची चिकित्सा वाचकाला करावी वाटत नाही, हे आचार्यांच्या चरित्रलेखनाचे यश.

### गडकरी-सर्वस्व

'यावज्जीवहि काय मी न कळले आप्तांप्रती नीटसे' असे स्वत:विषयीच लिहून ठेवणारे नाटककार राम गणेश गडकरी, तथा कवी गोविंदाग्रज तथा विनोदी लेखक बाळकराम हे आचार्य अत्रे यांचे गुरू, वेळोवेळी आचार्यांनी आपल्या गुरूसंबंधी जे लेखन केले, ते या पुस्तकात संकलित केले आहे. रूढार्थाने हे राम गणेश गडकरी यांचे चरित्र नाही. जन्मापासून मृत्यूपर्यंतचा कालपट, कर्तबगारीचा आलेख किंवा स्थळकाळव्यक्ती यांचे कालसुसंगत निर्देश, चरित्रनायकाच्या चरित्राच्या पार्श्वभूमीवर सामाजिक व राजकीय परिस्थितीची वळणे, इत्यादी अन्य चरित्रांत येणाऱ्या चारित्रिक गोष्टी या पुस्तकात दिसणार नाहीत. कारण बोलून चालून हे संकलन आहे, आठवणी आहेत, वर्णने आहेत, घटना आहेत, साहित्यविषयक विवेचन आहे.

व्यक्तिमत्त्व या पहिल्याच प्रकरणात गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू अत्रे यांनी शब्दांकित केले आहेत. गडकऱ्यांचा हट्टीपणा, शीघ्रकोपीपणा, त्यांचे अफाट वाचन, क्रिकेटचे वेड, लहान मुलांमध्ये मिसळण्याची त्यांची आवड, त्यांची सूक्ष्म निरीक्षण-शक्ती, इतिहासाचा अभिमान, हजरजबाबीपणा या सर्व व्यक्तिमत्त्व-वैशिष्ट्यांचे चित्रण आचार्य अत्रे यांनी अत्यंत समर्थपणे केले आहे.

गडकऱ्यांच्या प्रतिभाशक्तीची झेप आणि त्यांच्या मानसिकतेचे अंत:प्रवाह यांचे विवेचन 'झपूर्झा : संस्कारचित्र' या लेखात केले आहे. अशा प्रकारच्या लेखनात आचार्य एरवी जे उत्कट असतात, ते कमी प्रमाणात दिसतात. उलट, एक संतुलित वैचारिक अशी त्यांची प्रतिमा वाचकांच्या मनांत तयार होते.

### समीक्षक अत्रे आणि समाचार घेणारे अत्रे

गडकऱ्यांचे काव्य, गडकऱ्यांचा विनोद, इत्यादी पैलूंवर प्रकाश टाकताना आचार्य अत्रे यांची भूमिका चरित्रलेखकाबरोबरच साहित्यसमालोचकाची, समीक्षकाची असते. पण कधी कधी आपल्या या



अनुक्रमणिका

भूमिकेची वस्त्रे उतरवून समीक्षकाऐवजी समाचार घेणारे अत्रे अशी भूमिका घेतात. गडकऱ्यांचे वाङ्मय तपासून, त्याआधारे गडकऱ्यांचे चरित्र आजमावण्याचा प्रयत्न काही टीकाकारांनी केला होता. डॉ. हर्षे, डॉ. रा. शं. वाळिंबे, माडखोलकर या टीकाकारांनी असा प्रयत्न केला, तेव्हा साहजिकच आचार्य अत्रे यांचे लक्ष त्याकडे वेधले. त्यापैकी 'अरुण' कवितेवर समीक्षा लिहिताना माडखोलकर म्हणतात की, गडकरी नेहमी उशिरा उठत असत. त्यांनी अरुण कधी पाहिला ? आचार्य अत्रे यांना हा मुद्दा पटला नाही. वैचारिक वाद न करता ते समाचार घेण्यासाठी खवळून उठतात आणि विचारतात :

गडकरी उशिरा उठत, हे तुम्हांला कोणी सांगितले ? तुम्हांला काय त्यांचे अंथरूण गुंडाळायच्या कामावर कोणी नेमले होते काय ?

'मार भरारी, चल तोड बंधने सारी' या कवितेच्या धृपदाचा अर्थ प्रा. हर्षे यांनी असा लावला, की 'वैवाहिक बंधनांनी गडकरी पुढे जखडले गेल्यामुळे एक वेळ सर्व बंधने तोडून टाकून स्वैर भरारी मारण्याचाही विचार त्यांच्या मनात आला होता.' यावर आचार्य अत्रे संतप्त होतात आणि ते प्रा. हर्षे यांना 'दीडशहाणा टीकाकार' ही पदवी देऊन टाकतात. या ठिकाणी गडकऱ्यांचे चरित्रकार आचार्य अत्रे अशी भूमिका उरलेली नसते, तर गडकऱ्यांचे परमभक्त आचार्य अत्रे अशी भूमिका साकारलेली असते.

अत्रे हे गडकऱ्यांचे केवळ परमभक्त नव्हते, तर परमशिष्यही होते, हे त्यांनीच अनेक ठिकाणी नोंदवून ठेवले आहे. एखादा शिष्य आणि भक्त ज्या वेळी आपल्या गुरूचे व आपल्या देवतेचे चरित्ररेखाटन करतो, तेव्हा चरित्रलेखनासाठी आवश्यक असलेले असे 'ताटस्थ्य' त्यामध्ये असणे कठीण असते. अलिप्त भूमिकेतून चरित्रनायकाचे कर्तृत्व तपासणे चरित्रलेखकाला भक्त व शिष्य या भूमिका स्वीकारल्यानंतर शक्य नसते. 'गडकरी सर्वस्व' च्या उपसंहारात हीच गोष्ट स्पष्ट होते. गडकऱ्यांचे मूल्यमापन करावे, या हेतूने अत्रे लिहू लागतात आणि गडकऱ्यांनी मोलिअर व शेक्सपिअरवर सुद्धा मात केली, असे सांगून भक्त आचार्य अत्रे आपल्या देवतेला सर्वश्रेष्ठ ठरवून, उंच जागी सोनेरी देव्हाऱ्यात बसवतात; आणि उपसंहाराच्या शेवटी छत्तीस शब्दांचे एक सुंदर मोहनमाळेसारखे वाक्य लिहून ते आपल्या चरित्रनायकाला प्रणिपात करतात. 'म्हणून शब्दसृष्टीच्या या ईश्वराला, कल्पनेच्या या कोट्याधीश कुबेराला आणि कंठात देदीप्यमान विचारांची वाग्वैजयंती घालून महाराष्ट्राच्या हृदयसिंहासनावर अर्धशतक आरूढ होऊन असलेल्या प्रतिभेच्या या सम्राटाला त्यांच्या पन्नासाव्या पुण्यतिथीच्या प्रसंगी साऱ्या मराठी जनतेच्या वतीने आम्ही अनन्यभावाने साष्टांग प्रणिपात करतो.'

### व्हिक्टोरियन चरित्रकार

चरित्रतंत्राचा अभ्यास करू इच्छिणारे अभ्यासक 'लिटन स्ट्रॅची'ला टाळून पुढे जाऊ शकत नाहीत. 'आचार्य अत्रे साहित्य आणि समीक्षा' या आपल्या ग्रंथात डॉ. एस्. एस्. भोसले (अजब पुस्तकालय,

कोल्हापूर) यांनी आचार्यांच्या चरित्र-आत्मचरित्रपर लेखनाचा परामर्श घेतला आहे. आचार्य अत्रे हे स्ट्रॅचीच्या परंपरेतील नव्हे, तर व्हिक्टोरियन युगातील स्तुतिघोळ घालणाऱ्या चरित्रकारांचे वारस ठरतात.

डॉ. भोसले यांनी वापरलेला 'स्तुतिघोळ' हा शब्द अतिव्याप्त वाटतो, हे खरे; पण त्यांनी आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाची जातकुळी जो संदर्भ देऊन सांगितली आहे. तो संदर्भ पाहता अत्रे हे व्हिक्टोरियन युगातील चरित्रकारांचे वारस ठरतात, हे विधान असत्य ठरत नाही. अलिप्तता, पारदर्शकता, वैचारिक डूब, ताटस्थ्य, समाजदर्शन, जीवनशोध, संतुलित व्यक्तिचित्रण, प्रामाणिक, पण बुद्धिनिष्ठ मूल्यमापन ही चरित्रलेखनाची महत्त्वाची वैशिष्ट्ये मांडण्यात येतात. स्ट्रॅची परंपरेतील चरित्रकार अशी चरित्रे लिहितात. व्हिक्टोरियन युगातील चरित्रकारांच्या चरित्रलेखनात भक्तिभाव, राजनिष्ठा यांच्यामुळे स्तुतिभार अधिक येतो. अर्थातच भोसले यांचे मत सर्वार्थाने आचार्यांच्या चरित्रलेखनाबाबत ग्राह्य मानता येत नाही; कारण आचार्यांच्या चरित्रलेखनात व्हिक्टोरियन स्तुतिघोळ नाही, तर खास महाराष्ट्रीय स्तुतिविलास आहे, असे म्हणावे लागेल. आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाची शीर्षके नुसती वाचली, तरी भक्तिभावातून निर्माण होणारा त्यांचा स्तुतिविलास लक्षात येईल. काही शीर्षके अशी :

मृत्यूचे चुंबन घेणार महाकवी : साने गुरुजी

भारताच्या स्वातंत्र्याचा सरदार : सरदार वल्लभभाई पटेल

इतका लहान, इतका महान लालबहादुर शास्त्री

पुण्याचा तेजस्वी ब्राह्मण : दत्तो वामन पोतदार

नवीन स्त्री निर्माण करणारे तत्त्वज्ञानी कादंबरीकार : वा. म. जोशी

आमचे सनातनी दोस्त : कृष्णराव मराठे

महाराष्ट्राचे शैलीदार साहित्यिक : माटे

आचार्य अत्रे हे आपल्या चरित्रनायकाचे स्तुतिपाठक नाहीत किंवा त्यांच्या लेखनात स्तुतिघोळ नाही. मात्र शिष्यभावाने किंवा भक्तिभावाने केलेला स्तवनविलास आहे. त्यामुळे व्हिक्टोरियन चरित्रकारांचा वारसा अत्रे चालवतात, असे म्हणण्यापेक्षा या वारशाला अत्रे यांनी खास मऱ्हाटी वारकरी भक्तिभावाचे रूप दिले आहे, असे म्हणणे योग्य होय.

### ऑस्कर वाइल्ड

'नवयुग' साप्ताहिकाच्या दिवाळी विशेषांकात ऑस्कर वाइल्डच्या शोकात्म आणि शौकात्म जीवनाचा परिचय 'शापित कलावंत' या शीर्षकाखाली करून दिला होता. आपले गुरू राम गणेश गडकरी यांच्याप्रमाणे ऑस्कर वाइल्ड यांनाही अत्रे मानत असत. अत्रे व ऑस्कर वाइल्ड यांच्यामध्ये बरेच साम्य होते. 'दोघांचेही चारित्र्य आरभाट आणि व्यक्तिमत्त्व अफाट होते. दोघांची स्मरणशक्ती तल्लख होती. दोघेही सारखेच आत्मपूजक होते. दोघेही विलक्षण बोलके असून, विनोदी वक्तृत्वासाठी प्रसिद्ध होते. या दोघांच्याही संभाषणांत विरोधाभासाचा विलास असे. दोघांचाही कल अतिशयोक्तीकडे झुकणारा

होता. दोघांनाही खटले आणि खटली यांना सतत तोंड द्यावे लागले.' (स. गं. मालशे)

अर्थातच अत्र्यांच्या ठाया विभूतिपूजेची प्रधान प्रवृत्ती होती. मात्र ऑस्कर वाइल्ड हे विभूतिपूजक नव्हते. तरीही अत्रे यांना ऑस्कर वाइल्डचे विशेष आकर्षण होते. प्रा. स. गं. मालशे म्हणतात,

'स्वत:शी वृत्तिसाम्य असणाऱ्या एका पाश्चात्य प्रतिभावंताच्या करुण कहाणीचे कथन आचार्यांनी कुतुहलपूर्वक, समरसून, अगदी अतिशय वेधकपणे केले आहे. या हृदयंगम लेखनातील कलात्मक उन्मेषाचा आस्वाद रसिक वाचक सहानुभूतीनेच नव्हे, तर सहअनुभूतीनेही घेतील, असा विश्वास वाटतो.'

'शापित प्रतिभावंत' अशा शीर्षकाच्या या चरित्र-पुस्तकात ऑस्कर वाइल्ड यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकताना आचार्य अत्रे यांनी एका वाङ्मयीन उलटतपासणीत प्रतिपक्षाचा मर्मभेद वाइल्डने कसा केला, याचा प्रत्यक्ष संवादच दिला आहे. साहित्यविचाराच्या दृष्टीने हा संवाद महत्त्वाचा आहे.

ऑस्कर वाइल्ड हा हास्यापेक्षाही अश्रूंचा प्रभावी निर्माता होता. आचार्य अत्रे त्याला अमर कीर्तीचा कलावंत, सौंदर्यपूजकांचा सम्राट आणि करुणरसाचा महाकवी अशी बिरुदे बहाल करतात. हास्याचा आणि अश्रूंचा ऊर्जस्वल उद्गाता असे ते वाइल्डविषयी म्हणतात. आचार्य अत्रे यांच्या इतर चरित्रलेखनापेक्षा हे लेखन वेगळ्या वाटेने जाणारे, वेगळे परिमाण लाभलेले असे आहे. एका पाश्चात्त्य शापित कलावंताचे अत्रेकृत हे चरित्र वाचले की, कला अथवा कलावंत हे स्थलकालधर्मनिरपेक्ष दृष्टिकोनातून अभ्यासले पाहिजेत, हे लक्षात येते.

## चरित्रवाङ्मयाचे थोरपण

चरित्रवाङ्मयाची थोरवी कोणत्या मापन-पद्धतीने मोजता येते? चरित्राची महत्ता कशी ठरवता येते? यावावत वेगवेगळ्या समीक्षकांची स्वतंत्र मते असू शकतात; पण एक महत्त्वाची गोष्ट अशी, की चरित्राला वास्तवाचे पूर्ण पथ्य असते. चरित्रामध्ये कुठेही काव्यनिकषतेचे कुपथ्य आले, की चरित्राला धक्का मिळाला, असे होते. आचार्य अत्रे यांनी चरित्रवस्तू सादर करताना हे पथ्य पाळले होते. चरित्रापासून बोध हा अगदीच प्राथमिक हेतू झाला. चरित्रवाचनाने बोध व्हावा, की आनंद व्हावा, की दोन्हीही व्हावे, याची चर्चा खूप करता येईल. पण चरित्राची थोरवी कोणत्या महत्वाच्या वैशिष्ट्यांवर अवलंबून आहे ? चरित्रनायक जगला कसा, त्याचे कर्तृत्व कोणत्या हिमतीवर आधारलेले? त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान कोणते ? या प्रश्नांची उत्तरे शोधता येणे आवश्यक आहे. चरित्रनायकाच्या जीवनाचे धागेदोरे उलगडून दाखविताना चरित्रनायकाच्या अंतर्मनातील विविध आंदोलने, खळवळी, त्याचे दृष्टिकोन यांचा मागोवा घेता आला पाहिजे. आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाद्वारे असा मागोवा थेटपर्यंत घेता येईलच, असे नाही.

## लेखनशैली

आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाच्या शैलीविषयी एकच शब्द पुरेसा आहे, की अत्रे 'उमाळ्या' ने लिहितात, अंत:स्फूर्ती,

आवेश, पोटतिडीक या भावनांनी युक्त अशी त्यांची लेखणी शब्दधारा स्रवू लागते, तेव्हा दोन्ही काठांना कवळत खळाळत्या नदीचा प्रवाह फेसाळत वेगाने पुढे जातो, त्याची आठवण होते. सुभाषितांची जागोजागी पेरणी, सुंदर व प्रत्ययकारी शब्दांची फवारणी आणि वाक्प्रचार-म्हणींचा चपखल वापर हे अत्रे यांच्या लेखनशैलीचे वैशिष्ट्य जागोजागी आढळते.

आचार्य अत्रे यांनी 'मी कसा झालो' मध्ये स्वत:विषयी लिहिले आहे :

'मी जीवनाचा यात्रेकरू आहे. माझ्या खांद्यावरची पताका अजून खाली होत नाही.'

आचार्यांच्या या जीवनविषयक तत्त्वज्ञानाला अनुसरूनच त्यांची जीवनशैली आणि त्यांची लेखनशैली प्रतीत होते. जीवनाविषयीचे विलक्षण कुतूहल त्यांना होते. ही जिज्ञासा, हे कुतूहल त्यांना सतत सजग ठेवण्यास कारणीभूत होत होते. ही जीवनजिज्ञासा अखेर जीवनविषयक चिंतनात परावर्तित झालेली दिसते; आणि स्वाभाविकपणे आचार्यांच्या लेखनशैलीला नकळत चिंतनाची डूब प्राप्त होते.

चरित्रात निखळ घटिते असतात; पण या घटितांची कलापूर्ण कहाणी असते. आचार्य अत्रे अशा निखळ घटितांचा मर्यादित वापर करतात. पण ज्यांचा करतात, त्यांची अधिक उत्कटतेने ते कलापूर्ण कहाणी सादर करतात.

मराठीतील एक कलंदर कवी 'मनमोहन' यांच्या एका छंदाविषयी या ठिकाणी तीव्रतेने आठवत होते.

अव्वल दर्जाची प्रतिभा असलेल्या मनमोहन कवींची उत्कट वृत्ती केव्हा, कशी वळण घेईल, हे कुणी सांगावे?

रोज सकाळी उठून एक गणपतीचे आणि एक देवीचे चित्र काढायचे आणि एक गणपतीची आणि एक देवीची आरती लिहायची, असा मनमोहन यांचा परिपाठ होता.

ही चित्रे म्हणजे मुक्तकलेचे मोहक नमुने होते. अशा शेकडो चित्रांचे एक प्रदर्शन मनमोहन यांनी भरवले होते.

चित्रकला समीक्षकांना यात जरूर काही मुद्दे सापडले असतील. पण रसिकांना ही गणपतीची-देवीची विविध रूपे आवडली होती, हे निश्चित. 'त्या दिवशी, त्या वेळेला, कवीला भावलेले रूप' अशी या चित्राची शैली होती.

आचार्यांच्या चरित्रलेखनाची शैली जवळपास अशीच आहे. ज्या वेळी, ज्या प्रसंगी, ज्या चरित्रनायकाचे जे रूप, जसे भावले, तसे आचार्यांनी रेखाटले आहे.

अत्रे यांचे चरित्रलेखन हे त्यांच्या मनाचे प्रांजळ आरसे आहेत. त्यांनी रेखाटलेल्या प्रतिमांमध्ये चेहरा चरित्रनायकाचा असला, तरी दर्शन आचार्य अत्रे यांच्या उत्कटतेचेच असते, यात काही शंका नाही.

□

आचार्य अत्रे : प्रतिभा आणि प्रतिमा या ग्रंथातून साभार.

□

डॉ. न. म. जोशी
१०१३, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका

# चरित्रांतील लय

डॉ. द. न. गोखले

क्रांतिवीर बाबाराव सावरकर हे मी लिहिलेले पहिले चरित्र १९७४ साली प्रसिद्ध झाले. त्यावेळी चरित्रातील लयाची मला मुळीच कल्पना नव्हती. डॉ. केतकर हे दुसरे चरित्र १९५२ साली प्रसिद्ध झाले. त्यावेळीही लयाची कल्पना माझ्या जाणिवेत नव्हती. पण या लयीमुळे जे सौंदर्य चरित्रात उत्पन्न होते, त्याचा अनुभव मला तेणिवेत कुठेतरी आला असावा. त्या चरित्रात जी लय साधली आहे ती आपोआप साधली आहे. तिच्यासाठी मी जाणीवपूर्वक काही प्रयत्न केला नव्हता. डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन हे चरित्र १९७८ साली प्रसिद्ध झाले. ते लिहीत असताना लयीची कल्पना माझ्या मनात उदय पावली. त्या चरित्राची निर्मिती-वृत्तान्त सांगणाऱ्या 'एका चरित्राचे चरित्र' (१९८५) या माझ्या पुस्तकात पृ. ६२ वर व पृ. ७२ वर लयीचे स्पष्ट निवेदन झाले आहे. मी म्हटले आहे. 'चरित्रात ही संमिश्र, समृद्ध लय जर सारखी झंकारत राहिली तर वाचकांच्या नकळतही वाचकांना सुखावून जाईल.'

चरित्रांतील ही लय कोणती? या प्रश्नाच्या उत्तरांसाठी आधी माझी लयीची कल्पना सांगितली पाहिजे आणि ती चरित्रात कशी येते ते नंतर सांगितले पाहिजे.

'लय म्हणजे नावीन्यात लपेटलेली आवर्तने' ही माझी कल्पना आहे. समजा, एक बोलके घड्याळ आहे; ते दर तासाला आवाज करते. एक वाजला की ते म्हणते, 'एक', दोन वाजले की ते म्हणते, 'दोन', तीन वाजले की ते म्हणते, 'तीन', इत्यादी. येथे दर तासाचे आवर्तन होते; पण त्यात नावीन्य आहे काय ? एक, दोन, तीन इत्यादी शब्दांत फरक आहे; पण त्या फरकाला नावीन्य म्हणण्यास आपण धजावणार नाही. उलट पहिल्या तासाला घड्याळातून 'एक' हा शब्द आला, दुसऱ्या तासाला कोंबडा ओरडला, तिसऱ्या तासाला मोराची केका ऐकू आली, चवथ्याला पोपट बोलू लागला तर आवर्तने नावीन्यात लपेटलेली आहेत, असे आपण म्हणू. म्हणजे तेथे लय उत्पन्न झाली. अशी लय चरित्रात कोठे असते?

चरित्राच्या आशयाला साधारणतः तीन वर्गात वाटता येते. १, चरित्र नायकाच्या भोवतालची स्थिती -environment, २, चरित्र नायकाचा जीवनक्रम Career, आणि ३, चरित्र नायकाचे व्यक्तित्त्व-Character, या तीन वर्गांत लय कुठे असते?



अनुक्रमणिका



एखाद्याच्या जीवनक्रमात पुढील टप्पे असतील. प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, रेल्वेत नोकरी, गावाकडचे निवृत्त जीवन, आजार, मृत्यू. या टप्प्यांत आवर्तने कुठे आहेत? कदाचित, रेल्वेत नोकरी या एका टप्प्यात आवर्तने असतील. पण ती सर्व टप्प्यांना व्यापणारी नसतील नि त्यांच्यात वेगवेगळेपणा असला तरी तेवढे नावीन्य नसेल. याच माणसाच्या भोवतालची स्थिती पाहिली तर त्या प्राथमिक शाळेभोवती असलेले शहर, शहरी माणसे नि शिक्षक, रेल्वे मधले ते स्टेशन, त्या आगगाड्या, ते उतारू, ते पोर्टर; गावाकडच्या एकलकोंड्या जीवनात आजार, काळजी;- आणि शेवटी मृत्यूच्या वेळी मृत्यूशय्या ! या परिस्थितीत प्रत्येक टप्प्यावर नावीन्य असेल, पण आवर्तने असतील का? कदाचित, रेल्वेमधील नोकरीत बदल्या नि बढत्या यामुळे परिस्थिती आवृत्त होईल, तिच्यात थोडाथोडा बदलही होईल. पण या आवर्तनात नि नावीन्यात जीव नसेल. सर्व सामान्यपणे असे म्हणता येईल की, परिस्थिती नि 'जीवनक्रम' ही कोणाही माणसाच्या जीवनात लय आणण्यास फारशी सक्षम नसतात.

चरित्रातील आशयाचा तिसरा वर्ग—'व्यक्तित्व.' परिस्थिती नि जीवनक्रम याहून व्यक्तित्वाची बाब वेगळी असते. व्यक्तित्त्व स्वभावत: आवर्तनांना आणि नावीन्याला वाव देते. व्यक्तित्त्वाला विविध अंगे आणि उपांगे असतात. की निरनिराळ्या काळी, निरनिराळ्या परिस्थितीत, निरनिराळ्या रूपांनी प्रकट होतात. म्हणजे त्यात आवर्तने असतात नि नावीन्यही असते. एखाद्या माणसाचा हट्टीपणा लहानपणी नावडते दूध न पिण्यात, तरुणपणी हव्या त्या परजातीय मुलीशी लग्न करण्यात, नि म्हातारपणी वैद्याची औषधे स्वीकारून डॉक्टरांची औषधे कटाक्षाने धिक्कारण्यात होतो. हट्टीपणा तोच असतो पण तो वेगवेगळ्या प्रसंगी नि वेगवेगळ्या संदर्भात अनुभवाला येतो. यात एक लय नसते का? आणि याच माणसाच्या व्यक्तित्त्वात हट्टीपणा बरोबर कदाचित भित्रेपणाही असेल. मोकळ्या, उघड्या माळावर एकटे फिरायला जाताना किंवा परीक्षेला बसताना किंवा होडीतून भर नदीत प्रवास करताना, हा भित्रेपणा प्रकट होईल. दुसरी आवर्तनात दडलेली नि नावीन्यात नटलेली लय उमटू लागेल. व्यक्तित्त्वात अनेक घटक असतात. सर्व घटक नि उपघटक आवर्तन पावतात, आणि ती आवर्तने निरनिराळ्या कालखंडानुसार उमटतात; मिळून एक संमिश्र, समृद्ध लय चरित्रभर झंकारत राहते.

व्यक्तित्त्व घटकातील ही लय ध्यानी घेत असता व्यक्तित्व चरित्राला खरी एकरूपता देऊ शकते, हेही ध्यानी घेतले पाहिजे. याआधी, परिस्थिती नि जीवनक्रम यांसंबंधी थोडे लिहिले आहे. त्यावरून, हे स्पष्ट होईल की दोन्हींत सलगतेपेक्षा तुटकपणा अधिक असतो; आणि हा तुटकपणा मूर्त—physical असतो. एकच व्यक्ती निरनिराळ्या परिस्थितींतून नि जीवनक्रमांतून जात असते, म्हणून ती एका सूत्रात ओवली जातात. व्यक्तित्त्वाच्या निरनिराळ्या आविष्कारांत नावीन्य असले तरी त्यांत आवर्तने असतात. ते मूर्त एकरूप नसले,

physically भिन्न वाटले, तरी त्याची 'रूपे', भिन्न असतात. 'ते' एकच असते, एकजीव असते, त्यात organic अभिन्नत्व असते. इवलेसे रोपटे, हिरव्यागार पानांनी लवथवलेले झाड, नि शेंदरी, पिवळ्या फळांनी लहडलेला परिपक्व वृक्ष ही आंब्याची सकृद्दर्शनी सुटी वाटणारी रूपे असली तरी आंबा जसा एकच असतो तसेच व्यक्तित्त्वाचे असते. प्रतिक्षणाला नवे रूप धारण करणारे, पण तेच असणारे हे व्यक्तित्त्व चरित्राला एकरूपता देण्यास समर्थ असते.

व्यक्तित्त्वाचे हे सामर्थ्य न जाणल्यामुळे आणि त्यातील संमिश्र, समृद्ध पण सूक्ष्म लय न ओळखल्यामुळे बरेच मराठी चरित्र वाङ्मय आपले खरेखुरे गुणनिधान हरवून बसले आहे.

'स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य' आणि 'गांधीजी : मानव नि महामानव' हे माझे दोन व्यक्ति-विमर्शात्मक ग्रंथ १९८९ नि १९९६ या साली प्रसिद्ध झाले. व्यक्तित्त्वाचे मनावर ठसलेले महत्त्व हे तर चरित्राकडून चरित्रसदृश व्यक्तिविमर्शाकडे वळण्याचे कारण होतेच, पण व्यक्तिविमर्श लिहीत असताना चरित्रातील लयीचे महत्त्व माझ्या डोक्यात अधिक विंबले. चरित्रात साधारणत: कालक्रमाने निवेदन केले जाते आणि जसजसे अनुकूल प्रसंग येतील तसतसे त्यातून व्यक्तित्त्वाचे घटक नि उपघटक व्यक्त होत राहतात. त्यांत आवर्तने नि नावीन्य असते. आणि लय उत्पन्न होते. पण व्यक्तिविमर्शात व्यक्तित्त्वाच्या विश्लेषणावर भर असल्यामुळे व्यक्तित्त्वाचा एकेक घटक किंवा उपघटक घेऊन, त्याची सर्व उदाहरणे एकदम सांगून लेखकाला पुढे जावे लागते. त्यामुळे लयीला वाव मिळत नाही. लय हे चरित्राचे खास वैशिष्ट्य आहे, हे मनावर ठसते.

ज्या चरित्र लेखकाला व्यक्तित्त्व नि लय यांचे महत्त्व पटले असेल त्याच्या संशोधनावर संकलनावर, निवडीवर नि मांडणीवर परिणाम होतो. व्यक्तित्त्वाचे निरनिराळे घटक नि उपघटक यांचे संशोधन नि संकलन तो आवर्जून करतो. त्यांचे सर्व आविष्कारही नोंदवून ठेवतो. चरित्रात निवड फार महत्त्वाची असते. लेखकाच्या मनावर चरित्रनायकाचा जो ठसा उमटलेला असेल तोच ठसा वाचकांच्या मनावर उमटावा म्हणून चरित्रसामग्रीची निवड नि मांडणीही त्याला करावी लागते, या वेळी संशोधित नि संकलित माहिती मधला काही भाग तो घेतो, तर काही भाग गाळतो. उदाहरणार्थ, कविवर्य माधव जूलियन स्वभावाने थोडे कृपण होते. म्हणून त्यांच्या कृपणपणाची दोनतीनच उदाहरणे त्यांच्या चरित्रात मी प्रसंगाप्रसंगाने दिली आहेत. पण कविवर्य यशवंत किंवा श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी सांगितलेल्या आठवणींत त्यांच्या कृपणपणाची आणखी उदाहरणे मला समजली होती आणि ती चुरचुरीत नि परिणामाकारकही होती. तरी मी ती गाळली. कृपणपणाची काही आवर्तने टाळली व त्यांची लय होऊ दिली नाही. माधव जूलियन कृपण असले तरी ते मुख्यत: तसे नव्हते, असा ठसा मला वाचकांच्या मनावर उमटवायचा होता. उलट, स्वत:ला त्रास झाला तरी पटलेली गोष्ट अट्टाहासाने करायची असा माधवरावांचा एक










स्वभावविशेष होता आणि तो वाचकांच्या मनावर ठसावा, अशी माझी इच्छा होती. तेव्हा त्याची अनेक उदाहरणे मी प्रसंगाप्रसंगाने दिली आणि त्यांची एक मंद लय झंकारावी, अशी व्यवस्था केली. शिकत असताना माधवरावांचे मन केव्हा केव्हा विचलित होई आणि मन अभ्यासावर एकाग्र झाले पाहिजे, हे तर त्यांना पटले होते. तेव्हा, ते एक वेताची छडी घेत नि स्वत:च्या शरीरावर सपकारे ओढीत! बाळंतपणाचा त्रास लीलाबाईंना पुन:पुन्हा होऊ नये म्हणून, त्या जुन्या काळात, त्यांनी स्वत:वर शस्त्रक्रिया करवून घेतली! शेवटच्या आजारात ते भयंकर व्यथा मुकाट सहन करीत नि दुसऱ्याला मन:स्ताप नको म्हणून गप्प राहात ! त्या आजारात आंबट आवळा त्यांना खावासा वाटे. पण त्यामुळे लीलाबाईंना आजार वाढण्याची भीती वाटे. म्हणून ते आवळा उशीखाली लपवीत ! अशी उदाहरणे देत देत ती लय साधण्याचा मी प्रयत्न केला आहे.

शेवटी, असा एक प्रश्न उत्पन्न होतो की चरित्रातील लय वाचकाला कळते का, आणि त्यामुळे आनंद होतो का ? त्याला उत्तर असे, की वाचकाला लय कळो की न कळो, ती मुळे एक लज्जत चरित्रात उत्पन्न होते आणि वाचकाला नूपुर, खुळखुळल्याचा मंद झंकार खुलवीत राहातो. चरित्रातील लयीची कल्पना नवी आहे. त्यामुळे काही चांगल्या चरित्रकारांनी लेखनात लय 'लय' म्हणून आणली नसेल आणि ती दुसऱ्याच्या लेखनातही त्यांना कदाचित जाणवणार नाही. पण लयीची कल्पना घेऊन काही उत्कृष्ट मराठी नि इंग्रजी चरित्रात शिरकाव केला तर त्यांत लय नक्की दिसते. नाहीतरी, लय हे आनंददायक असे साहित्यातील, चरित्रातील तत्त्व आहे. साहित्याने आनंद का होतो, हे सांगताना सविकल्प समाधी, पुन:श्चप्रत्यय, जिव्हाळ्याचे ज्ञान वगैरे तत्त्वे पुढे आलेली आहेत. ती विश्लेषणाचा नि चिंतनाचा परिणाम होत. वाचनाच्या वेळी त्यांची जाणीव कोणी ठेवीत नाही नि त्यांचे नामकरण तर मुळीच करीत नाही. तरीही ती आनंद देतातच !

दुसरा प्रश्न असा उत्पन्न होतो, की वास्तव जीवनात अशी लय असते का? ती आपल्याला समजते का? प्रथमत: हे लक्षात घेतले पाहिजे, की लय नावीन्यपूर्ण आवर्तनातून नि अंतत: निवडीतून उमटते. संशोधनात नि संकलनात जी अस्ताव्यस्त, विस्कळीत माहिती एकत्र झालेली असते, तिला निवडीच्या प्रक्रियेत काही उद्दिष्ट लाभते आणि तिच्यातील नीरस, चोथट भाग गळून प्रातिनिधिक, वैशिष्ट्यपूर्ण तेवढा भाग शिल्लक राहतो. अफाट जीवन जणू लहान होते आणि साठ-सत्तर वर्षे जे आयुष्य चरित्रनायक जगलेला असतो ते तीन-चारशे पृष्ठांत वाचकांसमोर लहान होऊन खडे उभे राहाते. दूर दूर गेलेले घटना प्रसंग जवळ येतात, व्यक्तित्त्वाच्या घटकांची आवर्तने दिसू लागतात, आणि त्यांची लय कानाशी मंजूळ गुंजारव करू लागते. अनेक घटकांच्या अनेक लयी, उपघटकांच्या हळू हेलावणाऱ्या उपलयी, सर्व एकाच व्यक्तित्त्वाची अंगे असल्यामुळे त्यांच्यातील संगती किंवा मेळ यांचे एक वाद्यसंगीत तयार

*(कृपया पान ६४ वर पहा)*

# चरित्रलेखन : लालित्याचा कोमल स्पर्श हवा !

डॉ. वि. रा. करन्दीकर

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकांचे पत्र आले की, या वर्षीच्या दिवाळी अंकासाठी चरित्रलेखनाविषयींचे आपले विचार आणि अनुभव व्यक्त करणारा एक लेख लिहावा. वास्तविक पाहता मी चरित्रकार नाही. वाचकांसमोर माझी तशी प्रतिमाही नाही. माझे चिंतनाचे विषय वेगळे आहेत. तरी संपादकांच्या आग्रहामुळे हे धाडस करीत आहे. समर्थ रामदासांचे सुमारे सव्वाशे पृष्ठांचे एक चरित्र मी लिहिले. समर्थांच्या निर्याणाला तीनशे वर्षे पूर्ण झाली, हे निमित्त होते. नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया या दिल्लीच्या संस्थेचे पत्र आले, म्हणून ते लिहिले गेले. त्याचे कानडी भाषांतर नुकतेच प्रसिद्ध झाले. इतर भारतीय भाषांमध्ये त्याचे भाषांतर यथाकाल प्रसिद्ध होईल. मराठीत दुसरी आवृत्ती काढत असल्याचे त्यांनी कळवले आहे.

'रामकृष्ण आणि विवेकानन्द' हा जवळजवळ सहाशे पृष्ठांचा माझा ग्रंथ, चरित्राला जवळ येणारा आहे. त्याचे सर्व थरांत स्वागत झाले. मराठीत दुसरी आवृत्ती निघाली आणि इंग्रजी भाषांतरही प्रसिद्ध झाले. आपल्या देशात आध्यात्मिक क्षेत्रातील अनेक थोर पुरुष होऊन गेले. पण त्यातील कोणाचाही समग्र आणि विश्वसनीय जीवनवृत्तांत मिळत नाही. रामकृष्ण आणि विवेकानन्द हे त्याला अपवाद आहेत. त्यांच्या आयुष्यातील सारा तपशील उपलब्ध आहे. ज्यांना त्यांची मते मान्य नव्हती, अशा व्यक्तींनीही स्वतः पाहिलेल्या घटना लिहून ठेवल्या आहेत. हा एक दुर्मिळ योग आहे. आधुनिक पाश्चात्य संस्कृतीचे आक्रमण या देशावर झाले होते, आणि या भूमीत फार प्राचीन काळापासून जोपासल्या गेलेल्या मूल्यांना जबरदस्त धक्का बसला होता. त्या मूल्यांना फार मोठा अर्थ आहे हे तर या दोन विभूतींनी दाखवून दिलेच, पण विवेकानन्दांनी भारतीय संस्कृतीचे जे स्वरूप अमेरिकेत जाऊन तेथील विद्वान व्यक्तींसमोर ठेवले, त्यामुळे तिकडचा सुशिक्षित वर्ग भारावून गेला. आता शंभर वर्षे उलटली, तरी विश्वधर्माकडे घेऊन जाणारा विवेकानन्दांचा विचार तिकडे आपला प्रभाव टिकवून आहे. ही सामान्य घटना नाही. या दोघांचा काळाशी असलेला संबंध एवढ्यावरून स्पष्ट होईल. अध्यात्मिक या शब्दाने बुद्धिवादी माणसाने बिचकण्याचे कारण नाही. या दोघांच्या विचारांना ऐहिकाचा सुस्पष्ट स्पर्श आहे, विज्ञानाशी

त्यांचे नाते आहे, आणि बुद्धिवादी मनुष्य जी जीवनमूल्ये मानतो त्या सर्वांचा स्वीकार त्यांनी केलेला आहे. विशिष्ट संवेदनशीलता आहे. ज्यांना ती भावत नसेल, त्यांनी तो भाग बाजूला ठेवला तरी कोणतीही हरकत नाही. या महापुरुषांचे श्रेष्ठत्व तरीही अबाधित राहते.

त्यांच्या जीवनाला आकार देणाऱ्या महत्त्वाच्या घटनांचा निर्देश प्रस्तुत ग्रंथात आलेला आहे, या दृष्टीने त्याला चरित्र म्हणता येईल. पण चरित्राविषय झालेल्या व्यक्तीचा इत्थंभूत जीवनवृत्तांत आला पाहिजे, या दृष्टीने पाहू गेले तर त्याला काही मर्यादा पडतील. रामकृष्ण आणि विवेकानन्द या दोघांचे सर्वांगीण तौलनिक दर्शन घडवण्याचा प्रयत्न त्या ग्रंथात केलेला आहे, असे म्हणणे सयुक्तिक ठरेल. अगदी परस्परविरुद्ध वातावरणातून आलेल्या आणि तितकीच स्वतंत्र व्यक्तिमत्त्वे असलेल्या या दोन महान व्यक्तींमध्ये एक आंतरिक नाते आहे. हे कसे घडून आले, यावर काही प्रकाश टाकावा हा त्या लेखनाचा हेतू आहे. या ग्रंथाचे लेखन करीत असताना तुम्ही कसकसा विचार केलात आणि त्याला हे रूप प्राप्त करून दिलेत, ते विस्ताराने लिहा; असे मला काही जाणकार व्यक्तींनी म्हटले. पण ते शब्दबद्ध करणे आपल्याला शक्य होणार नाही असे वाटले. दोघांची चरित्रे डोळ्यांसमोर होती. त्यांतील परस्परांशी संबद्ध असा जो भाग जसजसा जाणवला, तसतसा तो कागदावर उतरला गेला. या लेखनात कोणाला काही पूर्वयोजना जाणवली असले, तर तो केवळ योगायोग समजावा.

लेखनासाठी या दोन व्यक्तींची निवड का केली, असा प्रश्न कोणीकोणी केला आहे. त्यामागे अगदी तरुण वयापासून असलेले माझ्या मनातील एक कुतूहल आहे. कर्तृत्वाचे कोणतेही क्षेत्र वर्ज्य मानण्याचे कारण नाही. बरा असो वा वाईट, मानवी जीवनातील कोणताही अनुभव उपेक्षणीय असत नाही. पण यामध्ये काही श्रेणी असू शकते. कोणाकोणाची जीवने एखाद्या विशिष्ट क्षेत्रापुरती मर्यादित असतात. काही व्यक्तींची आयुष्ये अशी असू शकतात की, ती एखाद्या संपूर्ण समाजाच्या भवितव्याला दिशा देऊन जातात. पण त्यातही कालसापेक्ष आणि कालाच्या अतीत असा एक फरक पडतो. लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी यांनी केलेल्या राजकीय चळवळी त्या त्या काळाला अनुसरून होत्या. आता तसे राजकारण कोणी करणार नाही. पण लोकमान्यांचा निष्काम कर्मयोगाचा संदेश आणि गांधीजींचा सत्य अहिंसेचा पुरस्कार, यामध्ये कालाच्या मर्यादेच्या पलीकडे पोचणारे असे काहीतरी आहे. त्याच्याही पलीकडे पोचले, तर अवघ्या मानवजातीला आपले जीवन उदारतेच्या दिशेने नेण्याचा प्रकाश पुरवणाऱ्या श्रेष्ठ विभूती असतात. येथे शाश्वताचा काही स्पर्श आहे. तो माझ्या मनाला सतत खुणावीत राहिला आहे.

माणूस मोहात पडतो हा आपणा सर्वांचाच अनुभव आहे. पण त्या मोहावर तो मात कशी करतो हे समजून घेणे मला जास्त महत्त्वाचे वाटत आले आहे. स्वभावतः मनुष्य स्वार्थी असतो, निस्वार्थ होण्यासाठी त्याला प्रयत्न करावा लागतो.







मनुष्य वासनेचा बळी असतो, त्या पाशातून सुटण्यासाठी त्याला कठोर निग्रह करावा लागतो. जो त्यात यशस्वी होतो तो मोठा होतो. पण काही व्यक्तींची जीवने अशी असतात की, तेथे मोह वा वासना यांचा स्पर्शच होत नाही. निर्मल गंगाजल असावे, तसे त्यांचे विशुद्ध मन असते. सूर्याचा स्वयंसिद्ध प्रकाश असावा अणि तेथे अंधकाराचा प्रवेश होणे अशक्य असावे, तसे त्या विभूतींचे कांतिमान व्यक्तिमत्त्व असते. आपल्या मस्तकावरील आकाश जसे अनंत विस्तारलेले आहे, आणि ते नित्य नव्या सौन्दर्याने नटलेले असते, तशी महापुरुषांची जीवने कोणत्याही कल्मषाचा स्पर्श न होणारी असतात, उदात्त जाणिवांच्या रमणीय प्रदेशात मुक्तपणे विहार करणारी असतात. मोहापासून प्रयत्नपूर्वक दूर राहणे वेगळे, आणि त्याच्या अतीत असणे वेगळे. वासनेपासून कटाक्षाने अलिप्त राहणे निराळे, आणि वासनेचा स्पर्शच नसणे निराळे. व्यापक होण्याचा प्रयत्न करणे केव्हाही स्वागतार्हच आहे, पण 'हे विश्वचि माझे घर!' अशा नित्याच्या प्रचीतीने वर्तत असणे ही असामान्यत्वाची कोटी होय. स्वभावतः मोहवश असलेला मनुष्य तेथवर कसा पोचतो, हे जाणून घेणे आपले जीवन उन्नत होण्याला उपकारक ठरते. स्वामी विवेकानन्द ही या कोटीतील एक अनन्यसामान्य विभूती होती. त्यांचे साधार आणि विश्वसनीय असे साडेवाराशे पृष्ठांचे चरित्र प्रस्तुत लेखकाने नुकतेच हातावेगळे केले आहे. नागपूरचा रामकृष्ण मठ ते तीन खंडात प्रसिद्ध करणार आहे. लवकरच मुद्रणाला आरंभ होईल.

श्रेष्ठत्वाचा हा शोध घेताना सत्य हा सर्वात महत्त्वाचा निकष असतो. सवंगपणा, भडकपणा, किंवा अतिरंजितता यांना येथे स्थान नसते. असत्याचा किंचितसा स्पर्श झाला, तरी श्रेष्ठत्व तेथून बाहेर पडते. नीती आणि सदाचार ही अमूर्त अशा सत्याचीच प्रकट रूपे आहेत. जेथे कोणत्याही स्वरूपातील अनीतीला थारा मिळालेला असतो, तेथे श्रेष्ठत्वाला तडा जातो. ज्याच्या जीवनातील अवकाश देश आणि काल यांच्या सीमा ओलांडून जातो, ती श्रेष्ठ विभूती होय. पण हा सत्याचा निकष केवळ श्रेष्ठ विभूतींच्या चरित्राला लागू पडतो असे नाही. त्यांच्या जीवनात सत्य मूर्तिमंत अवतरलेले पाहावयास मिळते इतकेच. पण कोणाचेही चरित्र लिहिताना त्यामध्ये निखळ सत्यालाच स्थान दिले गेले पाहिजे. कोणत्याही प्रकारे सत्याचा अपलाप होता कामा नये. चरित्रातील काहीही वगळले जाता कामा नये, आणि रंजकतेसाठी त्यात पदरचे तिखटमीठ घालता कामा नये. या संदर्भात वस्तुनिष्ठतेला फार महत्त्व आहे.

अशी ही चरित्रे विश्लेषणातील असतील, तर सुवर्णाला सुगंधाचे देणे लाभते. त्यायोगे चरित्र एका उंचीवर जाते. कालक्रमानुसार घटनांचे केवळ निवेदन करीत जाणे म्हणजे चरित्र नव्हे. चरित्रनायकाच्या जीवनातील हरएक प्रसंग जिवंत झाला पाहिजे. त्याच्या आयुष्यातील संघर्ष आणि चढउतार वाचकाच्या दृष्टीसमोर खडे झाले पाहिजेत, आणि इच्छित ध्येयाच्या यशोमंदिरावर त्याने चढवलेला ध्वज प्रसन्न सफलतेच्या वाऱ्यावर फडकताना दिसला पाहिजे. हे लेखन रूक्ष



अनुक्रमणिका

होत कामा नये. त्याला लालित्याचा कोमल स्पर्श झाला पाहिजे. जीवनातील उलटसुल्ट घटनांचा सुंदर गोफ विणला गेला पाहिजे. अशा चित्रणाच्या द्वारा ती व्यक्ती सजीव, समूर्त, आणि चैतन्ययुक्त होऊन वाचकांच्या हृदयात स्थिर झाली पाहिजे. हरएक व्यक्तीचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व असते. ते विधानांच्या द्वारा व्यक्त न होता तिच्या जीवनातील विविध प्रसंगातून उमलत चालले आहे, असे दिसले पाहिजे. अखेर त्याचे रूप जसे कसे असेल, तसे ते पूर्ण स्वरूपात व्यक्त झाल्याची प्रचीती वाचकाला आली पाहिजे. जिवंत व्यक्तीच्या सान्निध्याचा वा सहवासाचा जो परिणाम होतो, तसा चरित्र वाचत असताना त्या व्यक्तीच्या अस्तित्वाचा प्रत्यय आला पाहिजे, आणि त्याने वाचकाच्या अंतःकरणाचा ताबा घेतला पाहिजे. व्यक्तिमत्त्वाचे असे प्रत्ययकारी दर्शन आणि त्यातील विभिन्न घटकांचे तर्कसंगत विश्लेषण ही एकत्रित येणे हा यशस्वी चरित्राच्या दृष्टीने मणिकांचनयोग आहे.

एमिली लुदविग याने लिहिलेले नेपोलियनचे चरित्र हे अशा कोटीतील एक समर्थ चरित्र आहे. नेपोलियनची धडाडी, रणांगणावरील कुशल नेतृत्व, साऱ्या युरोपचे एकछत्री राज्य बनवण्याची उत्तुंग आकांक्षा, रणधुरंदर सेनापती असूनही तत्त्वज्ञ आणि कलावंत यांची त्याला असलेली बूज, त्याच्यासाठी जीव टाकणारे सैनिक आणि त्या सैनिकांवरील त्यांचे प्रेम, आणि पराभूत होऊन सेंट हेलिना येथे अतिशय प्रतिकूल अवस्थेततही त्याच्या वागण्यात घडणारे उदात्तीचे दर्शन, हे सारे घटक हा मानवी कर्तृत्वाचा एक उत्तुंग अविष्कार आहे. लुदविग तो समर्थपणाने उभा करतो. त्याच नेपोलियनचे ॲबटने लिहिलेले चरित्र विभूतिपूजकाच्या भूमिकेतून लिहिलेले असूनही सत्याचे अनुसरण, वातावरणाची निर्मिती, आणि लालित्यपूर्ण भाषाशैली यांमुळे आकर्षक उतरले आहे. एडवर्ड कारने लिहिलेले दोस्तएव्हस्कीचे विश्लेषणपर चरित्र त्याची भेदक प्रतिभा, मनस्वी व्यक्तिमत्त्व, सखोल करुणाशीलता आणि त्याचबरोबर त्याला असलेला जुगार खेळण्याचा अनावर सोस, या सर्वांचा मेळ त्याच्या साहित्यकृतीशी घालणारे आहे. आन्द्रे मोर्वा याचे एरियल हे शेलेचे चरित्र त्याचे काव्यात्म व्यक्तिमत्त्व प्रभावीपणे उभे करते, आणि अखेर त्याच्या जीवनाचा झालेला अनपेक्षित अंत चरित्राला शोकांतिकेची उंची प्राप्त करून देतो. स्टीफन झ्वाइगचे आत्मचरित्र असेच चटका लावून जाते, कारण आपले सारे साहित्य केवळ एक ज्यू म्हणून जप्त केले गेल्याचा धक्का सहन न होऊन तो आपल्या पत्नीसह आत्महत्या करतो. पण अशा त्या आत्मचरित्रात काय वगळलेले आहे, हे त्याची पहिली पत्नी एलिझाबेथ हिने लिहिलेल्या झ्वाइगच्या चरित्रावरून ध्यानात येते. घटस्फोट घ्यावा लागला असूनही आपल्या पतीविषयीच्या शांत, स्थिर, आणि सहानुभूतिपूर्ण अशा प्रेमीभावनेने ओथंबलेले हे चरित्र वाचल्यावर चरित्रनायकापेक्षा लेखिका असलेल्या एलिझाबेथच्या व्यक्मित्त्वाचा ठसा मनावर अधिक उमटतो. 'दि ग्रॅण्ड रिबेल' हे डेविस किंकेडने लिहिलेले शिवछत्रपतींचे चरित्र वस्तुनिष्ठ तर

आहेच, पण त्याच वेळी त्यांची स्वतंत्र दृष्टी व महापुरुषत्व यांवर नेमका प्रकाश टाकणारे आणि लालित्यपूर्ण शैलीत लिहिलेले आहे. विवेकानन्दांचा आदेश बाजूला ठेवून राजकारणात उतरलेल्या भगिनी निवेदितांचे बार्बरा फॉक्स यांनी लिहिलेले 'लाँग जर्नी होम' हे विश्लेषणशील शैलीतील चरित्र त्यांच्या मनाची सूक्ष्म आंदोलने चित्रित करणारे व अखेर त्या अंत:करणातून विवेकानन्दांच्या शिष्याच कशा राहिल्या, याचे मूर्तिमंत दर्शन घडवणारे आहे. अशी ही काही निरनिराळ्या प्रकारची चरित्रे अविस्मरणीय आहेत.

समर्थ व्यक्तींच्या जीवनाला किती भिन्नभिन्न रूपे प्राप्त होऊ शकतात, हे पाहताना मानवी जीवन किती विविधतेने नटलेल आहे त्याचा प्रत्यय येतो. ललित वाङ्मय कल्पिताच्या आधारे हाच अनुभव आपल्याला नाना अंगांनी देते. पण चरित्रामध्ये या कल्पिताचा स्पर्श सत्य अधिक सुस्पष्टपणे व परिणामकारकपणे व्यक्त व्हावे, एवढ्या मर्यादितच ठेवावा लागतो. कल्पितावर उभे असणारे ललित वाङ्मय हे बहुतांशाने मनोरंजनपर असते. माणसाची बुद्धी आणि मन परिपक्व होण्यासाठी त्याला विचारांचे अधिष्ठान लाभावे लागते. पण वैचारिक वाङ्मय वाचण्यास मनुष्य फारसा उत्सुक नसतो. पण चरित्र कोणीही वाचू शकतो. हरएक कर्तृत्ववान माणसाचे चरित्र हा कमीअधिक प्रकाश देणारा एक दीप असतो. तर कमी असो वा अधिक, प्रकाश तो प्रकाश हे विसरता येत नाही. महापुरुषांची चरित्रे तर दीपस्तंभासारखी असतात. ज्याला प्रकाशाचा रस्ता हवा असेल, त्याला भारतात अशा विभूतींची उणीव पडणार नाही. त्या प्रकाशाचा लाभ करून घेणे हे ज्याच्या त्याच्या स्वाधीन आहे. ते केल्यामुळे जीवनाला दिशा मिळते, व त्यातूनच समाजालाही प्रगतीचा रस्ता गवसतो. हे सामर्थ्य हा चरित्रवाङ्मयाचा सर्वात महत्त्वाचा विशेष आहे.

□

डॉ. वि. रा. करंदीकर,
१३, क्षिप्रा, सहनिवास, कर्वेनगर,
पुणे ४११ ०४२.

---

*(पान ५८ वरून पुढे चालू)*

होते. मानवी जीवनाचे संकलित नि सुसंवद दर्शन घडावे, अशी आपणा सर्वांची स्वाभाविक सुप्त इच्छा असते. पण जीवन फार विस्तृत नि विकीर्ण असे असल्यामुळे ती इच्छा पूर्ण होत नाही. चरित्रांत नि विशेषत: व्यक्तित्त्व घटकांची लय साधणाऱ्या चरित्रांत ती पूर्ण होते. उत्कृष्ट चरित्रांनी होणाऱ्या आनंदाचे रहस्य या इच्छापूर्तीत असते !

□

डॉ. द. न. गोखले,
रमामंगल, २९ सहवास सोसायटी
कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# व्यक्तिनिष्ठ चरित्रलेखन हवे !

वि. ग. कानिटकर

लेखक, लेखनप्रवास कसा करतो हा एक गुंतागुंतीचा प्रश्न आहे. साहित्याचे व्याकरण वा तत्त्वज्ञान समजून घेण्याचे औत्सुक्य, विचारांची शिस्त आणि तत्सम चिंतनाची क्षमता माझेपाशी नसल्याने, मला चरित्रलेखनामागील प्रेरणा, संशोधन केले असल्यास त्याचे स्वरूप, साधने कोणती, चरित्र लिहिलेल्या व्यक्तीचे जीवनकार्य व कालखंड यांचे परस्पर संवादाचे आकलन, असे कठीण कठीण प्रश्न कधी पडल्याचे स्मरत नाही, प्रश्न पडले नाहीत, कारण त्याची मला गरजच वाटली नाही, असे दिसते.

मुळात मी चरित्रलेखन थोडेच केले आहे. 'नाझी भस्मासूराचा उदयास्त' या पुस्तकात प्राधान्याने अॅडॉल्फ हिटलरचे परंतु अन्यही युद्धनेत्यांची चरित्रे अनुषंगाने येतात. 'माओ क्रांतीचे चित्र आणि चरित्र' व 'व्हिएतनाम अर्थ आणि अनर्थ' मध्ये इतिहास निवेदनाच्या संदर्भात माओ-त्से-तुंग व हो-चि-मिन्ह यांची चरित्रे येतात. 'फाळणी-युगांतापूर्वीचा काळोख' या पुस्तकात म. गांधी व सावरकर यांची चरित्रे येऊन जातात. म्हणजे या सर्व पुस्तकांचा उद्देश निखळ चरित्रलेखन नाही. 'विन्स्टन चर्चिल व 'फाळणी टाळणारा महापुरुष-अब्राहम लिंकन' ही दोन पुस्तकेच काय ती मी लिहिलेली चरित्रे म्हणता येतील.

महाराष्ट्रात सांस्कृतिक जीवनाच्या १९२० पूर्वीच्या पन्नास, पाऊणशे वर्षांत, विविध क्षेत्रात, जी कर्तबगार व प्रसिद्ध माणसे वावरत होती, त्यातल्या सुमारे १६ व्यक्तींच्या भावजीवनावरील कथा माझ्या 'पूर्वज' व 'आणखी पूर्वज' या कथासंग्रहात समाविष्ट आहेत. यातील प्रत्येक कथा लिहिताना, जेवढा काळ व विचार करावा लागला, तेवढ्या वेळात मी यापैकी प्रत्येकाचे बऱ्यापैकी चरित्र लिहू शकलो असतो, परंतु मुख्यतः त्या त्या आयुष्यात मला दिसलेली माझी कथा लिहिण्याचा माझा हेतू असल्याने, या कथांतून या सर्व प्रसिद्ध व्यक्तींची चरित्रे डोकावत असली तरी तो सर्व तपशील माझ्या कथा सूत्राशी निगडीत असल्याने, या पुस्तकांचा विचार येथे अप्रस्तुत होईल. हे सांगितले एवढ्यासाठीच की, मी चरित्रे, आत्मचरित्रे, आठवणी, आख्यायिका, आत्मपर मुलाखती अगणित वाचूनही, या सर्वांचा चरित्रे लिहिण्यासाठी उपयोग करावा असे मला कधी वाटले नाही. तेव्हा लेखकाच्या



अनुक्रमणिका



बाबतीत असेही घडू शकते; संपूर्ण चरित्राचा आवाका एखाद्या कथेतही बांधता येतो.

तेव्हा सुरवातीला, जे प्रश्न मला कधी पडलेच नाहीत, असे जे म्हटले, याचे एक कारण मी जे निखळ चरित्र लेखन केले ते फार थोडे केले हे एक असू शकते. परंतु विचार करू लागल्यानंतर अजिबात उत्तरच सापडत नाही असे प्रश्न फार थोडे असतात. आपल्याला सापडलेली उत्तरे चूक की बरोबर हा नंतरचा प्रश्न, परंतु काही तरी उत्तर गवसतेच.

शालेय वयातच मुलांना चरित्राची गोडी लागते. तशीच ती मला लागली. आपल्याला मोठे होणे वगैरे जमले नाही, तेव्हा आपल्या मुलांना थोरांची चरित्रे वाचायला आईवाप व शिक्षक उद्युक्त करतात. ही चरित्रे वाचून तोटा काहीच नसतो, झाला तर फायदाच होईल, अशी या मागची आई-वडिलांची सावध भूमिका असते. माझ्या पिढीच्या मुलांनी, ज्या चरित्रांची पारायणे केली व ज्यांना त्यातील परिच्छदेच्या परिच्छेद मुखोद्गत होते, ते चरित्र म्हणजे स्वा. सावरकर यांनी अनुवादिलेले मॅझिनीचे आत्मचरित्र. सावरकरांनी मॅझिनीच्या आत्मचरित्राचा केवळ मराठी अनुवादच तर केला होता, जो इंग्रजी भाषा जाणणारा कोणीही सामान्य लेखकही करू शकला असता. परंतु 'जोसेफ मॅझिनिचे आत्मचरित्र व राजकारण' या सावरकरांच्या अनुवादाला, स्वातंत्र्यवीरांनी जी प्रस्तावना लिहिली, तिच्यामुळे ते पुस्तक वाचकांच्या मनाचा कब्जा करते. सावरकरांचे धगधगते राष्ट्रप्रेम या प्रस्तावनेतून ओतप्रोत अनुभवता येते. 'इटलीत जन्माला येणाऱ्या रामदासाला मॅझिनी म्हणतात, आणि हिंदुस्थानात जन्मला येणाऱ्या मॅझिनीला रामदास म्हणतात' अशा स्वरूपाचे त्या प्रस्तावनेतील एक वाक्य माझ्या स्मरणात अद्याप रूतून बसलेले आहे. म्हणजे पारतंत्र्यकाळात, मॅझिनीच्या आत्मचरित्राचे मराठी भाषेतून निवेदन करताना लेखक म्हणून सावरकरांची भूमिका स्पष्ट होत होती. पारतंत्र्याविरुद्ध असंतोष भडकवण्यासाठी मॅझिनी चरित्राचा उपयोग त्यांना अभिप्रेत होता आणि त्यांचे हे इप्सित एवढ्या प्रचंड प्रमाणावर साध्य झाले की व्हॅलेंटाईन चिरोल यांच्या शब्दात सावरकरांचे हे पुस्तक, 'राष्ट्रवादाचा धडा देणारे पाठ्य पुस्तक' ठरले !

आता मॅझिनीचे चरित्र, लाला लजपतराय यांनीही लिहिले होते. सुरेन्द्रनाथ बॅनर्जी मॅझिनीवर व्याख्याने देत. परंतु सावरकरांच्या मॅझिनीने परिणाम साधला, त्याच्या शतांशानेही, लालाजीच्या चरित्राकडे लोकांनी लक्ष दिले नाही. सुरेन्द्रनाथांच्या व्याख्यानाकडे लोकांनी लक्ष दिले नाही हे साहजिकच होते कारण, सुरेन्द्रनाथांनीच लिहून ठेवले आहे—

'व्याख्यान देत असताना, मी कटाक्षाने काळजी घेत असे. मी श्रोत्यांना बजावीत असे की मॅझिनीच्या क्रांतिकारी कल्पनांना मनात थारा देऊ नका. त्याचे इतर गुण हेच काय ते मनावर ठसवून घ्या.'

लाला लजपतराय यांचा मॅझिनी, सुरेन्द्रनाथांच्या मॅझिनी इतका सोवळा नव्हता. पण सावरकरांच्या मॅझिनीसारखा वेडरही नव्हता. याउलट सावरकरांनी मॅझिनीची आत्मकथा निवडली ती मुळी

रोखठोक प्रस्तावना लिहिण्यासाठी. भारतीय स्वातंत्र्याचा ठोस आणि झगझगीत संदर्भ हा सावरकरांच्या पुस्तकाला परिणामकारक यश देऊ शकला.

सावरकरांनी मॅझिनीची आत्मकथा अनुवादित न करता, त्याचे चरित्र लिहिले असते, तर त्यांनी प्रस्तावनेत मांडलेले राष्ट्रवादाचे आणि स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आवश्यक असलेल्या, सशस्त्र उठावाचे धगधगते विचार, त्यांनी चरित्रलेखनातच इतके बेमालूम मिसळले असते की ते रसायन अधिकच ज्वलजहाल झाले असते. चिरोलसाहेबांचा तर निद्रानाशच झाला असता.

चरित्रे वा आत्मचरित्रे वाचण्याची हौस, ही अनेकांची सहजप्रवृत्ती होते. कारण होऊन गेलेल्या माणसांची त्यात प्रत्यक्ष भेट झाल्यासारखे वाटते. मोठ्या माणसांची राजकीय चरित्र (Political Biograhy) वाचून, वाचकांचे समाधान होतेच असे नाही. जो मोठा व थोर समजला जातो, त्याची चालचलवणूक कशी होती, त्याचा प्रपंच कसा झाला, मित्रांशी, नातेवाईकांशी त्याचे संबंध कसे होते, त्याच्या धर्मकल्पना काय होत्या, स्त्रियांच्या संबंधात त्याचे वर्तन कसे असे, अशी नाना प्रकारची जिज्ञासा वाचकांपाशी असते, जी फाजील चवकसपणाच्या थराला जाऊ शकते.

जे कोणी असे म्हणतात की एखाद्याच्या खासगी चरित्राकडे न पहाता, फक्त त्याच्या मोठेपणाकडेच काय ते पहावे, हे बहुतांशी वाचकांना पटत नाही. त्यांना चरित्रनायकाच्या वागण्या-बोलण्यात सुसंगती अपेक्षित असते. आणि यापायी त्याची जिज्ञासा त्याला, ज्याला 'चांभारचौकशा' म्हणतात, त्या करायला उद्युक्त करत असावी.

ग्रंथ हे नेहमीच, ग्रंथकर्त्याचा विचार व त्याची मनोधारणा यांच्या संयोगातून जन्म पावतात. चरित्रलेखन याला अपवाद नसते. रूसो, व्हाल्टेर, सावरकर यांच्यासारख्या वास्तवाला कलाटणी देऊ शकणारे, प्रतिभावंत क्रांतिकारी यांनी केलेले इतिहास लेखन वा चरित्रलेखन, म्हणजे चार पैसे मिळावे म्हणून केलेला हव्यास अथवा वाङ्मयीन चिरंजीवित्वाच्या अपेक्षेने केलेला उद्योग नसतो.

खरे पहाता कादंबरी, कथा, काव्य, नाटक हे सर्व चरित्रलेखन, इतिहास लेखनच असते. असे असे घडले हेच तर त्यात सांगितलेले असते. चरित्रलेखन व इतिहासनिवेदन हे तर उघडउघड इतिहासलेखनाशी प्रतिज्ञाबद्धच असते. चरित्रनायक जर राजकारणी पुरुष असेल, तर सर्व चरित्राला तत्कालिन राजकारणाची इतकी गडद डूब असते, की इतिहास म्हणजे काय तर, कर्तृत्ववान पुरुषांची चरित्रे होत, असाही भास होतो. मराठ्यांचा इतिहास म्हणजे काय तर, शिवाजीमहाराज, संभाजी, राजाराम, शाहू, बाळाजी विश्वनाथ, आदींची ओळीने येणारी चरित्रेच तर असतात. आणि हे असे होणे स्वाभाविकच होय. कारण कालचे राजकारण हा आजचा इतिहास असतो तर आजचे राजकारण हा उद्याचा इतिहास ठरणार असतो.

चरित्र लेखकापाशी जर आपल्याला या लेखनातून काय साधायचे आहे याच सुस्पष्ट विचार असेल, तर त्याने, काटेकोर,

वस्तुनिष्ठ निवेदनाला बाधा येते का? हा प्रश्न टीकाकार उपस्थित करतात व अशा लेखनाचे अवमूल्यन करू पहातात. खरी गोष्ट अशी आहे की, चरित्रलेखनाचा तपशील हा पुराव्याने सिद्ध होणारा असतो. या तपशीलातून आपल्या मनोधारणेनुसार लेखक लेखनासाठी निवड करत जातो. घडून गेलेल्या घटनांचा जो अन्वयार्थ व संदर्भ त्याला जाणवतो तो चरित्रलेखनाच्या ओघात व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य लेखक घेतो आणि हे सर्व करताना, या लेखनातून आपल्याला जे साधायचे आहे, त्यावर त्याची अखंड नजरही असते.

माझे इतिहासलेखन व चरित्रलेखन यातून माझी वैचारिक वैठक लपत नाही, लपू नये हेच मला अभिप्रेत होते. जे जे राष्ट्र समर्थपणे उभे राहते, त्यात राष्ट्रवादाने भरलेला बहुसंख्य समाज असावाच लागतो. आपल्याकडे, राष्ट्रवादाची भाषा कीर्तने भरपूर परंतु प्रत्यक्षात असा समाजच अस्तित्वात नाही हे कटु सत्य आहे. लिंकन, हिटलर, चर्चिल, माओ, हो-चि-मिन्ह, डॉ. वरिजमन आणि गोल्डामायर यांनी आपआपल्या देशात राष्ट्रवाद कसा साकार केला. अडचणींवर मात कशी केली यांचा साद्यंत इतिहास, हिंदुस्थानातील अखंडपणे झालेला इतिहास अपलाप आणि त्रुटींच्या पार्श्वभूमीवर वाचकांना पोचवणे, हे मला साधायचे होते. 'सोपपत्तिक इतिहास लिहिण्यात मला रस नाही. हे इतिहास शाळा कॉलेजातून बाहेर पडल्यानंतर, हातातून गळतात ते पुनः कोणी ढुंकुनही पहात नाही. असे इतिहास, बऱ्याच शिक्षणसंस्थात आपली पुस्तके लागावी या हेतूसाठी, दोन-दोन, तीन-तीन विद्वान एकत्र येऊनही लिहितात ! वस्तुनिष्ठ परंतु कोरडे, इतिहासाचा प्रचलित राज्यकर्त्यांना सोईस्कर असा अपलाप केलेले हे ग्रंथ वाचकांना आवडणे कर्मकठीणच असते.

मला राजकारणात विद्यार्थीदशेपासून रस होता. राजकारणात रस असणे आणि प्रत्यक्षात राजकारणात भाग घेणे, या दोन वेगळ्या गोष्टी आहेत. एक गोष्ट निर्विवाद, की, ज्याला राजकारणात रस असतो, असाच माणूस इतिहासलेखन वा ऐतिहासिक पुरुषांच्या चरित्राकडे वळू शकतो. कदाचित असेही असेल की सरकारी नोकरीच्या बंधनात असल्याने, व पुरेसे धैर्य वा त्यागवृत्ती अंगात नसल्याने, प्रत्यक्ष राजकारणात पडता आले नाही. तेव्हा माझे राजकारणावरचे प्रेम इतिहासनिवेदन व चरित्रलेखन या मार्गाने जाणे अपरिहार्य ठरले.

मी लिहिलेल्या ऐतिहासिक चरित्रकथन करणाऱ्या पुस्तकांतून मी जागोजागी त्या त्या घटनांशी असलेला, भारतीय राजकारणाशी असलेला समांतर संदर्भ, स्पष्ट केला आहे वा सुचवला आहे. हे मी केले नसते तर माझे लेखन 'सोपपत्तिक इतिहास' झाले असते व १०-१५ वर्षांनंतर पाहिली आवृत्ती कशीबशी संपून कायमचे अस्तंगत झाले असते. माझा कटाक्ष एवढाच असे की भारतीय राकारणाचा संदर्भ सुचवताना, मी घडलेल्या घटनांची सोईस्कर फेररचना करणार नाही किंवा एकही असत्य गोष्ट त्यात घुसडणार नाही.

माझी वैचारिक बैठक माझ्या चरित्र लेखनांतून लपत नाही आणि याचे कारण

हेच की माझे लेखन व्यक्तिनिष्ठच आहे. ही गोष्ट मी जाणूनबुजून स्वीकारलेली आहे.

याचा अर्थ, केवळ वस्तुनिष्ठ असे चरित्र लेखन करणारे जे वाङ्मयसेवक आहेत, त्यांचेविषयी मला अनादर आहे असा नाही. त्यासाठी आवश्यक त्या संशोधनाची, परिश्रमांची, विवेचक सामर्थ्यांची केवढी उपासना ते करतात, याची मला यथार्थ कल्पना आहे व अशा लेखनाचीही नितांत गरज असते. उत्कृष्ट चरित्र ग्रंथाची साहित्यात भर घालणे हा त्यांचा हेतू असतो. थोर संशोधक, विचारवंत अशा बिरुदांनी साहित्यात त्यांना यथोचित सन्मानही वाचक देतात.

इतिहासातून सांगितलेली चरित्रे काय किंवा निखळ चरित्रे काय, ही आपल्याला भूतकाळाची समज येण्यासाठी उपयोगी असतात. ही गोष्ट आपण वाचक तटस्थपणे साह्य करून घेतो. मनाला विरंगुळा देणारीच ही गोष्ट असते. आता ज्यात बोधाची सक्ती नाही, आणि मनाला विरंगुळा अनुभवता येतो त्यालाच कला म्हणतात ना? या दृष्टीने चरित्रलेखन हे कोणत्याही प्रकारे, अन्य ललित लेखनाहून गौण आहे असे मानण्याचे कारण नाही. आणि अशा प्रकारच्या साहित्यातही कलात्मकता असू शकते, हे एकदा मान्य केले की असे लेखन जेवढे व्यक्तिनिष्ठ असेल तेवढे ते अधिक परिणामकारक होण्याची शक्यताच जास्त नाही का?

अधिक काय सांगणार?

❑

वि. ग. कानिटकर,
१३६२, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

---

## साभार पोच

- ❑ **मराठ्यांचा इतिहास ग्रंथसूची :** कविता भालेराव, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २०४, मूल्य एकशे पन्नास रुपये.
- ❑ **वाळवीची फुले :** भगवान ठग, तुका म्हणे प्रकाशन, बुलढाणा, पृष्ठे ७६, मूल्य रु. पासष्ट

**प्रतिमा प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

- ❑ **गाई घरा आल्या :** इंद्रजित भालेराव, पृष्ठे ८८, मूल्य ऐंशी रुपये.
- ❑ **बहिणाबाई चौधरी :** इंद्रजित भालेराव, पृष्ठे ३८, मूल्य तीस रुपये.
- ❑ **संत जनाबाई :** पृष्ठे ३१, मूल्य वीस रुपये.
- ❑ **जांभळा ढग :** भास्कर चंदनशिव, पृष्ठे १०५, मूल्य शंभर रुपये.
- ❑ **देह भूल :** केशव वसेकर, पृष्ठे ९६, मूल्य ऐंशी रुपये.
- ❑ **बस्तान :** मोहन पाटील, पृष्ठे ९२, मूल्य ऐंशी रुपये.

**दलित श्रमिक प्रकाशन, अहमदनगर यांची प्रकाशने**

- ❑ **मुक्तीवेध :** भास्कर जाधव, पृष्ठे १२३, मूल्य पंचाहत्तर रुपये.
- ❑ **वगनाट्य :** भास्कर जाधव, पृष्ठे ९४, मूल्य पन्नास रुपये.
- ❑ **हे गीत वामनाचे :** भास्कर जाधव, पृष्ठे ७२, मूल्य ऐंशी रुपये.
- ❑ **केशव सूची वाङ्मय :** संपादक, सरोजिनी वैद्य, पौडवाल, जोशी, राज्य मराठी विकास संस्था प्रकाशन, मुंबई,पृष्ठे ३७८, मूल्य दोनशे रुपये.



अनुक्रमणिका



# चरित्रलेखन : विशिष्ट दृष्टिकोन !

श्रीनिवास दामोदर सामंत

दिव्यत्वाचा शोध व दिव्यत्वाबद्दल आदर या मानवी मनाच्या मूलभूत प्रेरणा आहेत. दिव्यत्वाची प्रचीती कोणाला कुठे भासेल हे मात्र प्रत्येकाच्या मनाच्या संरचनेवर अवलंबून असते. याचबरोबर आपल्याला जे उमगले ते दुसऱ्याला सांगणे ही एक मूलभूत प्रवृत्ती आहे. चरित्रलेखन हे या प्रेरणांचाच मूर्त आविष्कार आहे. लेखक त्याच्या जाणिवांना जे काही भव्य-दिव्य दिसते ते लेखनाद्वारे वाचकांसमोर ठेवतो. लेखकाला चरित्रनायक शोधावा लागत नाही, तर तो लेखन प्रक्रियेच्या खूप आधीच लेखकाच्या मनात हळूहळू मूर्त होत जातो.

अगदी बालपणापासून शिवाजीमहाराज हे व्यक्तिमत्त्व माझ्या मनात ठाण मांडून बसले आहे. या व्यक्तिमत्वात अनेक गुणांचा तीव्र उत्कर्ष झाल्याचे मला हळूहळू जाणवत गेले. उच्च रजोगुणांबरोबरच सात्विक गुणांचाही इथे उत्कर्ष झाला आहे, आणि ही जोडणी दुर्मिळ आहे. लोकोत्तर व्यक्तींच्या अंगी जे गुण सामान्यपणे आढळतात ते तर राजांच्या ठायी दिसतातच, परंतु त्याहीपलीकडे अनेक उच्च गुणांचा समुच्चय त्यांच्या ठिकाणी जाणवतो. उदंड कार्यशक्ती, दूरदर्शित्व, शत्रूचे अचूक मूल्यमापन, निर्भयपणा, तेज, धडाडी, निर्णय घेण्याची क्षमता, मोहिनी घालणारे व्यक्तिमत्त्व हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू. याचबरोबर राजांच्या जीवनात आध्यात्मिक मूल्ये, निस्पृहता, प्रजेवर पुत्रवत् प्रेम, असे अलौकिक गुणही दिसतात. राजांच्या जीवनाचे हे बहुरंगी इंद्रधनुष्य मला नेहमीच आकृष्ट करीत आले आहे. आपले वय वाढते तसे जाणिवांची क्षेत्रे विस्तारत जातात व सूक्ष्मसूक्ष्म पैलू उलगडत जातात.

सुदैवाने मला राजांच्या सुरुवातीच्या कर्मभूमीत, सह्याद्री प्रांतात, काही अंशी फिरता आले. इथले गडकोट, घाटमार्ग, दऱ्याखोऱ्या, मी पाहिले. हे पहात असताना माझी इतिहासाची जाण विस्तारत गेली. राजांची माझ्या मनातील प्रतिमाही तशीच भव्य बनत गेली. राजांच्या व्यक्तिमत्त्वाला राजकारण, समाजकारण, युद्धनीती, धर्मकारण अशी खूप चिंतन करता येण्यासारखी अनेक अंगे आहेत. यातूनच राजांच्या जीवनावर काही लिहावे असे वाटू लागले. परंतु, त्याचबरोबर हे सहस्त्र पैलू व्यक्तिमत्त्व यथार्थपणे उभे करणारे शिवचरित्र



अनुक्रमणिका

कसे असावे, हा मला पडलेला कायमचा प्रश्न आहे.

मला नेहमी असे वाटते की कोणतेही जीवन हे अनेक घटकांनी किंवा प्रवाहांनी बनलेले एक रसायन आहे. हे घटक या रसायनात बेमालूमपणे मिसळलेले असतात. कसे? तर, जीवन हे या घटकांचे, या प्रवाहांचे कधी द्वैत तर कधी अद्वैत दाखवित, फसवित राहाणारे एक प्रवाही मिश्रण भासते. 'प्रवाही' हा शब्द मी अशासाठी वापरला की जीवन काळाबरोवर वाहात असते. काळ स्थिरही नाही व निरपेक्षही नाही. पण काळाच्या प्रवाहाचा फार मोठा संदर्भ जीवनात भासतो. जीवनाला द्वैत अद्वैताचा गोफ मी अशासाठी म्हटले की जीवनातील काही घटनांचा स्वतंत्रपणे शोध घेत गेल्यास कधीकधी पूर्णपणे विरोधी असे पैलू नजरेसमोर येतात. याउलट इतर घटनात कोणतेच पैलू वेगळे दाखवता येत नाहीत. शिवाजीराजे एकीकडे रुद्रावतार धारण करून मुधोळच्या घोरपडेंचा वंशछेद करताना दिसतात, तर दुसरीकडे श्रीशैलावर 'मी' पणा लोप पाऊन आपली मान छेदायला सरसावतात! म्हणून, एखाद्या थोर पुरुषाच्या चरित्रातील एखादा पैलू विश्लेषणाने अभ्यासता आला, तरी ते चरित्रच सम्यक् रीतीने समजाऊन घेतल्याशिवाय असा एकांगी अभ्यास आपल्याला भलत्याच निष्कर्षाप्रत नेतो.

ऐतिहासिक किंवा पौराणिक व्यक्तीवर लेखन करताना लेखकावर मोठी जबाबदारी येते. या व्यक्तींबद्दल जनमानसात काही मतं घट्ट रुजलेली असतात. माझी भूमिका अशी आहे की, अशा व्यक्तींवर ललित लेखन करणाऱ्याने इतिहास संशोधकाची भूमिका घेऊ नये. अशा लेखकाने इतिहासात बहुमताने जे मान्य आहे ते स्वीकारावे. माझ्या लेखनातही मी हे बंधन पाळले आहे.

शिवाजीराजांवर बरेच लिहिले गेले आहे. परंतु, अनेक शिवचरित्रे वाचताना ती ठराविक चाकोरीतूनच गेल्याचे दिसते. लेखकांना आपण वेगळे काय मांडणार आहोत हा प्रश्नच पडल्याचे दिसत नाही. चरित्राचा घटनापटच वेगवेगळ्या भाषेत मांडलेला दिसतो. मराठीतील चरित्र लेखन हे प्रामुख्याने घटना वर्णन करणे याच धाटणीचे दिसते. प्रज्ञेचा स्पर्श झालेल्या संगीतकार, नेता, शास्त्रज्ञ अशा एखाद्या नायकाचे चरित्र जेव्हा केवळ कालपट व घटनांची जंत्री म्हणून मांडले जाते तेव्हा वाचकाला 'माहिती' या पलीकडे काय मिळते? वाचकाची बुद्धी चाळवली जाते काय? त्याच्या विचारांना कुठे चालना मिळते काय? या दृष्टीने ग्रंथ प्रयोजनाचा गांभीर्याने विचार होताना दिसत नाही.

या पार्श्वभूमीवर मी शिवचरित्रातील एक प्रमुख घटक राजांची युद्धनीती. इतिहासाला भूगोलाचा एक मुख्य संदर्भ असतो. राजांच्या इतिहासालाही तो तसा आहेच. राजांची युद्धनीती इथल्या भूगोलाशी निगडित आहे. प्रत्यक्ष स्थलदर्शनाने मला या गोष्टीची जाणीव झाली आणि असेही जाणवले की उपलब्ध शिवचरित्रात हा धागा पूर्णपणे सुटला आहे. म्हणूनच अशा शिवचरित्रांत, 'तुंबळ युद्ध झाले', 'सैन्य पलीकडच्या डोंगरामागे लपले होते', 'घाट फारच अवघड', 'खानाची फार कुचंबणा झाली', 'खान लोहगडाच्या दक्षिणोत्तर

मार्गाने जात होता', अशा तऱ्हेची असंबद्ध व निरर्थक वाक्ये जागोजाग दिसू लागतात. असंबद्ध व निरर्थक अशासाठी की वाचकांच्या मनात ही वाक्ये कोणतेही सुस्पष्ट चित्र उभे करू शकत नाहीत. अशी वाक्ये व वर्णने पुस्तकांची जाडी वाढवतात, लेखकाला समाधान देतात, परंतु, वाचकाच्या मनावर भावनांचा हलका शिडकाव करून, त्याला चेतावणी देऊन विरून जातात. हा शिडकावा पुस्तक मिटताच वाळून जातो व वाचक राहातो कोरडाच.

'वेध महामानवाचा' हा ग्रंथ लिहिताना मी राजांची युद्धनीती हा विषय समोर ठेवला होता. परंतु, या विषयावर रंजनात्मक कादंबरी तयार करायची माझी इच्छा नव्हती म्हणून काही विशिष्ट उद्दिष्टे मी समोर ठेवली होती. ग्रंथाच्या मुख्य भागात शिवाजीराजांच्या काही प्रमुख लढायांचे विवेचन व विश्लेषण दिले आहे. प्रत्येक लढाईची पार्श्वभूमी सुरुवातीला देऊन शेवटी त्या लढाईचे महत्त्व व परिणामही दिले आहेत. लढाईचे विश्लेषण अनुषंगिक नकाशे व इतर साहित्याच्या सहाय्याने केले आहे. अशा तऱ्हेने संपूर्ण पुस्तकात एक सलगता आणली आहे. हे करीत असताना हा ग्रंथ एखादा प्रबंध न होता तो सामान्यांसाठी वाचनीय व्हावा हा दृष्टिकोन समोर ठेवला होता.

चरित्रलेखनासाठी एक महत्त्वाचा घटक म्हणजे चरित्रनायकाला लाभलेली पार्श्वभूमी. युगपुरुषाचे एक मुख्य लक्षण म्हणजे तो त्याला लाभलेली पार्श्वभूमी हवी तशी वाकवितो. प्रतिकूल परिस्थितीवरही मात करण्याचे एक विलक्षण सामर्थ्य त्याच्याकडे असते. परिस्थिती जितकी प्रतिकूल तितके नेत्याचे कर्तृत्व उठून दिसते. यासाठी प्रत्येक घटनेमागची पार्श्वभूमी योग्य तऱ्हेने समजून मांडणे आवश्यक होते. याचबरोबर राजे ज्या शत्रूंविरुद्ध लढले त्या शत्रूंनाही योग्य तऱ्हेने उभे करणे आवश्यक होते. त्या शत्रूंना मूर्ख किंवा वावळट समजणे गैर आहे. राजांविरुद्ध आलेले सर्व आदिलशाही व मोगली सरदार अनुभवी व कसलेले होते. असे असतानाही त्यांचा पराभव का झाला ते अभ्यासणे आवश्यक आहे. या सरदारांचे डावपेच प्रथम मांडून त्यावरचे राजांचे प्रतिडावपेच प्रत्येक प्रकरणात दिले आहेत. याच संदर्भात असे दिसते की राजांची कार्ये अनेकदा अतर्क्य आहेत. युगपुरुषाचे, महामानवाचे साध्य जरी सर्वांना दृग्गोचर होत आहे तरी त्याने वापरलेले मार्ग हे त्याच्या आधीच्या इतिहासाला सर्वस्वी अपरिचित, पण दीर्घपरिणामकारक व आश्चर्यकारक असतात. म्हणून अशा कार्याची व्याप्ती व फलश्रुती केवळ आश्चर्यकारक असतात. राजांच्या कार्याची परिणामकारकता तर प्रचंड असे. घडणारा परिणाम व त्याला लागणारी सामग्री व वेळ यांचे गुणोत्तर फार मोठे असे. हे विश्लेषण त्या त्या जागी देण्याचा प्रयत्न केला आहे.

या ग्रंथासाठी मी राजांची युद्धनीती हा पैलू प्रामुख्याने निवडला होता, तरी या महामानवाचे संपूर्ण जीवनच पार्श्वभूमीसारखे मनात उभे करून मी हा पैलू त्या पार्श्वभूमीवर रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. साहजिकच मुख्य विषयांच्या अनुषंगाने राजांच्या कार्याचे टप्पे, त्यांच्या युद्धनीतीचा विकास,

युद्धनेतृत्व व आक्रमकता, राजांचे सैन्य-आरमार-हेरखाते, राजांचे व्यापारविषयक धोरण, अशा मुद्यांनाही स्पर्श केला आहे. या मुद्यांचा स्पर्श मुख्य विषयाला ठिकठिकाणी झाला आहे. राजांच्या राज्यविस्ताराला सुरुवातीला शहाजीराजांची एक निश्चित पार्श्वभूमी आहे अशी माझी धारणा आहे. म्हणून ग्रंथाच्या सुरुवातीला शहाजीराजांच्या कार्याचा थोडा विचार केला आहे. शिवाजीराजांच्या कार्याच्या संदर्भात गनिमी कावा हा शब्द नेहमी ऐकायला येतो. याचेही थोडे विवेचन आवश्यक होते. याशिवाय प्राचीन हिंदुस्थानी युद्धतंत्राची थोडक्यात माहिती देणेही प्रस्तुत वाटले. अशा तऱ्हेने या ग्रंथाची मांडणी मुख्य विषय, त्या आधी काही पार्श्वभूमी व नंतर मुख्य विषयाच्या अनुषंगाने राजांच्या जीवनातील इतर पैलूंचे विश्लेषण अशी केली आहे.

अशा तऱ्हेने 'वेध महामानव' हा ग्रंथ विशिष्ट दृष्टिकोनातून वेगळ्या आराखड्यात मांडलेला आहे. या चरित्रातून काही संदेश मिळतात का हे पाहण्याचा यात प्रयत्न केला आहे. हा ग्रंथ केवळ दोन घटकांची करमणूक म्हणून वाचकांनी वाचून ठेऊन देऊ नये अशी अपेक्षा आहे. वाचकाची कल्पनाशक्ती व बुद्धी चाळवली जाऊन त्याने काही विचारांना प्रवृत्त व्हावे ही अपेक्षा आहे.

□

श्रीनिवास दामोदर सामंत
रसायन व तंत्रशास्त्र विभाग (स्वायत्त)
मुंबई विद्यापीठ, नाथालाल पारीख मार्ग,
माटुंगा, मुंबई ४०० ०१९.





अनुक्रमणिका







# सत्य : चरित्रलेखनाचा प्राण !

## सदाशिव आठवले

**चरित्रांकडे केव्हा व कसा वळलो :**

पन्नास वर्षांपूर्वी भारत स्वतंत्र झाला तेव्हा मी लेखक म्हणून दीडदोन वर्षांचा होऊन चालायला आणि बोलायला लागलो होतो. चरित्र लेखक म्हणून माझे वय तर आजमितीस केवळ नऊ दहा वर्षांचे आहे. इतिहास आणि राज्यशास्त्र हे माझे पदवी परीक्षांचे विषय. भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीचे वर्षी हे विषय महाविद्यालयात मी शिकवू लागलो होतो. इ. स. १९८८ मध्ये माझे 'रामशास्त्री : चरित्र व पत्रे' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यापूर्वी इतिहासावर मी इंग्रजीतून व मराठीतून संशोधनात्मक तसेच चिंतनात्मकही पुष्कळ लिहिले होते; पण एखादे पाचदहा पृष्ठांचे छोटेखाणी चरित्रसुद्धा लिहिले नव्हते. माझ्या विषयांवरच्या माझ्या अन्य लेखनाचे तपशील देण्याचे येथे काहीच कारण नाही.

इ. स. १९८६-८७ पर्यंत वैचारिक लेखनाबरोबरच ललित साहित्यातही मी खूप रस घेतला. त्या चार दशकांच्या काळात पन्नास पाऊणशे कविता, अर्धेमुर्धे नाटक, दोन अडीच कादंबऱ्या अशा बऱ्याच तऱ्हा मी केल्या असल्या तरी मुख्यत: लघुकथा लिहिल्या. त्या निदान अडीचशे तरी असतील. त्यात त्या बऱ्याच संपादकांना पटल्या असाव्यात, वाचकांनाही थोड्याबहुत आवडल्या असाव्यात. तथापि मी फार गाजलो किंवा लोकप्रिय झालो असा प्रकार मात्र अजिबात नाही.

आता चार दशके कथा लिहून जवळ जवळ अखेरच्याच म्हणाव्या अशा टप्प्यात मी चरित्रांकडे का वळलो असेन? ललिताच्या क्षेत्रातील अपयशाने नाउमेद झालो, खचलो म्हणून की काय ? मुळीच नाही. कारण मोठ्या यशाची जिद्द धरून आटापिटा करण्याचा माझा पिंडच नाही. भरपूर नावलौकिक, थोडेसेच यश किंवा पूर्ण अपयश — काहीही मला पचते.

चरित्रलेखनाकडे मी कसा वळलो आणि त्यात गेली दहा वर्षे एवढा कसा रमून गेलो हे माझे मलाही नीटसे उमजलेले नाही. पण काय असावे ते सांगतो. काल्पनिक गोष्टी लिहित होतो तेव्हाही मी इतिहासाचा व्यासंग सोडला नव्हता. जगाच्या इतिहासातील चार पाच हजार वर्षांच्या काळातील शेकडो घटना आणि त्या घडवून आणणारी किंवा त्यात सापडलेली माणसे ह्यांच्या बद्दल सतत आणि बरेच वाचीत राहिलो होतो. त्यातल्या कित्येक व्यक्तींविषयी मला विलक्षण कुतूहल

वाटे. त्यांनी मला ओढ लावली होती. पण काल्पनिक पात्रे निर्माण करण्याचा नाद लागलेला होता. मीच उभी केलेली ती पिशाच्चे मानगुटीस बसली होती, ती सोडीतच नव्हती. सेवा निवृत्तीनंतर (१९८२-८३) केव्हा तरी असे वाटू लागले की, इतिहासाच्या पुस्तकातून आणि प्रकाशित व अप्रकाशित कागदपत्रांतून भेटले त्यापैकी कित्येकांनी आपल्याला जो काही जीवनदर्शनाचा आनंद दिला आहे तो आपण आणखी चार लोकांपर्यंत पोचवावा. म्हणजे मग जी माणसे मला भावली होती त्यांच्या जीवनाच्या कहाण्या शब्दबद्ध करून त्यांच्यापुढे ठेवणे प्राप्तच होते. ते करायचे ठरवले. आपल्या तोकड्या प्रतिभेतून मरतुकडी पात्रे उभी करणे बंद करावे आणि खरी खुरी ठसठशीत व्यक्तिमत्त्वे दाखवावीत असा निर्धार झाला आणि काम सुरू केले. नऊदहा सालांत सात चरित्रे सिद्ध झाली. आवश्यक तेवढे अधिक वाचन केलेच; पण आधी बरेच वाचलेले होते, टिपणे काढलेली होती म्हणूनच एवढे शक्य झाले.

आता आधी माझ्या चरित्रग्रंथाची यादी देतो आणि मग प्रत्येकातल्या विषयाकडे वळेन.

प्रसिद्ध झालेली चरित्रे :

१. 'रामशास्त्री' : चरित्र व पत्रे' श्रीविद्या प्रकाशन — पुणे, १९८८

२. 'सरदार बापू गोखले' श्रीविद्या प्रकाशन — पुणे,१९९०

३. 'उमाजी राजे, मुक्काम डोंगर' कॉंटिनेंटल प्रकाशन — पुणे, १९९१

४. 'शहजादा दारा शुको' श्रीविद्या प्रकाशन — पुणे, १९९२

५. 'केमाल पाशा' श्रीविद्या प्रकाशन — पुणे, १९९४

६. 'जॉर्ज वॉशिंग्टन' गोकुळ मासिक प्रकाशन — पुणे, १९९६

७. 'जगद्‌गुरू इब्राहिम आदिलशहा' श्रीविद्या प्रकाशन — पुणे, १९९७

**निवडीमागच्या धारणा व प्रेरणा**

ह्या संदर्भात मी माझ्या 'केमाल पाशा'त पृष्ठ ३ वर जे म्हटले आहे तेच उद्‌धृत करतो.

इतिहासातील बदल कसे घडतात? चिकित्सक अभ्यासकांनी ह्याची अनेकविध उत्तरे दिली आहेत. तथापि कठीण परिस्थितीतून, संकटांतून मार्ग काढीत माणसे स्वत:च हे बदल घडवून आणीत असतात हे मान्य करावेच लागते. आपोआप काहीच होत नाही. ही सगळी ईश्वरी लीला आहे. कर्ता करविता 'तो' आहे असा भोळा भाव धरून स्वस्थ बसता येत नाही. परमेश्वरावर विश्वास ठेवणारे सुद्धा स्वत: धडपड करीतच असतात. माणसे अविरत उद्योग करीत असतात, कधी यशस्वी होतात तर कधी अयशस्वी — पण शेवटी जे काही निष्पन्न होते ते मानवी प्रयत्नांतूनच होय.

... बहुतेक सगळे स्वत:च्या सर्व इच्छा आणि वासना पूर्ण करून घेण्यासाठी सर्व प्रकारचे भलेबुरे उद्योग करीत असतात. मांस, मद्य, मदिराक्षी इत्यादी नाना प्रकारचे विलास त्यांना हवे असतात... आपल्या उपभोगासाठी कुणाची मान कापावी लागत असेल, कुणावर बलात्कार करणे आवश्यक होत असेल तर हे सगळे ते विनदिक्कत करतात. पण किती एक काही आगळे वेगळेच दिसतात.

ग्रहणे का होतात ? धूमकेतू कोठून

येतात? मौर्यकाळी स्त्रियांचे अलंकार कोणते होते? असे कित्येक प्रश्न काही जिज्ञासूंना पडत असतात आणि त्यांची उत्तरे शोधण्यासाठी ते उपाशी पोटी सुद्धा रात्रंदिवस परिश्रम करीत असतात. ह्यापैकी कित्येक गोष्टी अशा असतात की त्या कळल्या नाहीत तर माणसांचे काही अडणार नाही. पण ह्या... उद्योगातून पुष्कळदा असेही काही हाती लागते की ते संपूर्ण मानवजातीला अतिशय उपकारक ठरते. इतर काही माणसे अशी असतात की ती ...अशा काही क्षेत्रात शिरत नाहीत. त्यांना आपल्या आसपासच्या जगातच रस वाटतो. आपल्या भोवतालची माणसे काही दु:खे भोगीत असली... तर ती कशी दूर करता येतील ह्याची त्यांना चिंता लागते, आणि त्यासाठी ते... स्वत:ला सर्व प्रकारच्या संकटात लोटून जनतेच्या भल्यासाठी आटापिटा करू लागतात. माणसाच्या ज्ञानात जी भर पडली आहे आणि त्याच्या समाजजीवनात जी सतत स्थित्यंतरे होत आली आहेत त्यांच्या मागे मुख्यत: ही अशी झोकून देणारी माणसे असतात.

मी काही मूल्ये मानतो, निष्ठा बाळगतो; आणि म्हणून राजकीय स्वातंत्र्य, श्रद्धास्वातंत्र्य, न्याय, जनकल्याण अशा काही ध्येयांसाठी धडपडून गेलेल्या इतिहासातील पुरुषश्रेष्ठांचे मला आकर्षण वाटते. जग फार बदलले आहे ह्याची मला जाणीव आहे. तत्त्वे, ध्येये वगैरे कुचेष्टेचे विषय झाले आहेत ह्याचे मला भान आहे. तथापि मी जुन्या जमान्यातला माणूस आहे. पण म्हणून जुने सगळे आदरणीयच आहे असे मानीत नाही. कित्येक मूल्ये अगदी राष्ट्रीयत्व आदी समीकरण सुद्धा आता निरर्थक होत आहेत हे मला मान्य आहे. पण अशा काही तत्त्वांसाठी पूर्वी जे निष्ठापूर्वक लढले, त्यांनाही समजून घ्यायलाच पाहिजे. कुणाच्याही जीवनाचा अर्थ आणि त्याच्या कार्यांचे मूल्यमापन स्थळकाळाची जाण ठेवूनच व्हावयास हवे.

**माझ्या चरित्र विषयांसंबंधी थोडे थोडे**

'रामशास्त्री'च्या चरित्राच्या आढाव्यात शेवटी मी म्हटले आहे. 'चारित्र्य म्हणजे काय आणि न्याय म्हणजे काय हे समजण्याचे दृष्टीने रामशास्त्रींची कथा आजही उद्बोधक ठरावी.' रामशास्त्री हे इ. स. १७५९ ते १७८९ एवढा काळ मराठी सत्तेच्या केंद्रस्थानी असलेल्या पुण्याच्या पेशवाई दौलतीत मुख्य न्यायाधीश होते. ह्या तीन दशकांच्या काळात पेशवा पहिला माधवराव, खुनी राघोबा आणि नाना फडणीस व सखाराम बापू ह्यांच्यासारखे जबरदस्त कारभारी अशा सर्वांना न्याय, नीती म्हणजे काय, न्यायसंस्थेचे स्वातंत्र्य म्हणजे काय हे स्पष्टपणे सांगणारा आणि प्रसंगी न्यायाधीश राज्यकर्त्याला देहदंडासारखी शिक्षाही ठोठावू शकतो असे ठणकावून बजावणारा असा हा माणूस होता. निवाड्यांचे कामी पैसे खाऊन त्याला खूप गब्बर होणे शक्य होते. पण ते त्याने केले नाही. त्याचे कौटुंबिक जीवन बरेचसे दारिद्र्यातच गेले. तेव्हा रामशास्त्रींचे जीवन जाणून घ्यावे आणि समजले असेल तसे इतरांनाही सांगावे असे मला तीव्रतेने का वाटले असेल हे कुणाच्याही सहज लक्षात येण्यासारखे आहे.

'सरदार बापू गोखले' हा शेवटचा पेशवा दुसरा बाजीराव (इ.स. १७९८ ते १८१८) ह्याच्या सेवेतील सेनापती. पेशवा बाजीराव हा खाजगी जीवनात चारित्र्यहीन, स्वैराचारी, तर दौलतीच्या कारभारात अत्यंत भ्रष्ट आणि बेजबाबदार असा राज्यकर्ता होता. मराठी सत्ता संपुष्टात आणण्याचे कामी शेवटी ज्या मराठ्यांना जबाबदार धरावेच लागेल त्यांचा हा म्होरक्या. ह्याचा सेनापती म्हणून पद सांभाळावे लागणे हे बापूचे मोठेच दुर्दैव. आपल्या भ्याड व विश्वासघातकी धन्याला सांभाळीत इंग्रजांसारख्या बलाढ्य शत्रूशी तो शेवटपर्यंत लढला, आणि लढता लढताच मरण पावला. खुद्द पेशव्यांसह सर्वजण जेव्हा एल्फिन्स्टनसारख्या इंग्रज अधिकाऱ्याची हांजी हांजी करीत आपापले स्वार्थ साधण्यासाठी धावपळ करीत होते आणि राज्याचे वाटोळे करीत होते तेव्हा बापू अखेरपर्यंत स्वराज्य राखण्यासाठी लढला. रणांगणावर पराभव दिसत असतानाही ठाम उभा राहिला. पण त्याचे बलिदान व्यर्थच झाले. शेवटी राज्य गेले ते गेलेच. पण त्याचे जीवन आणि त्याची अखेर कुणाच्याही काळजाला भिडेल अशीच आहे.

उमाजी नाईक हा माझे तिसरा चरित्र नायक. 'उमाजी राजे मुक्काम डोंगर' ह्या शीर्षकाच्या पुस्तकाने उभा केलेला आहे. एका तत्कालीन अस्सल पत्रावरून असे आढळते की हा आपला नावपत्ता त्यानेच आपल्या मागावर असलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांकडे पाठविला होता. पेशवाईची अखेर आणि इंग्रजी अमलाचा प्रारंभ हा ह्याचा कार्यकाल होय. रामोशी ह्या आदिवासी जमातीचा माणूस. रामोशी थोरामोठ्यांच्या वाड्यांवर रखवालीची कामे करीत. किल्ल्याच्या पायथ्यांचे किंवा घरांचे संरक्षण अशा राजकीय कामगिऱ्याही कित्येकदा त्यांच्यावर सोपविलेल्या असत. ते चोऱ्या, वाटमारी, दरोडे हे उद्योगही करीत. रामोशी रखवाली आणि दरोडे... ह्यात फरक करीत नसत. दोन्ही उपजीविकेची साधने असून हे दोन्ही प्रकार त्यांना सारखेच प्रतिष्ठेचे वाटत. तत्कालीन समाजालाही ते मान्य होते असे दिसते! ह्याच्यातून धडपडत वर आलेल्या उमाजींना मोठे जग माहित असणे अवघडच. इ. स. १८१६-१७ च्या सुमारास त्यानेही आपल्या जीवनक्रमांचा आरंभ दरोडेखोर म्हणूनच केला. ह्या उद्योगात तो भराभर अधिकाधिक यशस्वी होऊ लागला. पण इ.स. १८२६ च्या सुमारास त्याच्यात एकाएकी एक आश्चर्यकारक असा बदल झालेला दिसतो. इंग्रज सरकारविरुद्ध तो दंड थोपटून उभा राहतो. इ. स. १८१८ पर्यंत सर्व मराठी सत्ताधीश लीन होऊन इंग्रजांपुढे गुडघे टेकून बसलेले असताना फक्त आठ नऊ वर्षांनीच हा एक आदिवासी हे अवसान कोठून आणतो ते नीटसे कळत नाही, पण तसे झाले ह्यात शंकाच नाही. इ. स. १८२७ - २८ सालात तो स्वत:ला राजा म्हणून घोषित करतो आणि 'आम्ही चोर नाही; बंडखोर आहोत; तुमच्या सत्तेविरुद्ध लढा पुकारला आहे' असा स्पष्ट निरोप इंग्रज अधिकाऱ्यांकडे पाठवितो. महाराष्ट्रातील सात आठ जिल्ह्याच्या बाहेर त्याने कधीही पाऊल टाकले नसले तरी. हिंदुस्थान नावाच्या एका मोठ्या देशाची आणि त्यातील हिंदु आणि मुसलमान राज्यकर्त्यांची

त्याला पूर्ण माहिती होती हे त्याने काढलेल्या इ. स. १८३१ मधल्या सार्वत्रिक जाहीर नाम्यावरून निर्विवादपणे स्पष्ट होते. सर्व सत्ताधाऱ्यांनी आणि प्रजाजनांनी इंग्रजांविरुद्ध एकदम उठाव करावा असे त्याचे आवाहन होते.

पण इंग्रजांपुढे उमाजीची ताकद फारच अपुरी होती. विश्वासघातकी सहकाऱ्यांनीही त्याला फसवले आणि इ. स. १९३२ मधे इंग्रजांनी पुण्यास लोक जमवून त्यांच्या समक्ष ह्या क्रांतिकारकास उघड्यावर फाशी दिले. एका सामान्य अशिक्षित रामोशी युवकाचा हा अंत ही एक ह्या देशाच्या इतिहासात हुरहुर लावणारी घटना घडून गेली. इतिहासाचा निर्णय काय असायचा तो असो, पण मन असणाऱ्या प्रत्येकाला उमाजीचे हे जीवन चरित्र चुटपूट लावणारच!

ही पहिली तीन चरित्रे कमी अधिक गाजलेल्या अशा पण मराठी पुरुषश्रेष्ठांची होती. विद्यापीठाच्या परीक्षांसाठी आणि पुढे महाविद्यालयातील अध्यापनासाठीही मानवाचा सांस्कृतिक इतिहास, रोमच्या गणराज्याचा इतिहास, युरोपचा इतिहास, इंग्लंडचा इतिहास असे अनेक विषय वारंवार वाचीत राहिलो होतो. महाराष्ट्राचा इतिहास एकंदर अभ्यासक्रमात फारच थोडा. परंतु महाराष्ट्राबाहेरच्या भारताच्या आणि जगाच्या इतिहासातही मला खूप काही सापडले होते. त्यातले काही विशेषत: काही व्यक्ती मनात पक्या घर करून राहिल्या होत्या. सवड होताच त्यांच्याकडे नव्या दमाने वळलो. त्यांच्या जीवनकथा लिहायला बसलो.

'शहजादा दारा शुको' हे माझे चौथे चरित्रकथन पुष्कळांनी ह्याचे नाव ऐकले असेल; पण 'हा कोण?' असा प्रश्न टाकणारेही कित्येक निघतील. पण त्यात त्यांची तरी चूक काय? कुणी मोठा सेनापती, राज्यकर्ता, कलाकार किंवा शास्त्रज्ञ म्हणून अपूर्व, असामान्य असे कर्तृत्व गाजवून गेला असे काहीही ह्याचे बावत नाही. ह्याने विद्याव्यासंग बराच केला, पण त्या क्षेत्रातही ह्याने काही मौलिक भर घातली असे मुळीच नाही. दाराचे जीवन ही एक अपयशाची कहाणी आहे. मग ह्याचे जीवन कशासाठी जाणून घ्यायचे? ह्याचसाठी की त्याच्या शोकांतिकेत भारताच्या आणि एकंदर मानवाच्या इतिहासातील कित्येक अपप्रवृत्तींचे आणि अमानुषतेचे विदारक दर्शन घडते.

दारा हा मोगल बादशहा शहाजहान ह्याचा ज्येष्ठ पुत्र. इ. स १६१५ ते १६५८ ही ह्याची आयुर्मर्यादा. परधर्मसहिष्णुतेचा आणि सर्वधर्म समभावाचा हा कट्टर पुरस्कर्ता होता; आणि त्याचीच किंमत त्याला मोजावी लागली. मध्ययुगात बहुतेक सर्वत्रच; पण विशेषत: इस्लामी राज्यातून सिंहासनस्थ सत्ताधीश वृद्ध वा दुर्बल झाला की चार पाच वारसांनी नंतर इतर दावेदारांचेही निकाल लावावेत आणि आपण तख्तावर चढावे ही एक अगदी मान्यताप्राप्त अशीच पद्धत होती. शहाजहानच्या चार मुलांपैकी सर्वात जबरदस्त जो औरंगजेब त्याने बाकी तिघांची वाट लावून गादी बळकावली. ह्यात सत्तेचे राजकारण तर होतेच; पण दारा शुकोवर औरंगजेबाचा विशेष राग होता. दाराचा हिंदूंच्या धर्मग्रंथांचा आणि पुराणकथांचा

अभ्यास आणि त्याचे हिंदूंशी असलेले स्नेहसंबंध ह्यांचा औरंगजेबाला संताप होता; आणि म्हणूनच दिल्ली शहरातून त्याची धिंड काढून त्याचा शिरच्छेद करण्यात आला.

दाराने लढाया दिल्या होत्या, पण त्यात तो टिकू शकला नाही. ज्यांच्याशी त्याने स्नेह राखला होता त्या हिंदू राजांनी त्याला मदत केली नाही. काही तर चक्क औरंगजेबाला मिळाले. सहिष्णुतेच्या, सहजीवनाच्या, मानवतेच्या तत्त्वांसाठी धडपडलेल्या एका विशाल मनाच्या सज्जन राजपुत्राची ही दुःखांतिक आहे. ही एका बळीची, हुतात्म्याची करुण कथा आहे. मला ती फार अर्थपूर्ण वाटली, आणि समजली तशी आणि जमली तेवढी वाचकांपुढे ठेवली.

माझे पुढचे दोन चरित्रनायक हे आधुनिक जगाच्या इतिहासातले दोन महान क्रांतिकारक आहेत. पहिला अमेरिकेचा (अमेरिकेची संयुक्त संस्थाने) स्वातंत्र्य योद्धा आणि त्या स्वतंत्र राष्ट्राचा पहिला अध्यक्ष (इ.स. १७८९-१८६७) 'जॉर्ज वॉशिंग्टन' राष्ट्रीयत्व आणि लोकशाही ह्या मूल्यांसाठी, आधुनिक जगाच्या घडणीतील ह्या दोन पायाभूत तत्त्वांसाठी सव्वादोनशे वर्षापूर्वी यशस्वीपणे झगडलेल्या ह्या महापुरुषांची त्याच्या एका चरित्रकाराने म्हटल्याप्रमाणे इंग्रजीत आणि अन्य भाषांतून मोजदाद करता येणार नाही एवढी चरित्रे लिहिली गेली आहेत पण मराठीत काय आहे? वेगवेगळ्या ग्रंथसूची तपासून पहाता आपले दारिद्र्य चांगलेच जाणवते. ही जाणीव थोडीतरी भरून निघाली पाहिजे असा एक प्रकारचा चेवच येऊन मी ह्या चरित्राचे काम हाती घेतले. ह्यातून एक चांगली जीवनकथा साकारली की नाही ह्याविषयी मी काहीच म्हणून शकत नाही; पण मी स्वतःचे समाधान करून घेतले हे खरे!

'जॉर्ज वॉशिंग्टन' च्या आधीच माझे 'केमाल पाशा' प्रसिद्ध झाले होते. इ. स. १८८१ ते १९३८ हा केमालचा जीवनकाल. कालदृष्ट्या हा ह्याच शतकातला, आपल्याला बराच जवळचा असा आहे. ह्याच्या कार्याला पाश्चिमात्य जगातील राजकीय व सांस्कृतिक प्रगतीची पार्श्वभूमी होती. तथापि आधुनिक तुर्कस्तानच्या ह्या जनकाने आपल्या देशात जे घडवून आणले ते केवळ अपूर्व आणि अनन्यसाधारण होते. ह्यात शंका नाही. तुर्कस्तानच्या स्वातंत्र्यावर आक्रमण करणाऱ्या इंग्लंड आणि फ्रान्ससारख्या युरोपीय शत्रूंशी त्याने धडाडीने मुकाबले करून देश वाचविला पण त्याहूनही अधिक जोमाने आणि निर्धाराने तो स्वकीयांविरुद्ध लढला. धर्मप्रमुख आणि शासनप्रमुख ह्या दोन्ही प्रकारांनी अनियंत्रित सत्ता गाजवणाऱ्या खलिफा-सुलतानाला पदच्युत करून आणि प्रजासत्ताक उभे करून त्याने तुर्कस्तानला लोकशाहीच्या मार्गावर आणले. ह्या खेरीज तिसरा एक अभूतपूर्व असा निकराचा लढा त्याने दिला तो तुर्की जनतेविरुद्धच होता. इस्लामी धर्मगुरूंच्या आणि धर्मग्रंथांच्या विळख्यात अडकलेल्या अज्ञानी, दरिद्री पण दंगेखोर तुर्कांना त्याने कधी सामोपचाराने, मतपरिवर्तनाच्या मार्गाने तर केव्हा बंदुका रोखून नव्या जगात खेचून आणले. इस्लामी कल्पनांवर आणि प्रथा, परंपरांवर चौफेर हल्ला चढवून त्याने शासन

खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्ष बनविले. गेल्या साठ वर्षांत (इ. स. १९३८ ते १९९७) पुन्हा अनेकदा तुर्कस्तान मूलतत्त्ववादाकडे वळला हे खरे; पण तरी केमालचे कार्य पूर्ण निष्फळ झाले असे मात्र नाही. खलिफा-सुलतानांच्या काळातल्या संस्कृतीचे पुनरुज्जीवन केव्हाच झाले नाही. मधे मधे अडखळत का होईना पण आधुनिकतेच्या मार्गावरून एकंदरीत ह्या देशाची वाटचाल होत आहे. असे कर्तृत्व अर्वाचीन काळात लोकशाहीच्या चौकटीत राहून केमाल आणि फक्त केमालच दाखवू शकलेला आहे. सर्व मागासलेल्या जगाने त्याला गुरू मानावे.

'जगद्गुरू अब्राहिम आदिलशहा' हे माझे सातवे-चरित्र ह्या वर्षांच्या प्रारंभी प्रसिद्ध झाले. पुस्तकाच्या मलपृष्ठ ४ वर ह्या पुस्तकाचा परिचय आहे. तो असा: (हा) दक्षिण भारतातील सतराव्या शतकाच्या पहिल्या चरणातील एक आगळावेगळा सत्ताधीश. जन्माने आणि संस्कारांनी मुसलमान. त्याने धर्मांतर केले नाही; पण सरस्वतीला आपली माता आणि गणपतीला आपला पिता मानून संगीताची आराधना केली; उत्कृष्ट काव्यरचना केली. समर्थपणे पण प्रजाहितदक्षतेने राज्य केलेल्या लोकपालाचे हे अद्भुत वाटावे असे चरित्र.

हे चरित्र कथन संपविताना मी शेवटी म्हटले आहे, एकंदरीत नसानसातून हिंदुस्थानी झालेला हा सत्ताधीश होता. आपण मूळचे कुठचे, कोण; तिथली भाषा व धर्म काय ह्याचा विचार करण्याचे आपल्याला कारण नाही; जिथे आपण राज्य करणार आहोत तेथील लोक हे आपले आहेत. त्यांची संस्कृती तीच आपली संस्कृती आहे अशी इब्राहिमची ठाम धारणा होती. जगद्गुरू इब्राहिम हा असा होता. त्याने स्वत:ला कोणत्याही अर्थाने ही पदवी घेतलेली असो; तिला तो पात्र असो वा नसो; पण तो गुरुस्थानी मानला पाहिजे खास! कुणी, कुणी? सर्व मूलतत्त्व वाद्यांनी आणि त्यांच्याहीपेक्षा जास्त सर्व राज्यकर्त्यांनी —विशेषत: भारतातल्या!

तेव्हा ह्या चरित्राविषयाकडे मी का आकर्षित झाले असेन हे जास्त विस्ताराने सांगायला नकोच.

### साधन साहित्य

ज्यावरून चरित्र सिद्ध करायचे ती साधने चरित्रनायकाचा काल, देश व संस्कृती ह्यावरून ठरत असतात. त्यांचा उपयोग किती, कसा होईल हे चरित्रकाराच्या तयारीवरून आणि मर्यादांनुसार ठरणार हेही उघड आहे.

माझ्या सात चरित्रांपैकी तीन अठराव्या शतकाचा उत्तरार्ध व एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध ह्या कालावधीतील मराठी माणसे आहेत. ह्यांचे संबंधीची माहिती गोळा करण्यासाठी तत्कालीन मराठी व इंग्रजी कागदपत्रांच्या पलीकडे जाण्याची गरज नव्हती. परंतु प्रकाशित साधनांपलीकडे जाऊन अप्रकाशित हस्तलिखितांचा शोध घेणे हेही एक मध्ययुगीन मराठी भाषा आणि मोडी लिपी ह्यांची बऱ्यापैकी जाण असलेला एक मराठी माणूस म्हणून माझे कर्तव्यच होते. पेशवा दफ्तर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पुण्याच्या शासकीय अभिलेखागारात असे कागद पुष्कळ मिळतील अशी माझी अटकळ होती, आणि ती बरोबर निघालीही. काही थोडे कागद

पुण्याचेच भारत इतिहास संशोधन मंडळ व धुळ्याचे राजाकडे संशोधन मंडळ ह्यांच्या संग्रहांतून सापडले.

ह्या उद्योगातून काही वेगळेच अनुभव आले. रामशास्त्रींचे चरित्र असे मी फक्त वीस पृष्ठांत सांगितले आहे. अधिक माहिती मिळतच नसल्यामुळे निरुपाय होता. मात्र दीडशेपेक्षा अधिक पत्रे उपलब्ध झाली. ती सर्व संपादून पुस्तकात छापली आहेत. त्यामुळे पुस्तकाचा प्रकार बोटभर चरित्र आणि हातभर पत्रसंग्रह असाच झाला आहे; आणि त्यामुळे ह्यावर कुणाच्या काय प्रतिक्रिया होणार म्हणून चिंतित होतो. पण वाचकांनी आणि समीक्षकांनी आहे ह्या स्वरूपातल्याच पुस्तकाचे चांगले स्वागत केले आणि मग अर्थातच बरे वाटले. उमाजी नाईकांचे बाबतीत अगदी तसे झाले नाही. येथेही शंभरसव्वाशे नवीन कागद मिळाले, पण त्यावरून शंभरसव्वाशे पृष्ठांचे विश्वसनीय असे चरित्रही लिहिता आले. बापू गोखलेचे बाबतीत फारसे काही नवीन सापडले नाही. पण काही पत्रे आणि एक बखर हाती पडली. हे सर्व परिशिष्ट म्हणून छापले आहे. ह्या तीन चरित्रांचे निमित्ताने जुनी हस्तलिखिते मिळवून, संपादून प्रकाशात आणण्याच्या उद्योगाची महाराष्ट्रात जी एक परंपरा आहे ती आपणही आपल्या कुवतीप्रमाणे थोडीशी चालविली हेही समाधान मला लाभले.

दारा शुको आणि इब्राहिम आदिलशहा ह्यांच्यावर प्रकाशित साहित्याखेरीज आणखी काही मूळ कागदपत्रे मिळतीलही, पण ती बहुधा फारसी असणार. ह्या भाषेचे माझे ज्ञान अक्षरओळख ह्यापेक्षा जास्त नाही. शिवाय असे फारसी कागद असलेच तर ते दिल्ली, अलीगढ, जयपूर आणि कदाचित बंगलोर अशा ठिकाणच्या अभिलेखागारातून असणार. ते मिळवून वाचून घेणे मला अशक्यप्राय वाटले आणि म्हणून उपलब्ध प्रकाशित साधन साहित्यावरूनच आपली चरित्रे सिद्ध करावयाची असे ठरवावे लागले.

केमाल पाशा आणि जॉर्ज वॉशिंग्टन ह्यांची चरित्रे तर माझ्यासारख्या लेखकांनी मूळ पत्रव्यवहार, तत्कालीन वृत्तपत्रे इत्यादी आधार साहित्यावरच आपली चरित्रे उभी केली असतील. त्यांचे ग्रंथ आवर्जून, काळजीपूर्वक वाचायचे, त्याला पूरक म्हणून तत्कालीन इतिहासावरच्याही प्रमाणभूत साहित्याचा उपयोग साक्षेपाने करावयाचा अशी माझी मी काही एक रीत निश्चित केली आणि माझे स्वत:चे आराखडे तयार करून पुढे तपशीलवार लेखन केले.

### चरित्रलेखकाचे शरीर व प्राण

कौटुंबिक व सामाजिक पार्श्वभूमी, बालपण व शिस्त, विवाह वगैरे पासून सुरवात करून मृत्यूपर्यंतची हकीकत कालक्रमाने सलगपणे सांगणे असा काही एक चरित्रकथनाचा ढासा बसून गेलेला आहे. सामान्यत: हा सोईचाही आहे. मुद्दाम काही नवीन प्रयोग करावा असे मला वाटले नाही; सर्वसाधारणपणे तोच स्वीकारला. मात्र कोणत्या भागाला किती जागा द्यावयाची ह्याचे काही प्रमाण ठरवावेच लागते. माझ्या दृष्टीने मी ते निश्चित केले. तथापि कालक्रमानेच हकीकत सांगण्याचा प्रश्न काही वेळा अवघडही होतो. चरित्र नायकाची एखाद्या विशिष्ट क्षेत्रातील कामगिरी त्याच्या अन्य प्रकारच्या कार्यातून

वेगळी काढून एखाद्या स्वतंत्र प्रकरणात सांगणे उचित वाटते. दारा शुको आणि इब्राहिम आदिलशहा ह्यांच्या बाबतीत मला तसे करावे लागले आहे. असे कथन पुष्कळदा गुंतागुंतीचे व वाचकांना घोटाळ्यात टाकणारे होण्याचाही संभव असतो; पण त्याला काही इलाज नसतो असे मला वाटते. मांडणी जेवढी सुबोध होईल तेवढी पहावी, ती अमुकच प्रकारे व्हावी असे कोणतेच बंधन मी स्वत:वर घालून घेतले नाही.

लेखन शैली आणि भाषा ह्यांबाबतही चरित्रलेखकाने कसलेही आग्रह ठेवू नयेत अशी माझी भूमिका आहे. मुद्दाम क्लिष्ट शैलीत आणि अवघड भाषेत लिहिण्याचे काहीच कारण नाही; सोप्या पद्धतीने आणि सरळ शब्दात सांगितले तर जे सांगितले त्याचा दर्जा ते बाढल्यामुळे घसरणार नाही. त्याचबरोबर ओढून ताणून कृत्रिम रीत्या रंजकता आणणेही हास्यास्पदच होईल.

तथापि मांडणी, शैली, भाषा हे सर्व मी चरित्राविषयाचे शरीर मानतो. शरीर कमी जास्त सुंदर दिसेल, कधी ओबडधोबडही असेल. त्याची शक्य तेवढी काळजी घ्यावीच; पण खरी चिंता केली पाहिजे ती त्या शरीरातल प्राणाचे. सत्य हा तो प्राण होय.

निवेदनकौशल्य, कवित्व आणि भाषाप्रभुत्व वगैरे अंगी असतील तर चरित्रलेखकाने खुशाल एखाद्या कादंबरीपेक्षाही अधिक मनोरम प्रकाराने अशा आपल्या नायकाची जीवनकहाणी सांगावी; पण आपल्याला संपूर्ण माणूस दाखवायचा आहे आणि होता तसाच उभा करावयाचा आहे; काहीही वाढवायचे नाही; काहीही कमी करायची नाही; झाकायचे नाही व गढूळ किंवा पातळ करायचे नाही, हे चरित्रकाराने पक्के ध्यानी धरले पाहिजे. पन्नास वर्षांपूर्वी 'रामशास्त्री' वर एक चित्रपट निघाला. त्यात नारायणरावाचा खून होऊन राघोबा पेशवेपदी येणार असे दिसताच रामशास्त्री पुणे दरबार सोडून निघून जातो असे दाखविले आहे. एका नाट्यमय प्रसंगाने पटकथेचा हृदयस्पर्शी शेवट करावयाचा हा तेथे दिग्दर्शकाचा हेतू असणार. पण रामशास्त्रीच्या चरित्रकाराला असे करता येणार नाही. रामशास्त्री सोडून गेला नाही, त्याच्या मृत्युपर्यंत (इ.स. १७८९) तो पेशव्यांचा न्यायाधीश म्हणून काम करीत राहिला. मात्र आपण न्यायदानाचे कामी ढवळाढवळ करणार नाही असे त्याने नाना फडणीस व सखाराम बापू यांचे कडून लिहून घ्यायला कमी केले नाही. हेही सर्व चरित्रकारला दाखवावे लागले.

चरित्रनायकाचे गुण अवश्य सांगावेत. त्याच्या कार्याची नीट दखल घेऊन त्याला न्याय दिलाच पाहिजे. पण त्याच्या उणीवा किंवा अवगुण ह्यांचेवर पांघरूणे घालण्याची मुळीच गरज नाही. जॉर्ज वॉशिंग्टन कितीही कर्तृत्वसंपन्न असला तरी रणांगणावरचा सेनापती म्हणून कमी पडत असे हे सांगायलाच हवे. घटस्फोट पोटगी वगैरे संबंधीच्या कायद्यांद्वारे केमाल पाशाने मुसलमान स्त्रियांवरील अन्याय दूर केले ह्याची दखल घ्यायलाच हवी; पण स्वत:च्या पत्नीचे बाबतीत मात्र त्याची वागणूक मोठ्या मनाची निदर्शक नाही हेही स्पष्टपणे नमूद व्हावयास हवे; माझ्या सातही चरित्रांचे

बाबतीत मी चरित्रनायकांचे लोभात न पडता माझ्या माहितीच्या मर्यादेत नि:पक्षपातीपणे लिहिले आहे. आधीच विस्तार फार झाला आहे, म्हणून अधिक उदाहरणे देत नाही; आवरते घ्यायलाच हवे. संपादकांनी मला दिलेली शब्द मर्यादा मी केव्हाच ओलांडली आहे !

पण शेवटी एवढे मात्र पुन्हा सांगावेसे वाटते की सत्य हा चरित्रकथनाचा प्राण आहे, आणि चरित्र लेखकाने त्याला प्राणपणाने जपले पाहिजे.

□

सदाशिव आठवले
२०९-ब-६ नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

---














# चरित्रलेखनाची साधने !

सदानंद मोरे

चरित्रलेखन हा एक वैशिष्ट्यपूर्ण साहित्यप्रकार आहे. चरित्रनायकाच्या जीवनातील कृतींचा व घटनांचा अन्वयार्थ लावायचा आणि तोही वास्तवाशी इमान राखून ही काही वाटते तेवढी सोपी गोष्ट नाही.

चरित्रलेखनाचे एखादे हुकमी तंत्र सांगता येत नाही. याचे कारण असे की वेगवेगळ्या व्यक्तींच्या जीवनवैशिष्ट्यांनुसार त्यांची चरित्रे वेगवेगळे स्वरूप धारण करतील. चरित्रलेखकाचे कौशल्य याच ठिकाणी पणाला लागते. उदाहरणेच द्यायची म्हटले म्हणजे रामाच्या चरित्रापेक्षा कृष्णाचे चरित्र किंवा लोकमान्य टिळकांच्या चरित्रापेक्षा महात्मा गांधींचे चरित्र आपोआपच वेगळे रूप धारण करील. चरित्र लिहिताना कोणत्या तत्त्वांना अनुसरून लिहायचे, घटना व प्रसंग निवडण्याचे कोणते निकष वापरायचे याचा एकच एक आडाखा किंवा ठोकताळा देता येत नाही. ते त्या व्यक्तीचा स्वभाव, तिने अंगीकारलेली तत्त्वे, तिला लाभलेली परिस्थितीची अनुकूलता प्रतिकूलता यावर अवलंबून राहील.

मला काही रूढ अर्थाने चरित्रकार म्हणता यायचे नाही. पण मी या क्षेत्रात काही प्रयोग निश्चितपणे केलेले आहेत. त्यांचे निवेदन केले तर कदाचित ते रोचक आणि उपयुक्तही ठरू शकेल.

संतसाहित्य हा एक माझ्या जिव्हाळ्याचा विषय आहे. त्यामुळे माझा संतांच्या चरित्रांशी संबंध येणे अपरिहार्य होते. अर्थात या संबंधाची परिणती निदान अद्याप तरी मी एखाद्या संताचे संगतवार संपूर्ण चरित्र लिहिण्यात झालेली नाही. पण प्रसंगोपात वेगवेगळ्या संतांच्या चरित्रांमधील काही घटनांची चर्चा व चिकित्सा मी केलेली आहे. चरित्राच्या साधनांविषयीही-प्रमाणांविषयीही थोडेबहुत लिहिले आहे.

घटनांच्या संदर्भातील एक महत्त्वाची बाब म्हणजे कालनिर्णय, चरित्रविषय झालेल्या व्यक्तीचा जन्म, निर्वाण, आयुष्यातील महत्त्वाच्या घटना यांचा कालनिर्णय हा चरित्रलेखनाचा महत्त्वाचा भाग आहे. त्यात पुढे मागे झाले तर घटनांचा कार्यकारणभाव बदलू शकतो. अन्वयार्थ वेगळ्या प्रकारे लावावा लागतो. अगदी अलीकडील उदाहरण घ्यायचे म्हणजे डॉ. सु. बा. कुलकर्णी यांनी संत ज्ञानेश्वरांच्या आयुष्याची मर्यादा हा विषय घेऊन रूढ समजुतींना धक्का देणारे संशोधन पुढे

मांडले. ज्ञानेश्वरांचा जन्म शके ११२२ मध्ये झाल्याचे प्रतिपादन त्यांनी केले. शके १२१२ हा ज्ञानेश्वरीचा लेखनशक त्यांनी अमान्य करून अलीकडे ओढला. त्याचा एक परिणाम म्हणजे ज्ञानेश्वरांचे कार्य हे चक्रधरांच्या कार्याच्या अगोदरचे व ज्ञानेश्वरी ही लीळाचरित्राच्या पूर्वीची ठरली; पण मग यादवकाळाच्या संबंधीच्या गृहीतकांमध्ये भलतीच उलथापालथ होते. वारकरी पंथ व महानुभाव पंथ यांच्या परस्परसंबंधाबद्दलचे अंदाज नव्याने बांधावे लागतात. आता सु. बा. कुलकर्णींचे म्हणणे खरोखरच बरोबर असेल तर या सर्व बाबींना सामोरे जाऊन स्वीकारायची तयारी पाहिजे पण केवळ त्यांच्या धडाकेबाज निष्कर्षांनी दिपून जाऊन त्यांचा डोळे झाकून स्वीकार करायचीही गरज नाही. सनसनाटीपणा हा काही सत्याचा निकष होऊ शकत नाही. पण नवीन संशोधकाने ज्या साधनांच्या व पुराव्यांच्या आधारे नवे धक्कादायक निष्कर्ष मांडले आहेत त्यांच्या मुळाशी न जाता केवळ पारंपरिक समजुतींना छेद जाणे हाच एक निकष मानून ते स्वीकारण्याची प्रवृत्ती दिसते. नवभारत मासिकाच्या मे-जून १९९७ च्या अंकामधील भाऊ धर्माधिकारी यांचा ज्ञानेश्वरविषयक लेख कुलकर्णींच्या संशोधनाला प्रमाण मानून लिहिला गेला आहे. आणि प्रामाण्य, चिकित्सा न करताच बहाल करण्यात आलेले आहे. काही वर्षांपूर्वी डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या 'चक्रपाणी चिंतन' या खळबळजनक ग्रंथानेही अनेकांचे डोळे दिपून गेले होते याची या संदर्भात आठवण होते. पण त्यातील निष्कर्ष अविश्वसनीय साधनांवर व साधनांच्या चुकीच्या अन्वयार्थावर आधारित होते. ढेऱ्यांचे संशोधन त्याच पद्धतीने पुढे नेऊन निघणारे निष्कर्ष डॉ. पुरुषोत्तम नागपुरे यांनी 'पुनर्शोध' या ग्रंथात काढले. त्यातील मुख्य म्हणजे 'चांगदेव पासष्टी' हे ज्ञानेश्वरांनी चांगदेवाला उद्देशून लिहिलेले पत्र नसून महानुभव पंथाचे अध्वर्यु चक्रधर यांचे स्तोत्र आहे ! चरित्रांत एवढी उलथापालथ घडवून आणणाऱ्या नागपुरे यांच्या लिखानाविषयी ढेरे यांनी मौन बाळगले आहे व ढेरे यांच्या चक्रपाणी विषयक संशोधनाला उचलून धरणाऱ्या अभ्यासक समीक्षकांनी ढेरे यांचाच मार्ग चोखाळला आहे. (माझ्या नागपुऱ्यांच्या संशोधनाविषयीच्या लेखाचा कच्चा खर्डा तयार आहे.)

मुद्दा सु. बा. कुलकर्णी यांच्या लेखासंबंधीचा होता. ज्ञानदेवांच्या आयुष्याचे कोडे सोडवण्याचा ध्यास घेतलेल्या कुलकर्णींनी ढेरे यांनी केलेल्या चुकांचीच वेगळ्या स्वरूपात पुनरावृत्ती केली. पहिली म्हणजे अविश्वसनीय साधने वापरणे आणि दुसरी म्हणजे विश्वसनीय साधनांचा चुकीचा अर्थ लावणे.

या संदर्भात अविश्वसनीय साधने म्हणजे महानुभवांचे ग्रंथ. महानुभवांचे विठ्ठल, ज्ञानेश्वर इ. विषयीचे म्हणजे वारकरी पंथाच्या संदर्भातील लेखन पंथीय दृष्टिकोनातून लिहिले गेले आहे. त्यामुळे लीळाचरित्र, स्मृतिस्थळ यांच्यामधील वारकरी पंथाशी संबंध असलेले उल्लेख तारतम्याने व जपून हाताळले पाहिजेत. कुलकर्णी यांनी हे तारतम्य व काळजी सोडली. दुसरे असे की ज्ञानदेवांच्याच 'बालछंद' या अभंगाचा त्यांनी चुकीचा



अनुक्रमणिका

अन्वयार्थ लावला. त्यातील काही उल्लेख कालगणनात्मक नसताना त्यातून त्यांनी सांकेतिक कालगणना वाचली. उदाहरणार्थ 'बालछंदे बावीस जन्मे' हा उल्लेख शके (अकराशे) बावीस या जन्मशकाचा आहे असे त्यांनी ठरवला. वास्तविक हा उल्लेख ज्ञानेश्वरांच्या बावीस पूर्वजन्मांचा आहे. तुकारामशिष्या संत बहिणाबाई यांनी एका वेगळ्याच संदर्भात ज्ञानेश्वरांच्या बावीस जन्मांचा उल्लेख केलेला आहे. पण कुलकर्णी, बहिणाबाई वा त्यांची वारकरी परंपरा यांना मानायचेच नाही असे ठरविणार! परंपरेची म्हणून काही प्रमाणे असतात, संकेत असतात यावर तिच्याकडे तुच्छतेने पाहणाऱ्या अभ्यासकांचा विश्वासच नसतो यास काय करायचे? डॉ. कुलकर्णी यांच्या संशोधनाचा परामर्श घेणारा लेख माझ्या 'त्रयोदशी' या संग्रहात प्रकाशित झाला आहे.

चरित्रातील घटनांचा अर्थ लावताना साधनांचे योग्य वाचन किती महत्त्वाचे असते याचे एक उदाहरण तुकारामचरित्रातील तुकोबांचा गुरुपदेश या घटनेच्या अन्वयार्थाचे देता येईल. या घटनेचे वर्णन करणारा स्वत: तुकोबांचाच अभंग आहे. म्हणून तो पूर्णत: विश्वसनीय मानावा लागतो. त्यातील एक महत्त्वाची ओळ 'काही कलहे उपजला अंतराय' अशी आहे पण तत्कालीन 'ल' आणि 'क' ही अक्षरे लिहिण्याची धाटणी न समजल्याने बहुतेक गाथ्यांमध्ये 'कलहे' ऐवजी 'कळे' असा पाठ आला. हा पाठ केवळ एक निरर्थक ओळ हातात देतो. आता या गुंतागुंतीचा उलगडा झाला तो महिपतींच्या तुकाराम चरित्रातील बाबाजी चैतन्य या गुरूंनी मागीतलेले पावशेर तूप तुकोबांना द्यायला जिजाबाईंनी नकार दिला. त्यांच्या कलहामुळे बाबाजी निघून गेले अशा उल्लेखामुळे, संताजी तेली जगनाडे यांच्या संहितेतील शुद्ध पाठामुळे. अर्थात या शुद्ध पाठाचे वाचनही 'ल' व 'ळ' लिहिण्याच्या धाटणीत कसा बदल झाला हे ठाऊक असल्यामुळेच करता आले.

दुसरे असे की एकाच प्रसंगाच्या वा घटनेच्या संदर्भातील उपलब्ध पुरावे सुटे सुटे वा अलगपणे न पाहाता समग्रपणे व एकमेकांच्या संदर्भात पाहणे आवश्यक असते. असे केले तरच वस्तुस्थितीची नीट उकल होते. पुराव्यातील त्रुटीचीही संगती लागते. तो दुरुस्त करून घेता येतो. तुकाराम चरित्रातील आणखी एक उदाहरण द्यायचे झाले तर इंद्रायणीच्या डोहात वह्या कोरड्या राहिल्याच्या घटनेचे देता येईल. (या घटनेकडे अवैज्ञानिक व असंभाव्य म्हणूनही पाहाता येते व तिचा वेगळा अर्थ लावला जातो हा मुद्दा वेगळा. येथे प्रश्न या घटनेच्या कालव्याप्तीचा आहे.) संत निळोबा, महिपती वह्या तेरा दिवस पाण्यात होत्या असे लिहितात, आता या प्रसंगी तुकोबांनी तेरा दिवस उपवास केला होता हे सर्वमान्य आहे. त्यामुळे वह्याही किमान तेरा दिवस पाण्यात असणार हे उघड आहे. परंतु उपलब्ध हस्तलिखितांमधील यासंबंधीच्या अभंगांची शीर्षके नीट तपासली तर असे निष्पन्न होते की वह्या पाण्यात असण्याचा काळ हा एकूण अठरा दिवसांचा होता. वह्या बुडविल्यानंतर पाच दिवस तुकोबा उदास होते. त्यांचे खाण्यापिण्याकडे लक्ष नव्हते.

पण त्यांनी ते जाणीवपूर्वक त्यागिलेही नव्हते, किंवा देवाला काही साकडेही घातले नव्हते. ते सूत्र होऊन बसले होते. एवढेच. पुढे मात्र निंदकांनी त्यांची अवहेलना व निंदानालस्ती करायला प्रारंभ केला तेव्हा ते अंतर्मुख झाले व त्यांनी प्रतिज्ञापूर्वक अन्नत्याग केला. साकडे घातले. हा काळ तेरा दिवसांचा. पण म्हणजे वह्या पाण्यात असण्याचा एकूण काल अठरा दिवसांचा.

मी तुकारामचरित्र लिहिले नसले तरी 'तुकाराम दर्शन' या ग्रंथात लिहिल्या गेलेल्या अनेक तुकाराम चरित्रांची सांस्कृतिक समीक्षा केली आहे. चरित्रलेखकाचे स्वत:चे व जातीय, वर्णीय, वर्गीय, वैचारिक पूर्वग्रह त्याच्या लेखनावर कसा परिणाम घडवतात हे मी सोदाहरण व सप्रमाण दाखवून दिले आहे. त्यामुळे तुकोबांचे दर्शन घडवता घडवता मराठी संस्कृतीमधील अंत:प्रवाहांचे आणि अंत:संघर्षाचेही दर्शन आपोआप झाले व बघता बघता महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाचा पटच सहजपणे उलगडला.

मी लिहिलेले पूर्ण चरित्र म्हणजे श्रीकृष्णाचे चरित्र. हे चरित्र इंग्रजीमध्ये लिहिले आहे यथावकाय त्याचा मराठी अवतारही वाचकांसमोर येईल. पण येथेही या चरित्राचे स्वरूप प्रचलित चरित्रांपेक्षा वेगळे झाले आहे. 'कृष्ण: दि मॅन अ‍ॅड हिज मिशन' या ग्रंथात अगोदर मी चरित्रलेखनपद्धतीची आणि चरित्रसाधनांची चर्चा केली. या क्षेत्रात पूर्वसूरींनी केलेल्या लेखनाविषयी मी पूर्णपणे असमाधानी होतो. माझ्या असे लक्षात आले की श्रीकृष्णाच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणाऱ्यांनी त्याच्या तत्त्वज्ञानाकडे दुर्लक्ष केले. तर तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांनी चरित्राकडे पाठ फिरवली. परिणामत: त्याचे चरित्र व तत्त्वज्ञान या दोहोंविषयी गैरसमज पसरत गेले. वस्तुत: श्रीकृष्णाचे तत्त्वज्ञान आणि चरित्र यांचा अन्योन्यसंबंध इतका अतूट आहे की त्याचे चरित्र हे त्याच्या तत्त्वज्ञानाचे कृतिरूप प्रत्यक्षीकरण आहे तर त्याचे तत्त्वज्ञान हे त्याच्या चरित्राचे नियामक व समर्थक आहे. श्रीकृष्णाच्या चरित्राचा अन्वयार्थ केवळ त्याच्या तत्त्वज्ञानाच्याच चौकटीत लावता येतो. पण नेमका हाच मुद्दा विसरला गेला आणि गीता सांगणारा कृष्ण वेगळा व गोकुळातील खेळिया कृष्ण वेगळा असे मानण्याकडे लोकांचा कल होऊ लागला. विशेषत: त्याच्या शृंगारिक लीलांनी अनेकांना अडचणीत आणले. तेव्हा श्रीकृष्णचरित्राची त्याच्या तत्त्वज्ञानाच्या प्रकाशात मांडणी केली जाणे आवश्यक होते. मी नेमके हेच केले.

त्यासाठी पहिल्यांदा श्रीकृष्णाच्या तत्त्वज्ञानाची बैठक सिद्ध करणे गरजेचे होते. ते नेमके कसे करायचे? सुदैवाने भगवद्‌गीतेच्या रूपाने कृष्णाने अर्जुनास केलेला उपदेश उपलब्ध आहे. तोच श्रीकृष्णाच्या तत्त्वज्ञानाचा गाभा. पण तेथेही निर्माण झालेली मुख्य अडचण म्हणजे गीतेच्या भाष्यकारांनी गीतेला महाभारताच्या संदर्भ चौकटीतून बाजूला काढून स्वतंत्र ग्रंथ म्हणून पाहिले व तिचा अन्वयार्थ ती उपनिषदे व ब्रह्मसूत्रे यांच्या सारखाच एक वेदांत प्रतिपादन करणारा ग्रंथ या न्यायाने लावला. हीच ती प्रस्थानत्रयीची कल्पना. वस्तुत: भगवद्‌गीतेचा मुख्य प्रश्न म्हणजे

जीव आणि ब्रह्म यांचे स्वरूप, त्यांचा परस्परसंबंध आणि या संबंधाच्या यथार्थ ज्ञानातून मिळणारा मोक्ष हा नसून तो सामाजिक राजकीय प्रश्न आहे. तो अर्जुनाला पडलेला प्रश्न असून त्याची पूर्ण मांडणी पहिल्या अध्यायात व दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या दहा श्लोकांत आहे. तो स्वजनांशी करावयाच्या युद्धाच्या समर्थनाचा प्रश्न आहे. पण भाष्यकारांना गीतेतही वेदांताचा प्रश्न हाताळायचा असल्यामुळे त्यांनी गीतेचा अन्वयार्थ लावताना एकतर गीतेच्या या प्रश्नार्थक भागाला त्यावर भाष्य न करता टाळले किंवा त्याचा अर्थ फिरवला. तेव्हा कृष्णाच्या तत्त्वज्ञानाच्या फेरमांडणीची सुरुवात गीतेला अन्य प्रस्थानांपासून बाजूला काढून तिचा महाभारताच्या अनुषंगाने अर्जुनाच्या प्रश्नाच्या संदर्भात अन्वयार्थ लावण्यापासून व्हायला हवी. अर्थात तेवढ्याने ही मांडणी पूर्ण होत नाही. महाभारतात अनेक ठिकाणी कृष्णाचे तत्त्वज्ञान अर्जुनाप्रमाणेच इतरांबरोबरच्या संवादांमधून विखुरलेले आहे. ते एकत्र करून त्याची जोड गीतेला दिली म्हणजे एक पूर्ण तत्त्वज्ञान मिळते. महाभारतात अन्यत्र (निदान गीतेच्या पूर्वी) जे मुद्दे येऊन गेले आहेत ते गीतेत गृहीत धरले गेले आहेत. या सर्वांची सामग्र्याने सुसंगत मांडणी करणे जरूर आहे. एकदा अशी मांडणी झाली की त्याच्या प्रकाशात आता श्रीकृष्णचरित्राची समाधानकारक व्यवस्था लावता येते. या मांडणीनुसार श्रीकृष्ण भारतातील सर्वश्रेष्ठ राजकीय तत्त्ववेत्ता होता असे निष्पन्न झाले. त्याचे राजकीय तत्त्वज्ञान हे विदुर, भीष्म यांच्यासारखे समकालीन, शुक्राचार्य, बृहस्पतींसारखे पूर्वकालीन (व कौटिल्यासारखे उत्तरकालीनही) यांच्यापेक्षा श्रेष्ठ होते. त्याला धर्मपुरुषार्थाचे भक्कम आधिष्ठान होते आणि सामाजिक भानाची जोड होती. त्याने त्याच्या आयुष्यात स्वत: जे जे केले व इतरांकरवी जे जे करवून घेतले त्या सर्व कृतींना त्याच्या या तत्त्वज्ञानाचा संदर्भ होता. त्याच्या तत्त्वज्ञानात मानवी कृती, कृतीचे स्वातंत्र्य व मर्यादा, कृतीचे समर्थन अशा महत्त्वाच्या समस्यांची चर्चा आहे. मुळात मानवी कृती शक्य कशी आहे, तिच्यातील अनिश्चिततेचा (म्हणजेच दैवी) भाग गृहीत धरूनही पुरुषार्थप्रवण जीवन कसे शक्य आहे हे श्रीकृष्ण सतत सांगत असतो, इतकेच नव्हे तर त्यानुसार स्वत:ही आचरण करीत असतो. त्याच्या अशा तत्त्वमय कृतींमुळे किंवा कृतिशील तत्त्वज्ञानामुळे गणराज्यप्रधान लोकशाहीचे सर्वंकषतावादी राज्यपिपासू साम्राज्यवाद्यांपासून संरक्षण झाले. त्यासाठी त्याला बालपणापासून अखेरपर्यंत झगडावे लागले. प्रसंगी आपल्या-स्वत:च्या कुलाचा बळी द्यावा लागला.

अशा या वेगळ्या स्वरूपाचे आणि शैलीचे श्रीकृष्णचरित्र सिद्ध करताना एका बाजूला त्याचे जीवन, दुसऱ्या बाजूला त्याचे तत्त्वज्ञान व तिसऱ्या बाजूला त्या दोघांचा परस्परसंबंध असे तिहेरी भान ठेवावे लागले. साधनांच्या बाबतीत सांगायचे झाले तर महाभारत हे मुख्य साधन, पुराणनाटक-काव्यादी जी अन्य साधने आहेत त्यांचा स्वीकार, महाभारत ज्या संदर्भात काहीच सांगत नाही किंवा पुरेसे सांगत नाही तेथेच करायचा आणि तोही ती साधने










महाभारताच्या एकूण चौकटीशी सुसंगत असतील तरच करायचा.

कृष्णभक्तीचा संप्रदाय सुरू झाल्यानंतर आणि कृष्णाला पूर्णावतार मानल्यानंतर (ही प्रक्रिया कृष्णाच्या हयातीतच सुरू झाली होती.) कृष्णचरित्रातील राजकीय-तत्त्वज्ञानात्मक संदर्भ झाकोळले गेले, दुर्लक्षित झाले. परंतु सुदैवाने प्राचीन भारतीय परंपरेतील राजनीतीवरील ग्रंथात कृष्णाला राजनीतिज्ञ म्हणून मोठे स्थान बहाल करण्यात आलेले आहे, त्याचप्रमाणे त्याने केलेल्या राजकीय मुत्सद्देगिरीच्या कृत्यांची, लढ्यांची दखलही घेतली गेली आहे. त्यामुळे गीतेचा, महाभारताचा व कृष्णचरित्राचा अन्वयार्थ लावण्यासाठी या ग्रंथाची मदत घेणे आवश्यक व उचितही ठरते. मी ती घेतली आहे. त्यामुळे मी सिद्ध केलेले कृष्णचरित्र हे अत्यंत वेगळ्या प्रकारचे झाले आहे. कृष्णाच्या काळात प्रचलित असलेल्या राजनैतिक सिद्धांतांच्या व मानवी कृतिविषयक तत्त्वज्ञानांची तुलना मी कृष्णाच्या विचारांशी सतत करीत आलो आहे. त्या प्रकाशात खरे तर आता याच पद्धतीशास्त्राने महाभारतातील अशा अन्य पात्रांचीही चरित्रे रेखाटता येतील.

चरित्रातील माझी आस्था प्राचीन आणि मध्ययुगीन कालखंडापुरती मर्यादित नाही. आधुनिक काळातही मला स्वारस्य आहे. त्यामुळे बाळशास्त्री जांभेकर, महात्मा फुले, राघोबा पांडुरंग, न्या. रानडे, लोकमान्य टिळक, यशवंतराव चव्हाण इ. च्या चरित्रघटनांसंबंधी मी वेळोवेळी प्रकाश टाकून त्यांच्यातील दुर्लक्षित पैलू उजेडात आणण्याचा प्रयत्न केला आहे. महात्मा फुल्यांची वैचारिक जडणघडण कशी झाली त्यांचे वारकरी संप्रदायाशी काय नाते होते व विशेषत: त्यांच्यावर तुकोबांचा कसा प्रभाव होता यासंबंधी मी मांडलेले मुद्दे फुलेचरित्राच्या संदर्भात महत्वपूर्ण ठरलेले असून अभ्यासकांनी त्यांची यथोचित दखलही घेतली आहे. लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्यानिर्मितीची मीमांसा करणारे माझे व्याख्यान केसरी मराठा संस्थेनेच प्रकाशित केलेले आहे.

विठ्ठल रामजी शिंद्यांच्या परंपरेतील बडोदे येथील ब्राह्मणेतर पत्रकार भगवंतराव पाळेकर यांच्या 'जागृति' पत्रातील लिखाणाचे संपादन करताना लिहिलेल्या प्रस्तावनेत त्यांच्या चरित्रावर धावता दृष्टिक्षेप टाकला आहे. त्यालाही चरित्रलेखनात स्थान मिळायला हरकत नसावी. आता प्रसिद्ध मुद्रक-प्रकाशक-कार्यकर्ते दामोदर सावळाराम यंदे यांचे चरित्र लिहिण्याचा संकल्प सोडला आहे. बघू या केव्हा सिद्धीला जातो ते.

☐

सदानंद मोरे
७, सिद्धांत अपार्टमेंट,
३१२, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.




# चरित्र लेखन : धांडोळा आणि मूल्यमापन !

म. श्री. दीक्षित

बालवाचक, कुमार व तरुण वाचक आणि प्रौढ वाचक अशा तिन्हीचारी वयोगटातील वाचकांसाठी मी स्वातंत्र्योत्तर काळात (१९५६ ते १९९३) सोळा-सतरा लहानमोठी चरित्रं किंवा चारित्रसदृष पुस्तकं लिहिली आहेत. याशिवाय 'साहित्यिकांच्या सहवासात' आणि 'साहित्यिक सांगाती' अशी दोन व्यक्तिचित्रात्मक पुस्तकंही माझ्या नावावर आहेत. चरित्र किंवा चरित्रात्मक पुस्तकांखेरीज मी अन्य कुठल्याही साहित्य प्रकारातलं पुस्तक लिहिलं नाही. खरं सांगायचं तर ते मला जमलं नाही. चारसहा कथा, आठदहा कविता आणि दोनचार एकांकिका (रेडिआसाठी) मी लिहून पाहिल्या पण हा आपला प्रांत नव्हे हे मला लवकरच उमगलं. कथा, कादंबरी, काव्य, नाटक इ. वाङ्मय निर्मिती करण्यास जे प्रतिभेचं किंवा कल्पकतेचं बळ लागतं ते माझ्या अंगी नाही. अशा प्रकारच्या प्रतिभानिर्मित वाङ्मय प्रकारांचा मी एक रसिक वाचक मात्र जरूर आहे.

चरित्रात्मक लेखन करण्याचीच माझ्या लेखणीला का सवय जडली त्याला कारणं आहेत. कुमार आणि तरुणवयात माझ्या मनावर राष्ट्रीय स्वयंसेवक संघ आणि काही थोर व्यक्तींचे खोलवर संस्कार झाले. हे संस्कार अर्थातच देशभक्तीचे आणि समाजप्रेमाचे होते. चारित्र्य, परोपकार, वीरपूजन अशा गुणांचं बीज संघामुळे मनात पेरलं गेलं. तेरा ते अठरा अशी सहा वर्षे (१९३८-४४) मी नागपूरला होतो. साहजिकच संघशाखांकडे ओढला गेलो. हिस्लॉप कॉलेजमधील दोन वर्षांत डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या सारखा देशप्रेमी आणि ओजस्वी वाणीचा गुरू लाभल्यामुळे माझ्या भावनाप्रधान मनावर देशभक्तीचा संस्कार न घडेल तरच नवल.

१९४५ च्या आरंभापासून मी पुण्यात कायमचा राहू लागलो. पुणं हे विद्येप्रमाणेच राजकारणाचं नि सामाजिक, सार्वजनिक चळवळींचं केंद्र, सभा, संमेलनं, व्याख्यानं यांची इथे उदंड रेलचेल. त्यातही पारतंत्र्य मावळतं आहे आणि स्वातंत्र्य उगवतं अशा क्रांतीकाळात पुण्यात मी पाय रोवला. वाचनाची माझी हौस मी अप्पाबळवंत चौकातील गवत्या मारुतीनजीकच्या 'पैसा वाचनालया'त जाऊन भागवू लागलो. सभा संमेलनांसाठी शनिवारवाडा, जुनं टिळक मंदिर, शिवाजी मंदिर इथे पाऊलं आपोआप वळू लागली. १९४७ पासून श्री. म. माटे

यांचा नि साहित्य परिषदेचा सहवास लाभला. माट्यांचे माघारी दत्तो वामन पोतदार गुरुस्थानी लाभले. 'केसरी'चे केतकर आणि जयंतराव यांचा सहवास हळुहळू लाभू लागला. नागपूर मुक्कामी वीर सावरकरांचं दोनतीन वेळा दर्शन घडलं होतं. पुण्यातंही त्यांचं संजीवक वक्तृत्व ऐकण्याची संधी लाभत गेली. 'जे जे उत्तम, उदात्त, उन्नत' ते ते ऐकणं, वाचणं याचं वेडंच लागलं, आणि मी नकळत मनाने तरी हिंदुत्वनिष्ठ देशभक्त बनलो. काही परिस्थितीमुळे प्रत्यक्ष राजकारणात पडणं मला शक्य नव्हतं. मग विचारांती असा निश्चय केला की लेखनाच्या मार्गाने आपण जे जे भव्य, दिव्य, प्रेरणादायी, उदात्त गवसेल किंवा उपेक्षित आढळेल ते ते शब्दांकित करून वाचकांपुढे ठेवायचं. भले मग त्यात पैसे मिळोत वा न मिळोत.

इतिहास आणि काव्य हे दोन माझे विशेष आवडीचे विषय असले तरी वर्तमानाचं भान मला सतत असतं. मी ऐतिहासिक चरित्रंच लिहिली किंवा लिहू शकतो हा समज दुर्दैवाने रूढ झालाय. पण तो बरोबर नाही. 'भारतरत्न नेहरू' आणि 'पंतप्रधान शास्त्री' ही माझी दोन चरित्रं प्रसिद्ध आहेत. पंडितजींच्या निधनानंतर मी प्रकाशकाच्या मागणीप्रमाणे त्यांचं परिपूर्ण (१५० डेमी पृष्ठ) चरित्र दोन तीन महिन्यात लिहून दिलं. ते बालवाचकांसाठी नसून कुमार, तरुण, किंबहुना प्रौढ वाचकांसाठी सुद्धा आहे. त्याच्या तीन चार आवृत्त्या निघाल्या. माझं 'शास्त्रीजीं'चं चरित्रही युवकांनी वाचावं असं आहे. या दोन्ही चरित्रांचा उल्लेख अशासाठी केला की, चरित्रकाराला जात, पंथ किंवा राजकीय पक्ष नसतो. छाया चित्रकाराप्रमाणे तो आपला चरित्रविषय यथातथ्य वाचकांपुढे ठेवतो. खरं म्हणजे छायाचित्रकारापेक्षा चित्रकाराची भूमिका त्याने वाढवावी. मूळ मूर्ती जशीच्यातशी ठेवून ती अधिक आकर्षकपणे उभी करण्यात कौशल्य आहे. हे कौशल्य चरित्रकार ज्या प्रमाणात रसिक, जिज्ञासू, बहुश्रुत असेल त्या प्रमाणात साध्य होत असतं. माझ्या अंगी थोडंबहुत असं कौशल्य बाणल्यामुळे माझं एकूण चरित्र-वाङ्मय सरस, प्रेरणादायी उतरलंय असा आत्मप्रशंसेचा दोष पत्करून मी सांगतो.

चरित्रांचं मूल्यमापन त्यांच्या आकारावरून म्हणजे पृष्ठ संख्येवरून केलं जाऊ नये. उतार्‍यांच्या भाऊगर्दीने आणि पाल्हाळीकपणे माहितीवजा लिहिलेली चरित्रं मला आवडत नाहीत. चरित्र कसं बांधेसूध असावं. ते रचण्यापूर्वी चरित्रनायक अथवा नायिका यांच्यासंबंधी जेवढी अद्ययावत साधनसामग्री धुंडाळता, अभ्यासता येईल तेवढी अभ्यासावी आणि मगच टिपणांच्या आधारे कालानुक्रमाने त्या त्या व्यक्तीचं जीवन-कर्तृत्व वाचकांपुढे आपल्या मूल्यमापनासह ठेवावं. चरित्रविषयाशी तटस्थ राहून केलेलं लेखन रुक्ष, कोरडं होण्याचा धोका असतो. मग भले ते चरित्र कितीही वास्तव असो. अखेर चरित्र लिहायचं ते कशासाठी ? लोकांनी ते वाचावं, त्यांना ते आवडावं, त्यांनी त्यापासून काही प्रेरणा घ्यावी यासाठीच ना? मग ते सरसच व्हायला हवं नि त्यासाठी शैली हवी. विटांवर विटा ठेवून जशी भिंत तयार होत नाही, तिला चिखल, सिमेंट,

वाळू इ.ची गरज असते, तसंच चरित्र हे केवळ घटनांची उतरंड मांडून वा माळ गुंफून परिणामकारक होत नाही. चरित्र लेखक हा मुळातच रसिक, जिज्ञासू, बहुश्रुत आणि चांगला अभ्यासू हवा. झटपट लिहून प्रकाशात येण्याचा तो प्रकार नव्हे. चरित्रलेखन, मग ते लहान असो वा मोठं, एक प्रकारची तपश्चर्या आहे. त्या तपश्चर्येयेत हिंडणं-फिरणं, प्रवास सुद्धा आला.

मी मराठीतील बहुतेक महत्त्वाचं चरित्रवाङ्मय वाचित आलो आहे. आवडलेल्या काही ठळक चरित्रांची नावंच सांगायची तर मालाकार चिपळूणकर (ल. कृ. चि.), राणी लक्ष्मीबाई (पारसनीस), लो. टिळक (न. चिं. के.), आगरकर (मा. दा. आळतेकर), समर्थ चरित्र (सातारचे आळतेकर), न्या. रानडे (न. र. फाटक), चक्रवर्ती नेपोलियन (वि. ल. भावे), सावरकर (शि. ल. करंदीकर), वडिलांचे सेवेसी (अ. म. जोशी) अशी काही सांगता येतील. स्वातंत्र्योत्तर काळात ज्यांचं चरित्रवाङ्मय वाचून माझ्या मनबुद्धीला चांगलं खाद्य मिळालं असे काही चरित्रकार सांगायचे तर गं. दे. खानोलकर, अ. का. प्रियोळकर, पु. बा. कुलकर्णी, धनंजय कीर, दि. वि. काळे, वि. श्री. जोशी, द. न. गोखले, वसंत शांताराम देसाई, य. दि. फडके, सदाशिव आठवले, वि. ग. कानिटकर, माधव गडकरी, वि. स. वाळिंबे, श. श्री. पुराणिक यांची नावं मला खास करून उल्लेखाविशी वाटतात. शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांचं नाव मी या यादीत घेत नाही याचं कारण त्यांचं शिवचरित्र म्हणजे आधुनिक काळातली कादंबरीसदृष एक शैलीदार बखर आहे. जनमानसात 'शिवाजी' हा विषय पोचविण्याचं तिचं कार्य अमोलिकचं म्हणावं लागेल. अगदी अलीकडे ग. भा. मेहेंदळे यांनी अनेक भाषांमधील चरित्रसाधनांचा आठदहा वर्षे अभ्यास करून हजार पृष्ठांचं शिवचरित्र लिहिण्याचा जो अपूर्व उद्योग केला त्याची प्रशंसा म्या पामराने काय करावी! पण त्यांचं हे चरित्र एकतर अपूर्ण म्हणजे अफजलवधापर्यंतचं आहे आणि दुसरं म्हणजे त्याचे स्वरूप मुख्यत: साधनग्रंथासारखे आहे. संतचरित्रांचा उल्लेख मी इथे हेतुत: टाळला आहे. कारण एकतर त्यांचा समावेश संतवाङ्मयात होतो आणि दुसरं म्हणजे या लेखाच्या विस्तार फार वाढला आहे.

कोणतंही चरित्र वाचून आपल्याला नवीन काय कळलं, आपल्या चित्तवृत्ती कितपत बहरल्या, आपल्यातील निर्माणक्षमतेला काही खतपाणी मिळालं का असा विचार मी करत असतो आणि या दृष्टीनेच मी वर काही चरित्रकारांचा उल्लेख केला. आता एवढं सारं सांगून झाल्यावर मी स्वत:च्या चरित्रवाङ्मयाचा धांडोळा घेऊन त्याचं स्वयंमूल्यमापन करण्याचा यत्न करतो.

मी जी सोळासतरा चरित्रं किंवा चरित्रात्मक स्वरूपाची पुस्तकं लिहिली त्यातली काही संस्थांच्या आणि प्रकाशकांच्या मागणी नुसार लिहिली, तर काही मी माझ्या आवडीने लिहिली. १९५० साली अगदी छोट्या दोन चरित्रांनी माझ्या चरित्रलेखनास आरंभ झाला. 'वीरपत्नी माई सावरकर' हे छोटसं चरित्र काही हिंदुत्वनिष्ठ

भगिनींच्या आग्रहावरून मी लिहिलं, तर अ. वि. गृहाचे पां. श्री. घारे यांच्या विनंतीनुसार 'डॉ. आंबेडकरां'चं लिहिलं. माईंचं चरित्र त्यांच्या वीरपतीच्या आत्मपर गद्यपद्यात्मक लेखनाच्या आधारेच कसंबसं लिहावं लागलं. डॉ. आंबेडकरांसंबंधी लिहिताना 'नवयुग' साप्ताहिकाचा विशेषांक माझ्या बहुत कामी आला. मला आपलं एक आत्मसमाधान असं की मराठीत तरी छोटं, पण पहिलं आंबेडकर चरित्र मी लिहिलं. तेही पुन्हा त्यांच्या हयातीत १९५० साली. या दोन्ही चरित्रांचा दर्जा, मर्यादा यांची मला जाणीव आहे. चरित्रलेखनाचा श्रीगणेशा इतकंच त्यांचं महत्त्व.

इतिहासाची आवड आणि मनात रूजलेली देशभक्तीची नि वीरपूजनाची बीजं यामुळे काही ऐतिहासिक स्त्री-पुरुषांवर मी चरित्रवजा लेख एकेकाळी लिहित होतो. इतिहासातील उपेक्षितांविषयीसुद्धा सहानुभूतीने लिहिण्याचा मी यत्न केला. पेशवाईतील रत्ने, तेजस्वी तारका, पिचलेली मनगटे, झुंजार सेनानी ही माझी पुस्तकं म्हणजे बरेचसे पूर्वप्रकाशित लेख एकत्रित केले आहेत. याउलट जिजामाता, पुण्यश्लोक अहिल्याबाई ही दोन चरित्रं मी माझ्या मनाने, चरित्रनायिकांच्या प्रभावामुळे लिहिली. दोन्हींना कुमार, प्रौढ वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळाला. अहिल्याबाईंचं चरित्र लिहिण्यापूर्वी अभ्यासाला पूर्तता यावी यासाठी मी नर्मदाकाठच्या तिच्या महेश्वर राजधानीत आणि इंदोर शहरात मुक्काम ठोकला होता. महेश्वरातील होळकर घराण्यातील छत्र्या, नर्मदेकाठचा चिरेबंद लांबच लांब घाट आणि खुद्द अहिल्याबाईंची गादी नि देवघर पाहून मी भारावून गेलो. तिथून परतल्यावर भारावल्या अवस्थेतच मी त्या पुण्यश्लोक, परोपकारी, पण दुर्दैवी स्त्रीचं चरित्र अल्पावधीत लिहिलं. महेश्वरदरबारची बातमीपत्रे (दोन खंड) या ग्रंथापासून ते थेट १९५० पर्यंतची पुस्तकं अभ्यासल्यानंतर मी जो प्रवास केला त्यामुळे चरित्र माहितीपूर्ण, सरस उतरलं, काव्याचा मी भोक्ता असल्यामुळे बहुतेक चरित्रातून मी समुचित ठिकाणी अर्थपूर्ण काव्यपंक्ती किंवा कवितासुद्धा उद्धृत करतो. उदा. जिजामातेच्या चरित्रात कवी गोविंदांचा पाळणा किंचित बदल करून मी समाविष्ट केला.

तात्कालिक घटना-प्रसंगांच्या निमित्ताने माझ्या हातून उतरलेली चरित्रं म्हणजे 'सत्तावनचे सप्तर्षी' आणि 'तात्या टोपे'. सत्तावनच्या शताब्दीनिमित्त ही दोन पुस्तकं मी मोठ्या तळमळीने, भरपूर अद्ययावत साधनं वाचून लिहिली. नानासाहेब पेशवा, रावसाहेब (पुतण्या), राणी लक्ष्मीबाई, तात्या टोपे ही सत्तावनी उठावात भाग घेतलेली नि हौतात्म्य पत्करलेली मंडळी मराठी असल्यामुळे त्यांच्या कर्तृत्वाचं गुणगान मी साहजिकच विशेष ममत्वाने आणि प्रभावीपणे केलं. ऐतिहासिक सत्याकडे दुर्लक्ष न करता ऐतिहासिक चरित्रं शक्य तो रंजक पद्धतीने साकार करण्याची मी शिकस्त करतो. प्रस्तुत दोन पुस्तकं लिहिताना गोडसे भटजींच्या 'माझा प्रवास' पासून ते थेट सुरेंद्रनाथ सेन यांच्या 'एटीन फिफटीन सेवन' पर्यंतची अनेक साधनं मी अभ्यासली, तेव्हाकुठे माझं समाधान झालं. सहज आठवण आली म्हणून सांगतो की,

ग्रंथसूचीकार दाते यांनी आपल्या संग्रहीचं १८५७-५८ कालीन लंडन मध्ये प्रकाशित होणारं एक नियतकालिक मला आणून दिलं. त्यात 'लास्ट ऑफ द पेंढारीज' नामक तात्या टोपेसंबंधी तीन लेखांक टोपण नावाने आलेले होते. समकालीन लिहिलेल्या या लेखांचा त्याच्या चरित्रासाठी मला फार उपयोग झाला.

प्रौढ वाचकांसाठी मी नेपोलियन, प्रतापी बाजीराव, बाळाजी विश्वनाथ आणि सार्वजनिक काका अशी चार चरित्रं लिहिली. त्यातली पहिली दोन मी माझ्या आवडत्या वीरपुरुषांवर प्रथम काही लेखांक लिहून आणि नंतर त्यात भर घालून ग्रंथरूपाने वाचकांना सादर केली. या दोन्ही पुस्तकांसाठी माझ्या आयुष्याची मी दहा वर्षे खर्ची घातली. चरित्राविषयाशी या काळात मी इतका तद्रूप झालो होतो की, कधीकधी मी स्वप्नात 'सेंट हेलिना' बेटावर फेरफटका केला तर कधी बाजीरावाच्या मागे घोडदौड करीत नर्मदापार माळव्यात दौडत होतो. नर्मदाकाठचं रावेरखेडी येथील बाजीरावाचं स्मारक वृंदावन डोळाभरून पाहिलं, तिथली माती कपाळी लावली. तेव्हा कुठे चरित्र पूर्णतेला नेलं. प्राचार्य शिवाजीराव भोसले यांच्या हस्ते ते प्रकाशित झाल्यामुळे मला आस्मान ठेंगणं झालं. माझं 'नेपोलियन' पुस्तक 'केसरी' तर्फे प्रकाशित व्हावं आणि तेही दत्तो वामन पोतदारांच्या हस्ते हाही मोठा भाग्याचा प्रसंग होता.

चरित्रकाराच्या वाट्याला काही कटु अनुभव येतात. तेही सांगतो. जीव ओतून लिहिलेलं माझं बाजीराव चरित्र मे १९७९ मध्ये, त्यासाठी स्थापन झालेल्या बाजीराव चरित्र मंडळातर्फे मोठ्या समारंभपूर्वक प्रसिद्ध झालं. पण गेल्या अटरा वर्षात अजून दोन हजाराची आवृत्ती संपली नाही. अन्य एखाद्या प्रकाशकाला मी हे चरित्र दिलं असतं तर त्याच्या तीनचार आवृत्या निघाल्या असत्या. पण आमच्या हौशी, पण अननुभवी प्रकाशकाने चरित्राची ना कधी जाहिरात केली, ना कुठे ते अभिप्रायार्थ पाठवलं, ना विक्रेत्यांना रूढीनुसार कमिशन दिलं. 'बाळाजी विश्वनाथ' चरित्र सासवड येथे त्यांच्या पुण्यतिथीला डॉ. अ. दा. कुलकर्णी यांच्या हस्ते प्रकाशित झालं. प्रकाशक कोण तर श्रीदेव देवेश्वर संस्थान, पर्वती. दुदैव असं की, आज हे पुस्तक कुणाला विकत मिळत नाही. प्रती किती छापल्या गेल्या, कुठे गायब झाल्या सारं अनाकलनीय आहे. 'सार्वजनिक काका' हे माझं चरित्र 'पुणे सार्वजनिक सभे'तर्फे मा. बाळासाहेब भारदे यांच्या हस्ते नवा विष्णु मंदिरात प्रकाशित झालं ही आनंददायीच घटना होती. पण हे चरित्र 'सभे'चे सभासद आणि इतर कोणालाही लेखी मागणीनुसार विनामूल्य मिळू शकतं. मला मानधन आणि अकरा प्रती मिळाल्या असल्यातरी अजून या पुस्तकाच्या चारपाचशे प्रती पडून आहेत. सारांश, बाजीराव, त्याचा बाप आणि सार्वजनिक काका ही तिन्ही चरित्रे संस्थांतर्फे प्रकाशित झाल्यामुळे काहीएक निश्चित गुणवत्ता असूनही विक्रीव्यवस्थेतील अनभिज्ञतेमुळे ती वाचकांपर्यंत पोचू शकली नाहीत.

चरित्रांच्या बाबतीत माझ्या दृष्टीने अर्पणपत्रिका ही एक अर्थपूर्ण बाब आहे असं मला वाटतं. चरित्रलेखकाचं मन आणि







चरित्रविषयाशी त्याचं झालेलं तादात्म्य यांची प्रथमदर्शनीय ओळख या अर्पणपत्रिका करून देतात. नेपोलियन चरित्र त्याच्या स्मारकाचं सतराअठरा वर्षे खडा पहारा देऊन रक्षण करणाऱ्या निष्ठावान शिपायाला मी अर्पण केलंय, तर बाजीरावांचं चरित्र त्याच्या घोड्याला अर्पण केलंय. माझ्या इतर चरित्रात्मक पुस्तकांच्या अर्पणपत्रिकाही अशाच सूचकार्थी आहेत.

आपल्याला इच्छेप्रमाणे मोठं होता आलं नाही तर निदान थोरामोठ्यांची चरित्रं लिहून तरी काही सत्कार्य करावं, पुण्य जोडावं आणि त्यांचे पांग फेडवेत हे माझ्या चरित्रलेखनाचं उद्दिष्ट होतं. वर उल्लेखिलेल्या तीन दुर्दैवी चरित्रांखेरीज इतर चरित्रांच्या दोनदोन, तीनतीन आवृत्त्या निघाल्या. वाचकांनी प्रतिसादही चांगला दिला. अगदी पहिल्या वर्गात जमा होणारा चरित्रकार मी नसलो तरी हाय सेकंड क्लास मिळवणारा मी नक्कीच आहे.

☐

म. श्री. दीक्षित
तीनमूर्ती, ८६५ सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०.



## *ज्ञानपीठ पुरस्काराचे मानकरी कोण असावे?*

*मराठीतील साहित्यिकांपैकी यापुढील ज्ञानपीठ पुरस्कार कोणाला मिळावा असे तुम्हाला वाटते आणि का?*

*आपले मनोगत सुमारे तीनशे शब्दांत मुद्देसूद मांडून ते संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, टिळक रोड, पुणे ४११ ०३० या पत्त्यावर १० जानेवारी १९९८ पर्यंत अवश्य पाठवावे. निवडक मनोगतांना म.सा.पत्रिकेच्या दिवाळी अंकात प्रसिद्धी दिली जाईल. कृपया फक्त नावे सुचवू नयेत.*

*संपादक*

*मागील अंकातील या निवेदनाला पुरेसा प्रतिसाद मिळाला नाही. म्हणून हे आवाहन पुन्हा एकदा करीत आहोत. वाचकांनी या आवाहनाला जास्तीतजास्त प्रतिसाद द्यावा, ही विनंती.*



अनुक्रमणिका

# चरित्र-लेखन : जिज्ञासापूर्ती

राजा मंगळवेढेकर

मी माणूसप्रिय माणूस आहे. माणूस हा माझ्या आस्थेचा, चिंतनाचा व कुतूहलाचा विषय आहे. माणसाच्या आयुष्यात डोकावून, त्याची जडण-घडण, त्याचा व्यक्तित्त्व-विकास, त्याचे कर्तृत्व आणि त्याची विचारसृष्टी समजून घेण्याची उत्कट जिज्ञासा माझ्या ठायी आहे. आणि म्हणूनच मला कथा, कादंबऱ्या आदी कल्पनारम्य ललित साहित्य प्रकारांपेक्षाही चरित्र, आत्मचरित्र, आत्मगत आठवणी असा आत्मनेपदी साहित्य प्रकारच विशेष आवडतो. कारण त्यात प्रत्यक्ष माणूसच भेटतो. त्याचं जीवनदर्शन घडतं. त्याची तत्कालीन कौटुंबिक, सामाजिक, राजकीय परिस्थिती आणि यातून त्याची झालेली वाढ आदी गोष्टींचा ठावठिकाणा लागतो. त्याच्या विचार-पुरुषार्थाचा अन्वयार्थ लक्षात येतो. त्यात वस्तुस्थिती असते. जीवन असते. म्हणूनच मी असे आत्मनेपदी साहित्य आवर्जुन वाचतो.

या वाचन, चिंतनातूच मला किशोरकुमार- तरुण मित्रांसाठी छोट्या छोट्या चरित्रलेखनाची प्रेरणा मिळाली. एक तर मी बहुतांशी मुलांचा लेखक आहे. 'बालसाहित्यकार' असा शिक्का माझ्यावर उमटलेला आहे. आणि मला त्यात अगाध, अपूर्व असा आनंदही आहे. अशी चरित्रं जी मी लिहिली, ती उगवत्या, संस्कारक्षम, पिढीला आपल्या राष्ट्राची व राष्ट्रपुरुषांची थोरवी कळावी या हेतूनेच. मी जसा लेखक आहे, तसाच एक लहानसा सामाजिक कार्यकर्ताही आहे. स्वातंत्र्य लढ्याशी आणि सामाजिक व सांस्कृतिक आंदोलनाशी माझी जवळीकही होती. सानेगुरूजी, एस. एम. जोशी यांच्यासारख्या चारित्र्यवान व सत्त्वशील व्यक्तींचा निकट सहवास मला लाभला आणि त्यांचा प्रभाव माझ्यावर पडला.

हे सगळे काहीशा विस्ताराने सांगण्याचे कारण असे की, मी पुढे ज्या तीन मोठ्या चरित्रांचे लेखन केले त्यामागची माझी वैचारिक पार्श्वभूमी लक्षात यावी.

'साने गुरुजींची जीवनगाथा', 'भूमिपुत्र' व 'नवलकथाः एका पुरुषार्थाची' असे तीन चरित्रग्रंथ मी लिहिले. परंतु केवळ आत्मप्रेरणेने हे लेखन माझ्याकडून झालेले नसून ते परिस्थितीनुरूप घडलेले आहे.

सानेगुरुजींचा परिवार तसा मोठा आहे. या परिवारात कवी, लेखक, विद्वान, विचारवंतही आहेत. पण असे असूनसुद्धा



अनुक्रमणिका



गुरुजींच्या पश्चात वीस-बावीस वर्षं त्यांचं बृहद असं चरित्र लिहिण्यासाठी कोणीच सरसावलं नाही. असे चरित्र लिहिले जावे व ते प्रसिद्ध व्हावे, असे मात्र सर्वांनाच वाटत होते. पण लिहू शकणाऱ्यांपैकी बहुतेक सर्वजण आपआपल्या कामात फार गढलेले होते. त्यातून त्यांना अवसर काढणे शक्य नव्हते. मी सानेगुरुजींचे एक छोटेसे चरित्र मुलांसाठी लिहिले होते, पण असे बृहद चरित्र लिहावे असे मात्र मला वाटले नव्हते. कारण अशा चरित्रलेखनाचा अनुभव, व्यासंग व कुवत आपल्या जवळ नाही, याची मला जाण होती.

परंतु हे काम माझ्याकडूनच व्हावे, असे नियतीनेच बहुधा ठरविलेले असावे. गुरुजींना जाऊन तेवीस वर्षे झाली होती आणि असे चरित्र एवढा विलंब झाला असला तरी, आता निदान त्यांच्या पंचविसाव्या स्मरणदिनादिवशी म्हणजे, ११ जून १९७५ रोजी तरी प्रसिद्ध व्हावे, असे मात्र उत्कटतेने वाटू लागले होते. माझ्या प्रमाणेच एस.एम.जोशी, ग.प्र. प्रधान, यदुनाथ थत्ते आणि प्रकाश मोहाडिकर या मित्रांनाही वाटत होते. प्रकाशभाईंनी तर यासाठी साधनेच्या कार्यालयात यदुनाथ, प्रधान आणि मी अशा तिघांना बोलावून घेतले होते; आणि त्या बैठकीतच असे चरित्र पुढील दोन वर्षांत मी लिहून सिद्ध करावे असा निर्णय झाला.

हे कळल्यावर एके दिवशी एस. एम. अण्णांचा मला फोन आला. म्हणाले, ''तू हे काम स्वीकारलंस हे ऐकून समाधान वाटलं. गुरुजींच्या साधना ट्रस्टचा मी अध्यक्ष असताना व आमचं प्रकाशन व प्रेसही असताना गुरुजींचं विस्तृत चरित्र अद्याप प्रसिद्ध होऊ नये याची मला अलिकडं लाज वाटू लागली होती. तू हे चरित्र लिहून ही उणीव भरून काढ. तुला खर्चासाठी काही रक्कम व प्रवासखर्चही देऊ, त्याची काळजी करू नकोस.''

हे काम स्वीकारल्याबरोबरच मी माझ्या पद्धतीनं कामाला लागलो. गाठीभेटी, मुलाखती, पत्रव्यवहार, प्रवास करू लागलो. गुरुजीप्रेमी मंडळीकडून प्रतिसादही चांगला मिळू लागला. प्रवास खर्चासाठी फक्त एकदाच मला आंतरभारती ट्रस्टकडून पैसे घ्यावे लागले. नंतर जिथं तिथं मी जात असे तिथं तिथं माझ्या कथाकथनाच्या कार्यक्रमातूनच मला पैसे मिळत गेले. राहण्याजेवणाची व्यवस्थाही ठिकठिकाणच्या सेवादलाच्या कार्यकर्त्यांच्या घरीच होत असे. त्यामुळे तोही खर्च कधी करावा लागला नाही.

महाराष्ट्रात गुरुजी जिथं जिथं गेले, राहिले, तिथं तिथं मी गेलो. ज्यांच्या ज्यांच्याशी त्यांचा संबंध आला होता त्यांना त्यांना भेटलो. गुरुजींनी लिहिलेली अनेक पत्रं गोळा केली. गुरुजींची हस्तलिखितं मिळवली. मुलाखती टेप केल्या. या सगळ्यांसाठी अनेक गावांतून खेड्यांपाड्यांतून गेलो. धुळे, नाशिक, येरवडा या कारागृहात जाऊनही बंदीवान गुरुजींच्या जागा, कोठड्या पाहिल्या, अनेक वृत्तपत्रांच्या फायली तपासल्या, वाचल्या आणि हवा तो मजकूर लिहूनही घेतला. या कामीही सेवादलातल्या मित्रांची खूपच मदत झाली. गुरुजी समजून घेण्याच्या दृष्टीने आचार्य विनोबाजी, दादा धर्माधिकारी,

अच्युतराव पटवर्धन, एस. एम. जोशी, ना.ग. गोरे, बाबा आमटे, द. रा. बेंद्रे, नरहर कुरुंदकर आदि मान्यवर विचारवंतांशी केलेल्या चर्चांचा मला खूपच अपयोग झाला. या काळात मी पार झपाटल्या-सारखाच झालो होतो.

सतत दोन वर्षांच्या परिश्रमांनंतर ११ जून १९७५ रोजी 'साने गुरुजींची जीवनगाथा' हा चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाला. या ग्रंथाचा प्रकाशन समारंभ त्याच दिवशी महाराष्ट्रात थोरामोठ्यांच्या हस्ते सुमारे पंधरा वीस ठिकाणी झाला. ही पुण्याई अर्थातच साने- गुरुजींची होती.

हे चरित्र लिहिताना दोन गोष्टींचे आव्हान माझ्यापुढे होते. एक तर मी गुरुजींच्या प्रभावाखाली वाढलेला होतो, त्यामुळे चरित्रलेखनाला आवश्यक अशी तटस्थता मी कशी काय साधणार? आणि दुसरे आव्हान होते ते गुरुजींच्या मृत्यूसंबंधीचे.

परंतु गुरुजींचा प्रभाव जरी माझ्यावर होता, तरी तो मी चरित्रकार म्हणून बहुतांशी बाजूला ठेवला आणि सानेगुरुजींच्याकडे पांडुरंग सदाशिव साने हा केवळ एक माणूस म्हणूनच पाहिले. त्यांच्या वलयात त्यांना पाहिलेच नाही. त्यामुळे आवश्यक ती तटस्थता मी राखू शकलो. आणि याची कबुली, मुलाखतीच्या वेळी ज्या नरहर कुरुंदकरांनी या विषयी शंका व्यक्त केली होती, त्यांनीच ग्रंथप्रसिद्धीनंतर दिली. मला मोठे समाधान लाभले.

गुरुजींनी आपणहून आपला देहत्याग केला तो केवळ तत्कालीन स्वातंत्र्योत्तर राजकीय परिस्थितीतून आलेल्या विफलतेमधून किंवा नैराश्यामधूनच नव्हे तर त्यांच्या व्यक्तिगत असलेल्या अनेक बाबींचा तो परिपाक होता. गुरुजींच्या व्यक्तिमत्त्वात मला प्रामुख्याने दोन गोष्टी, अगदी चमत्कारासारख्या आढळल्या. एक म्हणजे पुरुष प्रकृतीमध्ये स्त्रीत्त्वाचे किंबहुना मातृत्त्वाचे सहजरित्या कलम झालेले होते, आणि दुसरे म्हणजे, गुरुजींच्या ठायी मृत्यूविषयीची अपार उत्कंठा, अलिंगन, आतुरता होती. त्यांच्या गद्य-पद्य साहित्यात या संदर्भातील विचार याची साक्ष देऊ शकतील. त्यांच्या स्वभावातच उत्कट अशी समर्पणाची भावना होती. त्यांनीच एके ठिकाणी म्हटले आहे, "मला एका अमेरिकन कवीची ' When I give, I give all' ही ओळ फार आवडते. हात राखून देणे मला मानवतच नाही." या वृत्तीतूनच गुरुजी आपले प्राण पणाला लावून एखाद्या प्रश्नासाठी लढण्यास सिद्ध होत असत. गुरुजींचा पिंडच असा उदात्त उमाळ-उमाळ्यांचा (Noble Impulses) होता 'उदात्त-उमाळ्यांचा माणूस' असेच त्यांचे वर्णन करावे लागेल. त्यांच्या व्यक्तित्त्वात शांती आणि अशांती या दोहोंचाही आढळ त्याचमुळे होतो.

मानवाविषयी गुरुजींच्या ठायी असलेल्या अथांग करुणेलाच वात्सल्याचे धुमारे फुटले होते. आणि या वात्सल्यानेच त्यांना समाज-मातृत्त्वही प्राप्त झाले होते. मातेच्या ममतेनेच ते सगळ्यांकडे पाहात असते. चिडले-रागावले तरी तो पुन्हा मातेचाच राग होता. मुलाला काही कारणाने एखादे वेळी मारल्यानंतर आई जशी दुःखी होऊन अश्रू ढाळत बसते तसेच गुरुजीही

बसत असत. स्वतःच्या आईकडून लाभलेला हा वात्सल्याचा वारसा त्यांनी समाजव्यापी बनवला. पत्नीनिरपेक्ष अशा विशाल मातृत्वाचा गुरुजी म्हणजे एक विलक्षण आणि फार फार क्वचित आढळणारा आदर्श होता.

शालेय जीवनात असतानाच मला त्यांच्या गोष्टींनी व 'श्यामची आई' या आत्मकथनपर कादंबरीने मोहित केले होते. त्यांच्या 'भारतीय संस्कृती' ह्या पुस्तकानेही मला प्रभावित केले होते. त्यांच्या सहवासात त्यांची कितीतरी भाषणे मी ऐकली होती. त्यांचे वक्तृत्त्व असामान्य होते. त्यांच्या व्यक्तित्त्वाला अनेक चमकदार पैलू होते. सेवा, त्याग आणि प्रेम या सद्गुणांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व सुगंधी बनलेले होते. मला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाने आकर्षित केले होते. आणि म्हणूनच मी त्यांच्या समग्र जीवनगाथेचा शोध घेण्याचा प्रयत्न केला.

सानेगुरुजींचे चरित्र लिहून पूर्ण झाले, तेव्हाच एके दिवशी माझे एक अभ्यासू आणि विचारवंत लेखक मित्र श्री. वसंत पळशीकर हे माझ्याकडे आले नि म्हणाले, "सहकारी साखर कारखान्याचे एक जनक पद्मश्री विखे पाटील यांच्या चरित्र-लेखनाची ऑफर मी घेऊन आलो आहे." ही ऑफर ऐकून मी चकित झालो आणि गोंधळूनही गेलो. अशी ऑफर अनपेक्षित होती म्हणून चकित झालो होतो. तर सहकारी साखर कारखानदारी ही तोवर सहकारातील स्वाहाकारामुळे आणि राजकारणातील सत्तालोभामुळे पार बदनाम झालेली होती. तेव्हा ही ऑफर स्वीकारावी की नाही अशा विचारमुळेच काहीसा गोंधळून गेलो होतो. मी पळशीकरांना म्हणालो, "वसंतराव, तुम्ही ही ऑफर आणलीत म्हणून मी विचार तरी करू शकतो. अन्यथा मी तात्काळ नकारच दिला असता. परंतु मी विचार करतो आणि चार-पाच दिवसांत कळवतो."

वसंत पळशीकरांना सांगितल्याप्रमाणे मी खरोखरच विचार करू लागलो. पद्मश्री विखे पाटील आणि त्यांचा पहिला साखर कारखाना ऐकून माहित होता; आणि हेही माहित होते की, आशिया खंडातल्या या पहिल्या वहिल्या साखरकारखान्याचे वैचारिक आणि आर्थिक धुरनत्व विख्यात अर्थशास्त्रज्ञ श्री धनंजयराव गाडगीळ आणि तत्कालीन सहकार मंत्री गांधीवादी कार्यकर्ते श्री वैकुंठभाई मेहता यांनी केलेले होते. तेव्हा मी निर्णय करताना माझ्या मनाशीच म्हणालो की, विखे-पाटलांच्या मागं ज्या अर्थी या दोन महनीय व्यक्ति उभ्या ठाकल्या होत्या, त्याअर्थी मलाही त्यांचे चरित्र लिहायला हरकत नाही. शिवाय चरित्र लेखनाबद्दलही आपल्याकडे संत, साधू, पुढारी, योद्धे, राजे-महाराजे, अशांचीच चरित्रे लिहावयाची असा एक साचेबंद विचार झालेला आहे. पण अमेरिकेत हेन्री फोर्ड यांच्यासारख्या उद्योगपतींची चरित्रेही प्रसिद्ध होतात. मराठीतही अलिकडे वालचंदजी दोशी, जमशेदजी टाटा आदि उद्योजकांची चरित्रे प्रसिद्ध होत आहेत. मग शेतीच्या क्षेत्रात एखाद्या प्रतिभावंत शेतकऱ्याने जर अपूर्व कामगिरी केली असेल तर त्याचंही चरित्र का लिहिले जाऊ नये?... पद्मश्री विखे पाटील यांनी आपला पहिला सहकारी

साखर कारखाना उभारताना फार कष्ट घेतले होते. हेटाळणी सहन केली होती. अडचणींचे चढउतार ओलांडले होते. दैन्यावस्थेतील शेतकऱ्यांना त्यांच्या कच्चा मालाचे रूपांतर पक्क्या मालात करून दिले होते आणि त्यांना सुस्थिती प्राप्त करून दिली होती. कृषी औद्योगिक क्रांतीचा पायाच सहकार क्षेत्रात विखे-पाटलांनी घातलेला होता. एस. एम. जोशी एकदा म्हणाले होते, ''महाराष्ट्राच्या भूमीचे नंदनवन जेव्हा कधी काळी व्हावयाचे असेल ते होवो; पण आज सहकारी साखर कारखान्यामुळे बऱ्याच ठिकाणच्या दुष्काळी भागातही 'ओॲसिस', 'हिरवी बेटे' निर्माण झालेली आहेत.'' श्री धनंजयराव गाडगीळ यांनी या कारखान्यासाठी बनविलेल्या घटनेनुसार अर्ध्या- एक एकराचा शेतकरी मालकही कारखान्याचा भाग घेऊ शकतो. सहकारी साखर कारखान्याच्या क्षेत्रात असलेल्या अनेक लहान लहान गावांमध्ये असे कितीतरी लहान लहान शेतमालक आहेत. ते आज कारखान्याच्या मदतीने आपल्या लहानशा शेतीच्या तुकड्यात उसाचे पीक घेत आहेत आणि सुखाचे दोन घास खाऊन जगत आहेत. कारखान्याच्या कार्यक्षेत्रात जवळ जवळ ऐंशी टक्के शेतमालक असे लहानशा तुकड्यांचे शेतकरी आहेत. सहकारी कारखानदारीमुळे त्यांची आर्थिक स्थिती पालटली असून सुबत्ते बरोबरच त्यांच्याकडे शिक्षणाची ही वाढ झालेली आहे. नवे जीवन त्यांना लाभलेले आहे. या साऱ्या गोष्टी लक्षात घेऊनच मी पद्मश्रींचे चिरंजीव व प्रवरा सहकारी साखर कारखान्याचे तत्कालीन चेअरमन श्री. बाळासाहेब विखे पाटील यांना होकार दिला. लोणीच्या डाकबंगल्यात झालेल्या पहिल्या भेटीतच मी त्यांना त्या वेळी माझा चरित्र लेखनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन सांगितला होता आणि स्पष्टपणाने हेही सांगून टाकले होते की, ''पद्मश्रींनी ग्रामीण विभागात कृषी-औद्योगिक क्रांतीचे जे क्रांतिकार्य सहकारी क्षेत्रात केले आहे, त्याचा यथायोग्य असा गौरव मी करीन, परंतु तुमच्या वडिलांना मी देव बनविणार नाही.'' त्यावर त्यांनीही याला संमती दर्शविली होती.

या चरित्र-लेखनासाठी आवश्यक ती साधने गोळी करण्याकरता या वेळीही मी दीड-दोन वर्षे कष्ट घेतले. कारखान्याच्या क्षेत्रात गावोगावी गेलो. उसाची शेती पाहिली. पाण्याची व्यवस्था पाहिली. जमीन, खत, उसाचे बेणे, आणि पाणी वगैरे गोष्टीबद्दल त्या त्या क्षेत्रातील तज्ञांकडून माहिती मिळवली. खरं तर, त्या आधी मला उसाचे डोळा असलेले दांडके जमिनीत उभे की आडवे खुपसून पेरणी करावयाचे असते हे देखील माहित नव्हते. 'बारामाही' 'अडसाली' 'फुटवा'... ही उसातली परिभाषाही मला एकदम नवीनच होती. पण ती मी शिकलो. उसाची शेती आणि साखरनिर्मितीची औद्योगिक प्रक्रिया यातील संबंधितांशी अनेक ठिकाणी जाऊन बोललो. त्यांच्या मुलाखती घेतल्या. त्या प्रश्नांच्या संदर्भातील ग्रंथ वाचले. जाणकारांशी चर्चाही केल्या. त्यात अगदी लहानशा शेतकऱ्यापासून किंवा कारखान्यातील कामगारापासून ते त्या त्या क्षेत्रातील जाणकार आजी व माजी अधिकाऱ्यापर्यंत जाऊन भिडलो. त्या वेळी केन्द्रीय












मंत्रिमंडळात राज्य कृषीमंत्री व शेतीतज्ञ असलेले श्री. अण्णासाहेब शिन्दे, भारताचे संरक्षण मंत्री श्री यशवंतराव चव्हाण, गोखले अर्थसंस्थेचे आर. जी. काकडे, श्री वर्दे आदी प्रतिष्ठितांच्याही मुलाखती घेतल्या.

दि. २८ ऑगस्ट १९७७ रोजी 'भूमिपूत्र' या नावाने सिद्ध झालेल्या पद्मश्री विखेपाटलांच्या चरित्रग्रंथाचे प्रकाशन श्री. ग. दि. माडगूळकरांच्या अध्यक्षतेखाली झाले. या ग्रंथाला श्री. यशवंतराव चव्हाण यांची प्रस्तावना लाभली. बहुतेक प्रमुख वृत्तपत्रांमधून या चरित्र ग्रंथाबद्दल अनुकूल अशी परीक्षणे प्रसिद्ध झाली होती.

या चरित्रलेखनामुळे मला एका वेगळ्या प्रकारचे शिक्षण मिळाले. माझा जीवनानुभव वाढला.

नवलभाऊ फिरोदियांशी माझी ओळख तशी तीस-पस्तीस वर्षापूर्वीचीच. रावसाहेब व अच्युतराव पटवर्धन यांच्याकडे झालेली. आणि पुढे आंतरभारतीच्या व राष्ट्रसेवादलाच्या कार्यक्रमांच्या वेळी झालेल्या गाठीभेटीत वाढलेली.

नवलभाऊ हे एक देशभक्त, स्वातंत्र्यसैनिक आणि मोठे उद्योजक म्हणून मला माहितीचे होते. स्वातंत्र्यानंतर देश उभारणीच्या कामात औद्योगिक क्षेत्रात पदार्पण करून देशी उत्पादनाची वाढ करून देशातील बेकारीचा पश्न सोडविण्याला व लोकांच्या उपयोगाच्या वस्तूंची निर्मिती करून देशाला समृद्धीकडे नेण्याच्या विचाराने, बेचाळीस सालच्या लढ्यात तुरुंगात असतानाच नवलभाऊ झपाटलेले होते. तुरुंगातून सुटल्यावर, नगरमधली चांगली चालती वकिली सोडून ते आपल्या काही मित्रांच्या सहकार्याने उद्योग-क्षेत्राकडे वळले. स्वातंत्र्यानंतर सत्तेचे एखादे मोठे पद सहज मिळण्यासारखे असताना देखील नवलभाऊंनी त्याकडे पाठ फिरवली अणि उद्योगातून देशसेवेचा मार्ग धरला.

स्वातंत्र्यानंतर, मुंबई इलाख्यातील माणसाने ओढण्याच्या रिक्षांवर सरकारने बंदी घातली. माणुसकीच्या दृष्टीने हा निर्णय स्वागतार्ह असाच होता, पण त्या रिक्षांच्या ऐवजी लोकांना सहज सुटसुटीत व स्वस्त अशा वाहनांचीही गरज निर्माण झाली होती. उद्योगाच्या शोधात असणाऱ्या नवलभाऊंनी ही गरज मोठ्या हुषारीनी हेरली आणि अशा वाहनाचा शोध ते घेऊ लागले. या शोधात त्यांना इटली या देशाने बनविलेले स्वयंचलित रिक्षाच्या धर्तीवरचे एक वाहन त्यांच्या नजरेस आले. पियाज्जो कंपनीने ते काढलेले होते. परंतु तिथे ते मालाची वाहतूक करण्यासाठी वापरात होते. नवलभाऊंना आपल्याकडील गरज भागविण्यास याचा उपयोग होईल असे दिसले आणि मग त्यांनी त्या कंपनीशी आवश्यक ते करारमदार करून ते वाहन प्रथम भारतात आणले. भारतीय वातावरणाला अनुसरून त्यात आवश्यक ते फेरबदल केले आणि सामान्य माणसाला परवडेल असे जलद, सुटसुटीत व सुलभ असे वाहन रस्त्यावर आणले. हे वाहन म्हणजेच 'ऑटोरिक्षा'. हा शब्ददेखील नवलभाऊंचाच तोही आता सगळ्यांना चिरपरिचित होऊन गेलेला आहे. इतकेच नव्हे, तर ऑक्सफर्ड डिक्शनरीत तो जाऊन बसला आहे.



अनुक्रमणिका

भारतीय ऑटोरिक्षाचे आणि टेम्पोचे जनकत्त्व नवलभाऊंच्या शोधक दूरदृष्टीकडे आणि कर्तृत्वाकडे जाते.

नवलभाऊंचे हे कर्तृत्त्व मला परिचित होते. त्यांच्यातील अभिजात व प्रतिभाशाली अशा उद्योगजकाबद्दल माझ्या मनी मोठे कुतुहल वसत होते. आणि म्हणूनच त्यांच्या चरित्र-लेखनाविषयी जेव्हा मला, त्यांचे धाकटे बंधू श्री हस्तीमलजी यांच्या मार्फत, विचारण्यात आले, तेव्हा मी चटकन होकार दिला.

मुळात मला माणसांचाच लोभ आहे. स्नेह आहे. त्यातून नवलभाऊंसारख्या चतुरस्त्र, अष्टपैलू, गुणवंत, यशवंत माणसांविषयी तर फार फार आस्थापूर्ण कुतूहल व जिज्ञासा वाटते. वाटते की, ह्या अशा माणसांच्या जवळ जाऊन, सानिध्यात राहून, ऐकून-बोलून-पाहून ही माणसे समजावून घ्यावीत. त्यांच्या कर्तबगारीचा व धडपडीचा आलेख न्याहाळावा. त्यांच्या विचार आणि आचारसृष्टीत डोकावून बघावे.

चरित्र- लेखनाच्या निमित्ताने मला अशी संधी लाभली. नवलभाऊंचेच बोट धरून त्यांनी मळवलेल्या वाटेवरून हिंडलो-फिरलो.

नवलभाऊंचे वेगळेपण मला भावले होते ते असे की, ते अन्य उद्योजकांपेक्षा आगळे होते. त्यांचे हे आगळेपण त्यांच्या खादीच्या साध्यासुध्या वेषावरून, तितक्याच साध्यासुध्या वागण्या-बोलण्यावरून व दिसणाऱ्या बाह्यांगावरून दृगोचर होते. तसेच त्यांच्या ध्येयासक्त अंतरगाचेही उदात्त हृद्य असे दर्शन होते !

आपल्या देशात अंगच्या कर्तबगारीने नवलभाऊंसारखे किंवहुना अधिकही असे अनेक उद्योजक आहेत. त्यातील जे.आर.डी. टाटा, वालचंद हिराचंद, बिर्ला, किर्लोस्कर आदी थोरांची या देशातली उद्योग प्रवर्तनातली कामगिरी निर्विवाद थोरच आहे! स्वातंत्र्याच्या लढ्यातील त्यागी, तपस्वी, झुंजार नेत्यांप्रमाणेच ही मंडळीही तितकीच देशभक्त होती. नवभारताची शिल्पकार होती. नवलभाऊ हे त्याच परंपरेतले होते.

नवलभाऊंशी संवाद गोष्टी करताना त्यांच्यातील प्रखर देशभक्तीचा, ईश्वरनिष्ठ धार्मिक वृत्तीचा, समाज सुधारकाचा व चौफेर जागृत अशा नागरिकाचा निकटचा परिचय झाला. यातून जाणवले ते हे की, हे नवलभाऊंचे नुसतेच चरित्र नसून चरित्र्यही आहे! चरित्र तसे सगळ्यांनाच असते, चारित्र्य मात्र असतेच असे नाही. नवलभाऊंच्या चरित्रावर त्यांच्या चरित्र्याचा परीमळ खूपच जाणवला ! चरित्र मूल्याधिष्ठित आणि सुगंधित वाटले! आणि म्हणूनच मी 'नवलकथाः एका पुरुषार्थाची!' हे अर्थपूर्ण शीर्षक या चरित्रग्रंथाला दिले!

२ सप्टेंबर १९९० रोजी श्री नवलभाऊंच्या ८१ व्या वाढदिनी, बालगंधर्व रंगमंदिर-पुणे येथे थोर देशभक्त अच्युतराव पटवर्धन यांच्या शुभहस्ते या चरित्रग्रंथाचे प्रकाशन झाले. त्यावेळी नवलभाऊ म्हणाले, ''या चरित्रग्रंथाने राजाभाऊंनी माझीच मला ओळख करून दिलेली आहे.''...मला लेखक म्हणून फार समाधान वाटले.

एक, संतवृत्तीचा, मातृहृदयी, झुंजार क्रांतिकारक देशभक्त व जीवनाचा नम्र



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



उपासक असा श्रेष्ठ साहित्यिक; दुसरा अल्पशिक्षित, पण समाजहितैषी असा सहकाराच्या क्षेत्रात जिद्दीने वाटचाल करून कृषि-औद्योगिक क्रांतीची ध्वजा फडकविणारा शेतकरी, आणि तिसरा जसा निष्ठावंत स्वातंत्र्यसैनिक, तसाच शोधक प्रतिभावान, असा उद्योजक अशी तीन थोर माणसे मला भेटली. त्यांचे कर्तृत्व पुरुषार्थ शब्दबद्ध केला. माझे शिक्षण झाले अनुभवसमृद्धी लाभली !

❑

राजा मंगळवेढेकर
९ अशोकवन, मॉडेल कॉलनी,
पुणे ४११ ०१६.

## साभार पोच

**श्रीविद्या प्रकाशन, पुणे यांची प्रकाशने**

❑ **आद्य शंकराचार्य जीवन व विचार :** अरुंधती खेडकर, पृष्ठे ९२, मूल्य ऐंशी रुपये.

❑ **भारत कधी कधी माझा देश आहे :** रामदास फुटाणे, पृष्ठे ९६, मूल्य साठ रुपये.

❑ **नारी पर्व :** नीलम गोऱ्हे, पृष्ठे २१९, मूल्य एकशे पन्नास रुपये.

❑ **अष्ट पैलू आचार्य अत्रे :** माधव गडकरी, पृष्ठे ७२, मूल्य पन्नास रुपये.

❑ **म. फुले आणि विष्णू शास्त्री चिपळूणकर :** गजमलमाळी, राजमुद्रा प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २१५, मूल्य दोनशे पंधरा रुपये.

❑ **कल्पद्रुमाच डहाळी :** गजमलची माळी,राजमुद्रा प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ५०, मूल्य पंचवीस रुपये.

**वैष्णव प्रकाशन, अमरावती यांची प्रकाशने**

❑ **पज्ञाचक्षु जीवन व कार्य :** वंदन मोहाडे, पृष्ठे १६०, मूल्य शंभर रुपये.

❑ **विराम :** बाबा मोहाडे, पृष्ठे ११२, मूल्य पन्नास रुपये.

❑ **माझी सर्वोदय यात्रा :** बाबा मोहाडे, पृष्ठे ८८, मूल्य पस्तीस रुपये.

❑ **वेचिता अनुभव सुमने :** वीणा मोहाडे, पृष्ठे १०४, मूल्य चाळीस रुपये.

❑ **राष्ट्रसंत व सानेगुरूजी :** प्र. वा. जावरकर, पृष्ठे ८०, मूल्य तीस रुपये.

❑ **दर्शन मोक्ष साधनम :** पार्श्वकुमार सा. गुंडवाडे, मुक्ती प्रकाशन, बेळगांव, पृष्ठे १८०, मूल्य शंभर रुपये.

**मोरया प्रकाशन, डोंबिवली यांची प्रकाशने**

❑ **घटनाकार बाबासाहेब आंबेडकर :** सौ. सुनीता नागपूरकर

❑ **महाकवी कालीदास :** सौ. सुनीता नागपूरकर

**लोकवाङ्मय गृह प्रकाशनाची प्रकाशने**

❑ **वैज्ञानिक दृष्टिकोन आणि आपण :** सुधीर पानसे, पृष्ठे १३५, मूल्य शंभर रुपये.

❑ **कम्युनिस्ट पक्षाचा जाहिरनामा :** ल. ख. कारखानीस, पृष्ठे ४८, मूल्य वीस रुपये.

❑ **समाजवादी चळवळी पुढील आव्हान :** रावसाहेब कसबे

❑ **रसगंगा :** वसंतराव चिंधडे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठ-१२८, मूल्य साठ रुपये.










# शाहिरी : चरित्रलेखनाचे अंग

## सविता भावे

माझ्या चरित्रलेखनाला सुरुवात झाली ती एक आवश्यकता म्हणून. शाळा कॉलेजात असताना बरेच ललित लेखन प्रसिद्ध झाले होते. पण नंतर त्यात १०/१२ वर्षांचा खंड पडला होता. माझे विमा व्यवसायातील गुरू प्राचार्य ना. ग. नारळकर यांच्या निधनानंतर त्यांचे चरित्र लिहिण्यासाठी कोणी पुढे येईल असे दिसेना, तेव्हा मीच ते काम करण्याचे योजिले. त्यातून नोव्हेंबर १९६७ मध्ये 'नाना: एक शिल्पकार' हे चरित्र सिद्ध झाले. त्याचे प्रचंड स्वागत झाले. आचार्य अत्रे यांनी 'मराठा' मध्ये अग्रलेख लिहून 'मोठा साहित्य विक्रम' असे त्याचे कौतुक केले. त्याचबरोबर 'चरित्रलेखनाचा हा प्रकारच अजिबात वेगळा आहे' असे मूल्यमापन केले. 'अव्वल दर्जाची प्रतिभा आणि असामान्य परिश्रमशीलता यांच्या मिळणीमुळेच हे शक्य झाले आहे' असा निष्कर्षही आ. अत्रे यांनी त्या अग्रलेखात काढला. (दि. १४ नोव्हेंबर १९६७).

### एकातून दुसरे

माझे नंतरचे सर्व चरित्रलेखन प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे नानांच्या चरित्रातून निष्पन्न होत गेले आहे. एकामागून एक चरित्रलेखनाचे प्रस्ताव माझ्याकडे संबंधित व्यक्ती, संस्था किंवा प्रकाशक यांच्याकडून येत गेले. लेखन हा माझ्या हौसेचा किंवा व्यवसायाचा विषय नसल्याने योग्य वाटतील आणि शक्य होतील तेवढेच प्रकल्प मी स्वीकारले. आपली नोकरी सांभाळून चरित्रलेखन करायचे म्हणजे प्रत्येक ग्रंथासाठी किमान वर्षभराचा तरी अवधि लागतो असा माझा अनुभव आहे. मोजकीच परंतु खरोखरी थोर अशा काही व्यक्तींची चरित्रे मी लिहू शकलो. त्यांत शंतनुराव किर्लोस्कर, लो. टिळक, वालचंद हिराचंद, चिरमुले, अण्णासाहेब शिंदे इ. चा अंतर्भाव आहे.

### प्रतिभा २० टक्के

चरित्र लिहिणे हे मेहनतीचे काम असते. संदर्भ गोळा करण्यासाठी जिद्द आणि चिकाटी लागते. आ. अत्रे यांनी उल्लेख केला आहे, त्यातील परिश्रमाचा वाटा ८० टक्के असतो, बाकीचा भाग प्रतिभेचा असू शकतो. मात्र हे कष्ट घेताना खूप समाधान लाभते. स्नेह जुळतात, बरेच शिकायला मिळते. एखाद्या प्रसंगी काही चमत्कारिक अनुभवीही येतो. परंतु एकंदरीने संतोषाचे प्रमाण मोठे असते.

चरित्रनायकाविषयी लेखकाला स्वत:लाच

संपूर्ण माहिती असणे क्वचितच घडते. त्यामुळे विविध ठिकाणांहून आणि पद्धतींनी संदर्भ गोळा करणे हाच एकमेव मार्ग उपलब्ध असतो. ते सहसा जिकरीचे काम ठरते. त्याप्रमाणे संदर्भ गोळा होऊन, त्याचे परिशीलन सुरू झाले म्हणजे केव्हातरी लेखकाला 'चरित्रनायक आपणाला समजला' अशी जाणीव निर्माण होते. एखादी व्यक्ती औपचारिक रीतीने दीर्घ परिचयाची असली तरीसुद्धा चरित्रनायक म्हणून तिची ओळख अशा अभ्यासांतूनच पटावी लागते. सुरुवात केल्यापासून किती काळाने आणि कोणत्या क्षणी ती जाणीव होईल याला नियम नाही.

साधारणपणे अशी प्रचीती येते त्याच वेळी चरित्राचा आराखडा मनामध्ये तयार होतो. ते कसे सादर केले म्हणजे आपणाला समजलेली व्यक्ती वाचकांना प्रतीत होईल याची कल्पनाही याच वेळी स्पष्ट होते. त्यातून चरित्राचे स्वरूप ठरते. आणखी काय संदर्भ, तपशील गोळा करायला हवा याचा अंदाज येतो व तेथून पुढच्या प्रयत्नांना एक नेमकेपण येऊ लागते. या अभ्यासामध्ये चरित्रनायकाच्या व्यक्तिरेखेबरोबरच कालखंड, विचारधारा, कर्तृत्त्व, त्या साऱ्याचे परस्परसंबंध आणि मूल्यमापन इत्यादी अंगांचा समावेश असतो.

**मूल्यमापन**

अशा प्रकारे गोळा केलेल्या माहितीमधून आपल्याला 'दिसलेला' चरित्रनायक वाचकांपुढे कसा ऊभा करायचा त्याची पद्धत प्रत्येक चरित्रलेखकाला स्वत:पुरती ठरवावी लागत असणार. मी माझा कायद्याचा अभ्यास आणि व्यवस्थापनाचा अनुभव यांच्या संयोगातून कार्ड पद्धती तयार केली. त्यातून कोणताही तपशील सुटत नाही, ....होत नाही मात्र लेखनास सौष्ठव प्राप्त हेते असे मी अनुभवले. या पद्धतीचा अन्य कोणास लाभ घ्यावा असे वाटल्यास ते शक्य व्हावे म्हणून तिचा संपूर्ण तपशील मी माझ्या 'अक्षर प्रीत' या पुस्तकात विशद केला आहे. त्यातून केवळ चरित्रच सिद्ध होते असे नव्हे तर त्याचा आवाका, रचना आणि रोच याचाही स्वत: चरित्रलेखकाला बोध होतो. त्यामुळे पत्येक पुस्तकाची मांडणी भिन्न होऊ शकते. प्रयोगाला वाव मिळतो.

एखाद्या चरित्रातील सर्जनशीलता, लालित्य इत्यादी बाबी चरित्रविषय आणि लेखकाची प्रगल्भ होत गेलेली शैली यांवर अवलंबून राहणार हे तर उघड आहे. चरित्राचे यशापयश ते वाचकांना कितपत भावते यावरून ठरते. आपणच त्याचे मूल्ययमापन करणे शक्यक नसते. आपल्याकडे, वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया लिहून कळविण्याचे प्रमाण खूपच कमी आहे. ''नाना: एक शिल्पकार' सारख्या पुस्तकाचा अपवाद वगळला तर इतर चरित्रांना वाचकांची 'खुषी पत्रे' साधारणत: ५०.७५ च्या घरात असतात असा माझा अनुभव आहे. विनोबाजींच्या चरित्राच्या वेळी त्यांची थोडी वेगळी अपेक्षा होती. पण त्यांना मानणारी, त्यांचे चरित्र वाचणारी मंडळी अधिक संयमी असावी. मात्र, बराच काळ लोटल्यावर देखील, अधून मधून विशिष्ट पुस्तकाचे स्मरण ठेवून त्याबद्दल भरभरून बोलणारी माणसेही सतत भेटत राहतात आणि तेच पुस्तकाचे खरे

मूल्यमापन ठरते.

**शाहिरी**

मी केवळ थोर पुरुषांचीच चरित्रे लिहिण्याचे स्वातंत्र्य स्वत:कडे ठेवू शकलो आणि त्यामुळे त्यांतील एकेक ग्रंथ सिद्ध झाल्यावर कृतार्थ झाल्यासारखे वाटत गेले. चरित्रलेखनाने सर्वांत मोठे काय दिले असेल तर हा आनंद. लोकमान्यांचे किंवा वालचंदांचे चरित्र वाचून तावडतोब कोणी देशभक्त किंवा उद्योजक होत नाही. पण अशा चरित्रांच्या वाचनांतून काहीतरी वेगळे करावे अशी प्रेरणा अनेकांना होते आणि समाजाची एकूण धारणा सूक्ष्मपणे, नकळत बदलत जाते याचा प्रत्ययही अनेकवार येत गेला व त्यामुळेच स्वत:वर केवळ चरित्रलेखक म्हणून शिक्का बसल्याचे वैषम्य दूर झाले आणि आपण एक प्रकारे 'शाहिरी' करतो याची धन्यता वाटू लागली.

**भावी योजना**

सध्या माझे तीन चार लेखन प्रकल्प वेगवेगळ्या अवस्थेत आहेत. काही ग्रंथ प्रकाशनासाठी रेंगाळलेले आहेत. नव्या लेखनाच्या सूचना, मागण्याही आहेत. त्यांतील स्वत:ला रुचेल, झेपेल तेवढे स्वीकारण्याची सुविधा आहे. तरी पण यातून निवृत्त होता येईल अशी चिन्हे दिसत नाहीत. असेच लिहिणारे कुणी तयार व्हावेत असाही प्रयत्न आहे. कारण या सर्व गुंतवणुकीमुळे व्यक्तिगत आणि कौटुंबिक जीवनावर अनेक मर्यादा पडतात, सांगण्यास शरम वाटावी इतके वाचन कमी होते, सामाजिक जबाबदाऱ्या अटळ तेवढ्याच पार पाडल्या जातात. पण हेही एक व्यसन होऊन बसले आहे. त्यातून सुटका करून घ्यावीशी वाटत नाही हेही खरे.

तरी पण आणखी एका योजनेने मनात घर केलेले आहे. आपण इतक्या थोर पुरुषांबद्दल लिहिले. ते काही हजार वाचकांपर्यंत पोचले. तथापि बहुसंख्य समाजाला ते माहिती नाही. त्यामुळे ज्यांचे आदर्श त्यांच्यासमोर हवेत ते आज्ञाततच राहतात हा सल कायम जाणवतो. नारळकर-वालचंद-लोकमान्य हे प्रात:स्मरणीय. पण त्यांतील दोघे तर फारसे कुणाला माहीत नाहीत. टिळकांच्याही चार ठळक गोष्टी प्रचलित आहेत तेवढ्याच. तेव्हा हे सारे लोकांपर्यंत समक्ष न्यायला हवे, त्यासाठी प्रत्यक्ष 'शाहिरी' करायला हवी. अशी एक कल्पना आहे. ती स्फुरली कमिन्स कंपनीच्या सूचनेवरून त्यांच्या शैक्षणिक उपक्रमाचा भाग म्हणून गतवर्षी मी पुण्यातील व परिसरांतील १५ शाळांमधून तेथील शिक्षकांसमोर नारळकरांच्या जीवनकार्यावर व्याख्याने दिली आणि त्यांची प्रतिक्रिया हुरूप वाढविणारी ठरली. याच पद्धतीने अशा थोर पुरुषांविषयी बोलत राहिले तर अधिक मोठ्या समुदायासमोर त्यांचे कर्तृत्व जाईल. त्यांतून त्यांच्या चरित्राचे वाचन घडेल आणि मग ज्यासाठी लेखनाचा प्रपंच केला ते उद्दिष्ट साध्य होऊ शकेल असा विश्वास वाटतो. मात्र कवने करणे आणि ती गाणे यासाठी वेळेची विभागणी कशी करावी हा कूट प्रश्न अजून सुटलेला नाही. पण चरित्रलेखनाचे तेही एक अंग ठरावे असे मात्र उत्कटतेने वाटते.

□

सविता रा. भावे

सी-२ सह्याश्रम, शिवाजीनगर,

पुणे ४११ ००५. दूरध्वनी ३१३२२१.







# स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी चरित्रवाङ्मय सूची

संकलन : म. श्री. दीक्षित

स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी चरित्रवाङ्मय समृद्ध आहे. द. ब. पारसनीसकृत राणी लक्ष्मीबाई आणि ब्रह्मेंद्रस्वामी, ल. कृ. चिपळूणकरकृत विष्णुशास्त्री, वि. ल. भावेकृत नेपोलियन, न. चिं. केळकरकृत टिळक चरित्राचे तीन खंड, न. र. फाटककृत न्या. रानडे, शि. ल. करंदीकरकृत सावरकर अशी काही स्वातंत्र्यपूर्व काळातील चरित्रे आवर्जून उल्लेख करावा अशी आहेत. त्यांची संख्या २५० ते ३०० तरी भरेल.

स्वातंत्र्योत्तर काळात चरित्र-आत्मचरित्र वाङ्मयाला आणखीनच बहर आला. बदलती राजकीय, सामाजिक परिस्थिती आणि शिक्षण प्रसार ही दोन या विपुलतेची कारणे संभवतात. निखळ चरित्रांची जरी गणती केली तरी ती तीनशे साडेतीनशेच्या घरात जाते.

म. सा. पत्रिकेच्या चरित्र विशेषांकासाठी सोबत स्वातंत्र्योत्तर काळातील महत्त्वाच्या वाटलेल्या चरित्रांची सूची देत आहोत. या सूचीत कुमारांसाठी लिहिलेली चरित्रे वगळलेली आहेत. तसेच व्यक्तिचित्रांचे नि चरित्रविषयक लेखांचे संग्रहही वगळले आहेत. अल्पावधीतच सिद्ध केलेली ही सूची परिपूर्ण नाही याची जाणीव आहे. तथापि महत्त्वाचे चरित्र वगळले जाऊ नये याची काळजी घेतली आहे. इतक्या उपर काही चरित्रे वगळली गेली असणार, निवडीबाबतही मतभेद होणार याची पूर्ण जाणीव असल्याने कोणी गैरसमज करून घेऊ नये ही विनंती. तसेच उणिवांविषयी क्षमस्व.

*(सूचीत लेखकनाम, ग्रंथनाम आणि प्रकाशनवर्ष- एवढाच तपशील दिलेला आहे.)*

अत्रे प्र. के. : **मृत्यूचे चुंबन घेणारा महाकवी - साने गुरुजी,** १९७३

अनवलीकर सुधाकर : **बोला अमृत बोला (मा. कृष्णराव चरित्र),**१९८५

अभ्यंकर शंकर : **रणजी,** १९७५

अभ्यंकर शंकर : **स्वरभास्कर** (भीमसेन), १९८३

अमीन सय्यद : **अकबर,** १९६१

अमीन सय्यद : **अतातुर्क कमाल पाशा,** १७७८

आठवले वि. रा. : **विष्णु दिगंबर पलुस्कर,** १९६७

आठवले सदाशिव : **जगत्गुरू इब्राहिम अदिल शहा,** १९९७

आठवले सदाशिव : **उमाजी नाईक मु. डोंगर,** १९९१

आठवले सदाशिव : **जॉर्ज वॉशिंग्टन, १९९७**
आठवले सदाशिव : **रामशास्त्री प्रभुणे, १९८८**
आठवले सदाशिव : **शहाजादा दाराशुको, १९९२**
आपटे भा. प. : **कर्मयोगी जानकीबाई आपटे, १९९७**
आवटे लीला : **हो. चि. मिन्ह, १९७५**
एरंडे अशोक : **सत्यशोधक मुकुंदराव पाटील, १९९६**
ओक प्रमोद : **एल्फिन्स्टन, १९९०**
ओक प्रमोद : **दुर्दैवी आनंदीबाई पेशवे, १९८८**
ओक प्रमोद : **सिकंदर, १९९६**
कदम मनोहर : **नारायण मेघाजी लोखंडे, १९९५**
कर्णिक द्वा. भ. : **एलेन रॉय, १९८३**
कर्णिक द्वा. भ : **मानवेन्द्र रॉय, १९६७**
करंदीकर अ. ज. : **क्रांतिकारक टिळक नि त्यांच्या काळ, १९६९**
करंदीकर ज. स. : **श्रीसमर्थ चरित्र, १९५४**
करंदीकर वि. रा. : **रामकृष्ण आणि विवेकानंद, १९८२**
करंदीकर वि. रा. : **समर्थ रामदास, १९८३**
कऱ्हाडकर के. सी. : **बाबा पदमनजी-काल आणि कर्तृत्व, १९७९**
कवडी नरेश : **मोरारजीभाई देसाई, १९७८**
कानिटकर वि. ग. : **अब्राहम लिंकन, फाळणी टाळणारा महापुरुष, १९८४**
कानिटकर वि. ग. : **नाझी भस्मासुराचा उदयास्त १९६६, ९४ (दहावी)**
कानिटकर वि. ग. : **माओ क्रांतीचे चित्र आणि चरित्र, १९७१**
कानिटकर वि. ग. : **विन्स्टन चर्चिल, १९८२**
कानिटकर वि. ग. : **व्हीएटनाम : अर्थ आणि अनर्थ, (हो-चि-मिन), १९७५**
कानेटकर शं. के : **स्वप्नभूमी (माधव जूलियन), १९६५**
कामत अशोक : **गुरू अंगददेव ते गुरू गोविंदसिंह, १९९६**
काळे दि. वि. : **छत्रपति शिवाजी महाराज, १९६०**
काळे बाबूराव : **यशवंतराव चव्हाण, १९५९**
किर्लोस्कर शं. वा. : **यांत्रिकाची यात्रा (लक्ष्मणराव), १९५८**
कीर धनंजय : **डॉ. बाबासाहेब आंबेडकर, १९८१**
कीर धनंजय : **तीन महान सारस्वत (भाऊ दाजी, तेलंग, डॉ. भांडारकर), १९७९**
कीर धनंजय : **महात्मा जोतीराव फुले, १९६८**
कीर धनंजय : **लोकमान्य टिळक आणि राजर्षि शाहू, १९७८**
कीर धनंजय : **लोकहितकर्ते बाबासाहेब बोले, १९७८**
कीर्तने अंजली : **डॉ. आनंदीबाई जोशी-काळ आणि कर्तृत्व, १९९७**

कुलकर्णी अ. रा. : **जेम्स कनिंग हॅम, ग्रँट डफ, १९७१**
कुलकर्णी पु. बा. : **नाना शंकरशेट यांचे चरित्र, १९५९**
कुलकर्णी पु. बा. : **मामा पदमानंद व त्यांचा कालखंड, १९६३**
कुलकर्णी पु. बा. : **शेठ जावजी दादाजी ह्यांचे चरित्र, १९६७**
कुलकर्णी भीमराव : **डॉ. बाबासाहेब आंबेडकर, १९८४**
कुलकर्णी भीमराव : **स्वामी विवेकानंद, १९६३**
कुलकर्णी रा. पु. : **विक्रम साराभाई, १९७३**
कुलकर्णी रा. पु. : **डॉ. होमी भाभा, १९७९**
कुलकर्णी वि. ह. : **ग. त्र्यं. मांडखोलकर-चरित्र आणि वाङ्मय, १९९२**
कुलकर्णी वि. ह. : **जॉर्ज बर्नाड शॉ, १९८०**
कुलकर्णी श्री. मा. : **धर्मराज युधिष्ठिर, १९८८**
केथे मधुकर : **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, १९६९**
केतकर ग. वि. : **डॉ. पां. स. खानखोजे चरित्र, १९६६**
केरकर बाबूराव : **सुरश्री, १९८३**
केळकर इंदुमती : **राम मनोहर लोहिया, १९६७**
केळकर नी. म. : **भास्करबुवा बखले, १९६७**
केळकर नी. म. : **हरि नारायण आपटे, १९६४**
केळकर भा. कृ. : **सुभाष, १९४६, ७०**
कोठीवाले वि. ना. : **गडकरी जीवनचरित्र, १९६९**
कोलते वि. भि. : **श्रीगोविंदप्रभु चरित्र, १९७१**
कोलते वि. भि. : **श्रीचक्रधर चरित्र, १९५२**
कोल्हटकर चिंतामण गणेश : **राम गणेश गडकरी, १९५९**
खंडकर अरुंधती : **तर्कतीर्थ-एक प्रज्ञाप्रवाह, १९९५**
खाडिलकर का. ह. : **कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर, १९४९**
खाडिलकर गो. वि. : **विश्वमाता मदर तेरेसा, १९९०**
खांडेकर वि. स. : **गडकरी व्यक्ती आणि वाङ्मय, १९४९**
खानोलकर गं. दे. : **माधव जूलियन, १९६८**
खानोलकर गं. दे. : **रवीन्द्रनाथ जीवनकथा, १९६१**
खानोलकर गं. दे. : **वालचंद हिराचंद, १९६५**
खानोलकर गं. दे. : **साहित्यसिंह-श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, १९७२**
खापर्डे बा. ग. : **दादासाहेब खापर्डे यांचे चरित्र, १९६२**
खेडेकर पद्मा : **पडद्यामागील बालगंधर्व, १९६८**
खैरमोडे चां. भ. : **डॉ. भीमराव रामजी आंबेडकर (खंड ११वा) १९९० पर्यंत**
गडकरी माधव : **राम गणेश गडकरी, १९८५**

गवाणकर वीणा : **डॉ. खानखोजे नाही चिरा, १९९७**
गाडगीळ स. रा. : **नवभारताचे शिल्पकार पं. जवाहरलाल नेहरू, १९९४**
गावडे प्र. ल. : **वि. दा. सावरकर (एक चिकित्सक अभ्यासक), १९७१**
गुर्जर रवींद्र : **चार्ली चॅपलीन, १९७८**
गोखले द. न. : **गांधीजी मानव नि महामानव, १९९६**
गोखले कमल : **शिवपुत्र संभाजी, १९७१**
गोखले द. न. : **एका चरित्राचे चरित्र, १९८५**
गोखले द. न. : **डॉ. केतकर, १९५९**
गोखले द. न. : **डॉ. पटवर्धन उर्फ माधव जूलियन, १९७८**
गोखले द. न. : **क्रांतिवीर बाबाराव सावरकर, १९४७**
गोखले द. न. : **गांधीजी, मानव नि महामानव, १९९६**
गोखले पु. पां. : **वेदव्यास पंडित सावळेकर, १९६७**
गोडसे द. ग. : **मस्तानी मस्तानी, १९८९**
गोरे दत्तु : **राणी दुर्गावती, १९६७**
गोवंडे वि. भा. : **त्रिमूर्ती दर्शन (कृष्णशास्त्री, फुले, गोवंडे), १९५०**
घारे दीपक : **चिं. त्र्यं. खानोलकर (ललितचरित्र), १९८८**
घोरपडे ए. के : **कर्मवीर भाऊराव पाटील, १९५१**
घोरपडे ए. के : **महात्मा फुले, १९५३**
चिटणीस शं. ल. : **डॉन ब्रॅडमन, १९७७**
चिपळोणकर वसंत व मंदाकिनी : **कृष्णशास्त्री चिपळोणकर, १९९१**
चुनेकर सु. रा. : **माधव जूलियन, १९८०**
चुनेकर सु. रा. : **माधवराव पटवर्धन वाङ्मयदर्शन, १९७३**
जाधव रमेश : **लोकराजा शाहु छत्रपती, सुरेश एजन्सी, १९९७**
जाधव रा. ग. : **शास्त्रीजी (लक्ष्मण शास्त्री), १९९४**
जांभेकर ग. गं. : **आचार्य बाळशास्त्री जांभेकर-जीवन वृत्त व कार्य, १९५०**
जोगळेकर ज. द. : **स्वातंत्र्यवीर सावरकर वादळी जीवन, १९८३**
जोशी अ. म. : **वडिलांचे सेवेसी, १९६०**
जोशी चिं. नी. : **श्रीधर, चरित्र व काव्यविवेचन, १९५१**
जोशी ज. रा. : **ना. डॉ. ना. भा. खरे चरित्र भाग १-२, १९४३,५०**
जोशी न. म. : **डॉ. बाबासाहेब आंबेडकर, १९८४**
जोशी न. म. : **जनरल अरुणकुमार वैद्य, १९८५**
जोशी रामभाऊ : **यशवंतराव - इतिहासाचे एक पान, १९७६**
जोशी वि. श्री. : **आद्य क्रांतिकारक वा. ब. फडके यांचे चरित्र, १९४७**
जोशी वि. श्री. : **कंठस्नान आणि बलीदान (चाफेकर-रानडे), १९७३**










जोशी वि. श्री. : **क्रांतिकल्लोळ (सावरकर चरित्र), १९८५**
जोशी वि. श्री. : **मृत्युंजयाचा आत्मयज्ञ, १९८१**
जोशी वि. श्री. : **वडनावल, १९७८**
जोशी श्रीपाद : **जिब्रान खलिल जिब्रान, १९७६**
जोशी सं. पा. : **श्रीमत प. पू. भगवान श्रीधरस्वामी यांचे सिद्ध चरित्र, १९९७**
जोशी ह. मो. : **बादशहाखान, १९६५**
टिकेकर श्री. रा. : **जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई, १९६१**
ढवळे मृणालिनी : **लोकमान्यांच्या सूनबाई, १९८३**
ढेरे रा. चिं. : **अमृतकन्या, १९७५**
ढेरे रा. चिं. : **श्रीगुरु गोरक्षनाथ चरित्र व परंपरा, १९५९**
ढेरे रा. चिं. : **श्री नरसिंह सरस्वती-चरित्र आणि परंपरा, १९५८**
ढेरे रा. चिं. : **मुसलमान मराठी संतकवी, १९६७**
ढेरे रा. चिं. : **श्रीशारदामाता चरित्र आणि उपदेश, १९६१**
टिळक दे. ना. : **महाराष्ट्राची तेजस्विनी-पंडिता रमाबाई, १९६०**
तळवलकर गोविंद : **बाळ गंगाधर टिळक, १९८०**
तळवलकर गोविंद : **विराट् ज्ञानी न्या. रानडे, १९८९**
तळवलकर गोपीनाथ : **आनंदभुवन (नेहरू कुटुंब), १९५४**
तळवलकर गोपीनाथ : **शांतिनिकेतन (टागोर), १९६१**
ताटके अरविंद : **जगज्जेता गामा, १९७३**
ताटके अरविंद : **पंडित जवाहरलाल नेहरू, १९९०**
ताटके अरविंद : **विनू मांकड, १९७६**
ताटके अरविंद : **सर गॅरी सोबर्स, १९७८**
ताटके अरविंद : **सर डोनाल्ड ब्रॅडमन, १९६५,**
तुळपुळे गो. वि. : **सॉक्रेटीस, १९५४**
तुळपुळे शं. गो. : **गुरूदेव रा. द. रानडे, १९८३**
तुळपुळे शं. गो. : **पाच संतकवी, १९४८**
तुळपुळे शं. गो. : **रमणमहर्षी, १९७७**
तेलकर श्रीधर : **कित्तूरची चन्नमाराणी, १९६९**
थत्ते यदुनाथ : **विनोबा भावे, १९७१**
थत्ते यदुनाथ : **सरहद्द गांधी खान अबदुल गफारखान, १९६९**
दहातोंडे भि. ना. : **महर्षि वि. रा. शिंदे, १९९५**
दाते ह. वि. : **तेजाची आरती (श्री गोळवलकर गुरुजी), १९७७**
दांडेकर गो. नी. : **प्राचीन पुरुषोत्तम, १९५२**
दांडेकर गो. नी. : **श्रीगाडगेमहाराज चरित्र, १९७६**










दांडेकर शं. वा. : श्रीजोग महाराज चरित्र, १९६८
दातार शैला : देवगंधर्व (भास्करबुवा), १९९५
दामले द. मो. : चिं. वि. उर्फ नानासाहेब वैद्य चरित्र भाग १ व २, १९८५
दिवाण वि. म. : नरहर शंभुराव भावे, १९८९
दीक्षित म. श्री. : तात्या टोपे, १९५९
दीक्षित म. श्री. : पुण्यश्लोक अहल्या, १९६०
दीक्षित म. श्री. : प्रतापी बाजीराव, १९७९
दीक्षित म. श्री. : भारतरत्न नेहरू, १९६४
दीक्षित म. श्री. : पंतप्रधान शास्त्री, १९६६
दीक्षित म. श्री. : नेपोलियन, १९७१
दीक्षित म. श्री. : बाळाजी विश्वनाथ, १९९३
दीक्षित म. श्री. : सार्वजनिक काका, १९९३
देवगिरीकर त्र्यं. र. : वासुकाका जोशी आणि त्यांचा काल, १९४८
देवळे शं. रा. : पेशवाईतील साडेतीन शहाणे, १९६८
देवस्थळे सुमती : टॉलस्टॉय एक माणूस, १९७४
देवस्थळे सुमती : डॉ. अल्बर्ट श्वाइट्झर, १९७९
देवस्थळे सुमती : मॅक्झिम गॉर्गी, १९७६
देशपांडे निर्मला : विनोबा, १९८४
देशपांडे मा. का. : केळकर - व्यक्ति आणि वाङ्मय, १९४८
देशपांडे मा. का. : खांडेकर - व्यक्ति आणि वाङ्मय, १९६२
देशपांडे मा. का. : ना. सी. फडके व्यक्ति आणि वाङ्मय, १९३९
देशमुख विजय : शककर्ते शिवराय खंड १ व २, १९८२-८४
देशपांडे वासू : लोकशाहीचा कैवारी (नाथ पै), १९७२
देसाई वसंत : म. जोतीराव फुले, १९६५
देसाई वसंत शांताराम : बालगंधर्व व्यक्ती आणि कला, १९६०
देसाई वसंत शांताराम : विन्स्टन चर्चिल, १९६३
धर्माधिकारी भाऊ : मानवाचा पुत्र येशू, १९८३
नवरे श्री. शं : सेनापती (बापट), १९७६
नारगोलकर वसंत : साम्ययोगी विनोबा, १९६५
नेऊरकर प्र. श्री. : अक्षरगंधर्व (सदानंद रेगे), १९८७
नेऊरगावकर स. के : ह. भ. प. प्रा. सोनोपंत दांडेकर, १९६९
पगडी सेतुमाधवराव : शिवचरित्र-एक अभ्यास, १९७१
पटवर्धन ना. म. : वा. म. जोशी यांचे चरित्र, १९४८
पंडित शैलजा आणि हळवे : गानहिरा (हिराबाई), १९८५

परांजपे रा. य : **स्वामी स्वरूपानंद जीवन, १९७५**
परांजपे वा. कृ. : **शिवरामपंत परांजपे व्यक्ति, वक्तृत्व आणि वाङ्मय, १९५४**
परांजपे वा. कृ. : **नकलाकार भोंडे व्यक्ति व कला, १९४७**
परांजपे रा. य. : **यशवंत संशोधक, १९८२**
पवार बा. ग. : **कर्मवीर भाऊराव पाटील, १९८७**
पाटील अनंतराव : **संत तुकाराम महाराज चरित्र व कार्य, १९९३**
पाटील दिनकर : **मा. विनायक, १९७१**
पाटील पंढरीनाथ : **सामान्यातील असामान्य (वसंतराव नाईक), १९७५**
पाध्ये प्रभाकर : **तीन तपस्वी ( आगरकर, वा. म. जोशी, सानेगुरूजी), १९४८**
पानवलकर प्रभा : **अब्राहम लिंकन, १९८४**
पारीख गोवर्धन : **लोकहितवादी गो. ह. देशमुख, १९७१**
पालकर ना. ह. : **डॉ. हेडगेवार, १९६०**
पाळेकर भ. ब. : **'जागृति' कार पाळेकर, १९६१**
पितळे अविनाश : **आनंदवनीचा श्रमयोगी (आमटे), १९८५**
पुरंदरे कृ. वा. : **चिमाजीअप्पा, १९४८**
पुरंदरे ब. मो. : **राजा शिवछत्रपती, १९५८**
पुरंदरे माधुरी : **पिकासो, १९८६**
पुराणिक श. श्री. : **रामदास (व्यक्तिदर्शन), १९९६**
पुराणिक श. श्री. : **वि. का. राजवाडे, १९८९**
पुराणिक श. श्री. : **विष्णुशास्त्री, १९९२**
पुराणिक श. श्री. : **श्री. म. माटे (व्यक्तिदर्शन), १९८६**
पेंडसे वि. वि. : **सरदार हरिसिंह नलुआ, १९५१**
पै शिरीष : **पपा, १९७१**
पै शिरीष : **वडिलांचे सेवेसी, १९८७**
पोतदार वसंत : **कुमार (कुमार गंधर्व), १९९५**
प्रभू मीना : **मुखवट्यांमागचे चेहरे - डायना आणि चार्लस, १९९७**
प्रियोळकर अ. का. : **डॉ. भाऊ दाजी, १९७१**
प्रियोळकर अ. का. : **रा. ब. दादोबा पांडुरंग, १९४७**
फडकुले निर्मलकुमार : **लोकहितवादी (काल आणि कर्तृत्व), १९७३**
फडके भालचंद्र : **डॉ. बाबासाहेब आंबेडकर, १९८५**
फडके य. दि. : **अण्णासाहेब लठ्ठे, १९८९**
फडके य. दि. : **आगरकर चरित्र, १९९५**
फडके य. दि. : **कहाणी सुभाषचंद्रांची (पूर्वार्ध), १९९४**
फडके य. दि. : **केशवराव जेधे, १९८२**



अनुक्रमणिका

फडके य. दि. : **र. धों. कर्वे, १९८१**
फडके य. दि. : **शाहू छत्रपती आणि लोकमान्य, १९८६**
फडणीस लतिका : **नर्मदापुत्र (गो. तळवळकर), १९९५**
फाटक इंदुमती : **आमचे तात्या (सेनापती बापट), १९८०**
फाटक न. र. : **आदर्श भारत सेवक, १९६७**
फाटक न. र. : **लोकमान्य, १९७२**
फाटक पद्‌मजा : **शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक, १९८१**
बंडेलू शां. पा. : **फादर स्टीफन्कृत ख्रिस्तपुराण (चरित्र व वाङ्‌मय), १९५६**
बनहट्टी श्री. ना. : **टिळक आणि आगरकर, १९५६**
बनहट्टी श्री. ना. : **नाट्याचार्य देवल, १९६७**
बाक्रे रामकृष्ण : **डॉ. पी. व्ही. मंडलिक, १९८६**
बापट त्र्यं. ग : **विवेकानंद,**
बापट त्र्यं. ग : **स्वामी रामकृष्ण परमहंस, १९७२**
बापट प्र. ग. : **इस्त्रायलचा विधाता, १९८४**
बहुलेकर वसंत : **लोकनायक बाळासाहेब देसाई, १९९१**
बापट कृ. भा. : **यशवंतराव चव्हाण, १९६०**
बेन्द्रे वा. सी. : **छत्रपती संभाजी महाराज, १९६०**
बेन्द्रे वा. सी. : **तुकाराम महाराज यांचे संत सांगाती, १९५८**
बेन्द्रे वा. सी. : **श्री छत्रपति शिवाजी महाराज (पूर्वार्ध, उत्तरार्ध), १९७२**
बेन्द्रे वा. सी. : **संत तुकाराम, १९६३**
बेलसरे के. वि. : **श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज (चरित्र व वाङ्‌मय), १९७२**
बोरकर बा. भ. : **आनंदयात्री रवीन्द्रनाथ, १९६४**
भगत रा. तु. : **रंगसम्राट आबालाल रहमान, १९९३**
भट गो. के : **भवभूति, १९८६**
भट भा. वा. : **इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, १९४६**
भट रा. स. : **भगवान सावरकर, १९८७**
भागवत कमल : **भाई चितळे, १९९५**
भागवत दुर्गा : **राजारामशास्त्री भागवत, १९४७**
भागवत रा. स. : **डॉ. बेझंट चरित्र, १९४८**
भालेकर वसंत : **सुलोचना, १९६९**
भावे वा. कृ : **युगप्रवर्तक शिवाजी महाराज, १९४५**
भिंगारकर श्रीपतीबुवा : **महासाधु श्री ज्ञानदेव, १९६२**
भिंगारे ल. म. : **हरिभाऊ, १९५६**
भिडे ग. रं. आणि गजवर बावा : **कलामहर्षि बाबूराव पेंटर, १९७८**

भिशीकर चं. प. : **केशव - संघनिर्माता, १९९०**
भोसले शिवाजीराव : **मुक्तिगाथा महामानवाची (अरविंद)**
मंगळवेढेकर राजा : **भूमिपूत्र पद्मश्री विखेपाटील, १९७७**
मंगळवेढेकर राजा : **लोकनायक जयप्रकाश, १९७७**
मंगळवेढेकर राजा : **सानेगुरुजींची जीवनगाथा, १९७५, ९२**
मणकेकर दि. रा. : **लालबहादूर शास्त्री, १९६५**
मंगूडकर मा. पं. : **कर्मवीर शिंदे यांचे जीवनकार्य, १९७६**
मंगेशकर लता : **फुले वेचिता, १९९७**
मराठे कृ. बा. : **बालकवी, १९६२**
महांबरे गंगाधर : **एक अविस्मरणीय मामा (वरेरकर), १९८९**
मांडरे सूर्यकांत : **विश्वकर्मा (बाबूराव पेंटर), १९९५**
माळी मा. गो. : **क्रांतिज्योती सावित्रीबाई जोतिबा फुले, १९८०**
मिराशी वा. वि. : **कालिदास, १९७५**
मुझावर इसाक : **दादासाहेब फाळके, १९७०**
मुंदरगी श्रीकांत आणि मृणालिनी : **बेनझीर भुट्टो, १९८९**
मुझुमदार वासंती : **श्री. पु. भागवत (व्यक्ति आणि संपादक), १९९४**
मेणजोगे सीताराम : **मार्गारेटचे ब्रिटन, १९९२**
मेहेंदळे ग. भा. : **श्री राजा शिवछत्रपती, खंड १ भाग १, १९९६**
मोटे ह. बि. : **शिल्पकार फडके, १९७१**
रणदिवे बाबूराव : **कॉ. डांगे, १९८९**
राजगुरू विनायक : **चिंगिझखान, १९८६**
रातंजनकर एस. एन. : **विष्णु नारायण भातखंडे, १९६७**
लाड पु. मं. : **तुकारामाचे चरित्र (पूर्वार्ध,) १९५७**
लिमये नरुभाऊ : **अर्धविराम स. गो. बर्वे जीवनकथा, १९६८**
लिमये नरुभाऊ : **कल्याणी (उद्योगपती), १९९०**
लिमये पुष्पा : **विष्णु मोरेश्वर महाजनि- व्यक्ति आणि वाङ्मय, १९९३**
लेले पु. रा. : **नाटककार खाडिलकर, १९६४**
लेले वि. गं. : **बाबूर, १९४८**
वर्दे मोहिनी : **रखमाबाई एक आर्त, १९९०**
वराडपांडे म. ल. : **श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, १९९०**
वाळिंबे वि. स. : **नेताजी, १९८९**
वाळिंबे वि. स. : **सावरकर, १९८३**
वाळिंबे वि. स. : **स्वेतलाना, १९६८**
वाळिंबे वि. स. : **हिटलर, १९८२**







विद्वांस मा. श्री. : (साहा-सरोजिनी वैद्य)
श्रीमती रमाबाई रानडे : व्यक्ति आणि कार्य, १९८९
वैद्य सरोजिनी : कहाणी लंडनच्या आजीबाईची, १९९६
वैद्य सरोजिनी : गोपाळराव हरी, १९७८
वैद्य सरोजिनी : श्रीमती काशीबाई कानिटकर, १९८०
शिवणीकर राघव : सातारचा सिंह क्रांतिसिंह नाना पाटील, १९८६
शिंदे मा. श्री. : विजयी मराठाकार श्रीपतराव शिंदे, १९७३
शेजवलकर त्र्यं. शं. : श्री शिवछत्रपती, १९६४
साबडे भा. र. : शंतनुराव, १९९३
सामंत बाळ : तो राजहंस एक (बालगंधर्व), १९८८
सामंत श्रीनिवास : वेध मानवाचा (छत्रपति शिवाजी महाराज), १९९५
सावंत शिवाजी : संघर्ष (भाई मनोहर कोतवाल), १९९६
सावरकर बाळ : हिंदु समाज संरक्षक स्वातंत्र्यवीर सावरकर, १९७२
सावरकर बाळाराव : स्वातंत्र्यवीर सावरकर (तीन पर्वे), १९७६
सावळापूरकर पां. कृ. : देवर्षी नारद, १९७७
सुखटणकर ज. स. : धर्मानंद, १९७६
सूर्यवंशी कृ. गो. : राजर्षी शाहू (राजा व माणूस), १९८४
हरदास बाळशास्त्री : छत्रपति शिवाजी (पूर्वार्ध व उत्तरार्ध), १९६०
हरदास बाळशास्त्री : धर्मवीर डॉ. बा. शि. मुंजे भाग १ व २, १९६६, ६७
हरदास बाळशास्त्री : महारथी कर्ण, १९७६
हर्षे द.स. : सावरकर दर्शन, १९९० (सुधारित)
हरोलीकर ल. ब. : सिंग्मंड फ्रॉईड, १९७२
हुमणे राजाराम : धन्य जन्म जाहला (हिराबाई), १९७२

□

## हार्दिक अभिनंदन !

महाराष्ट्र शासनाची उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीची पारितोषिके मिळून गौरव झालेल्या सर्व साहित्यिकांचे हार्दिक अभिनंदन ! यात म. सा. परिषदेच्या कार्यकारिणीचे सदस्य डॉ. शंतनु चिंधडे, डॉ. आश्विनी धोंगडे आणि श्री. माधव कोंडविलकर यांचा समावेश आहे, याचा विशेष आनंद वाटतो.

संपादक










# स्त्रीजीवनाचे दर्शन

डॉ. सौ. शैलजा जोशी

स्वातंत्र्यपूर्व मराठी कादंबरी आणि स्त्रियांच्या आत्मचरित्रातील स्त्रीजीवनाचे दर्शन (१८५७ ते १९४७) या शीर्षकाचा मराठी साहित्याच्या तुलनात्मक अभ्यासात भर घालणारा विद्यापीठीय पातळीवरील प्रबंध नुकताच मुंबई विद्यापीठाने मान्य केला. सदर प्रबंधाचे लेखन डॉ. श. ग. घाटे यांच्या मार्गदर्शनाने केले. प्रबंधाचे अभ्यासकेंद्र गोगटे-जोगळेकर महाविद्यालय रत्नागिरी हे होते. सदर प्रबंधाचा अभ्यास नऊ प्रकरणातून केला आहे. पहिल्या प्रकरणात प्रबंधाचा उद्देश व भूमिका सांगितली आहे. आजवर विविध विद्यापीठांतून 'मराठी कादंबरीतील स्त्रीजीवनाचा अभ्यास' वा स्त्रियांच्या आत्मचरित्रांचा स्वतंत्र अभ्यास प्रबंधासाठी झाला आहे. माझ्या प्रबंधात मात्र तुलनात्मक दृष्टिकोन असून वेळोवेळी प्रत्यक्ष समाजातील स्त्रीजीवन कसे होते हे पाहिले आहे. साहित्य आणि समाज यांचे जवळचे नाते प्रबंधात वेळोवेळी विचारात घेतले आहे.

दुसऱ्या प्रकरणात स्त्रीचे समाजातील स्थान, मुलींकडे पाहण्याचा समाजाचा दुय्यम दृष्टिकोन, अनेक समाजसुधारकांनी स्त्रीला समाजात बरोबरीने आणण्यासाठी केलेले प्रयत्न, बालविवाह, विषमविवाह, रुढी, प्रथा, केशवपन या सारखे सामाजिक प्रश्न विचारात घेतले आहेत. तिसऱ्या प्रकरणात बाबा पदमजी, हरिभाऊ आपटे यांच्या कादंबरीतले स्त्रीजीवन विचारात घेतले आहे. चौथ्या प्रकरणात वा. म. जोशी, डॉ. केतकरांचा विचार केला आहे. पाचव्या प्रकरणात विभावरी शिरूरकर, गीता साने आणि इतर प्रतिनिधिक लेखिकांच्या कादंबऱ्यांचा विचार करून त्यातील स्त्रीजीवन, समस्या यांचे वर्णन केले आहे. सहाव्या प्रकरणात सुमारे ६० स्त्रीलिखित आत्मचरित्रांचा थोडक्यात आढावा घेतला आहे. सातव्या प्रकरणात मराठी कादंबरी आणि आत्मचरित्रांतून दिसून येणारे काही प्रसंगातील साम्य वर्णन केले आहे - उदा.१) एकत्र कुटुंब २) समाजात मुलीला दुय्यम स्थान ३) विवाह ४) स्त्रीशिक्षण ५) तत्कालिन धार्मिक स्थिती व समाजातील जातिभेदांचे वर्णन ६) स्वातंत्र्य चळवळीतील स्त्रियांचा सहभाग अशी तुलना करताना घडणारे स्त्रीजीवनाचे दर्शन विचारात घेतले आहे.

निष्कर्षात-कादंबरीची व स्त्रीआत्मचरित्रांची तुलना करताना आत्मचरित्रातून स्त्रीजीवनाचे दर्शन जेवढ्या विविध पातळीवरून घडते तेवढे मराठी कादंबरीत घडत नाही. कादंबरीत



अनुक्रमणिका








*डॉ. सौ. शैलजा जोशी*

*संपूर्ण मराठी व राज्यशास्त्र दुय्यम विषय घेऊन दुसऱ्या श्रेणीत बी.ए.उत्तीर्ण. मराठी संपूर्ण विषय घेऊन दुसऱ्या श्रेणीत एम.ए.. १९९६ मध्ये मराठी विषयांतर्गत 'स्वातंत्र्यपूर्व मराठी कादंबरी आणि स्त्रियांच्या आत्मचरित्रातील स्त्री-जीवनाचे दर्शन (१८५७-१९४७) या शीर्षकाचा प्रबंध मुंबई विद्यापीठाने मान्य करून पीएच. डी.*

*विविध वृत्तपत्रांतून आणि नियतकालिकांतून सामाजिक लेखन. रोहिणी (पुणे) गावकरी (नासिक) अलका (मुंबई) पिसारा (पुणे) शब्दशिल्प (नांदेड) महिला प्रबोधिनी (नागपूर) इत्यादि नियतकालिकांतून कथा, सामाजिक लेख, ललितलेख प्रसिद्ध. कविताश्री, लोकमतमधून कविता प्रसिद्ध. आकाशवाणी रत्नागिरी केंद्रावरून कथा व भाषणे प्रसारित.*

बोधवाद, वास्तवतावाद, आदर्शवाद, समाजवाद, यांचे दर्शन होते. कधी कादंबरी आदर्शवादात अडकते. आत्मचरित्रातील स्त्रियांनी आपले अनुभव विविध पातळीवरून घेतलेले दिसतात. कादंबरीतले स्त्रीजीवन माजघरापुरते मर्यादित होते. त्यामुळे कादंबरीतल्या स्त्रीचित्रणापेक्षा आत्मचरित्रातील स्त्रीचे जीवन अधिक प्रत्ययकारी, अधिक उत्कट, अधिक व्यापक होते असे दिसते.

आठव्या प्रकरणात मराठी कादंबरी आणि स्त्रियांच्या आत्मचरित्रातल्या स्त्रीजीवनाचे भेद-वेगळेपण विचारात घेतले आहे. आत्मचरित्रातील स्त्री वास्तव असल्यामुळे नाजुक मनाची आहे. मराठी स्त्री म्हणून तिचे वेगळेपण कादंबरीतल्या स्त्रीपेक्षा उठून दिसते. तिच्या प्रतिमेला साजेशी पतिभक्ती आत्मचरित्रात दिसली तरी ही भक्ती आंधळी नाही. डोळस आहे. त्यामुळे भक्तीबरोबरच पतीच्या अवगुणांचा विचार आत्मचरित्रात स्त्रिया करतात. कादंबरीतले पतिप्रेम वेगडी वाटते. आत्मचरित्रात स्त्री पुरुषाकडून गृहित धरली जाते. पतीने, पित्याने घेतलेले निर्णय तिला तसेच्या तसे मानावे लागतात; परंतु १९४७ नंतरच्या आत्मचरित्रांतून स्त्रीचे जागृत नवे रूप प्रत्ययास येते. आत्मचरित्रात संसार सुखाचा होण्यासाठी स्त्रीला ठिगळ मारण्याची कला अवगत हवी, पती रागावला तर पत्नीने गप्प रहावे असे संसार उपयोगी सल्ले स्त्रियांना या स्त्रिया देतात. कादंवरी संसार चित्रणात गुंतते. त्यामुळे स्त्री मनाचे कप्पे उघडे करणे लेखकांना फारसे जमत नाही. कादंवरी कल्पित असल्यामुळे प्रीतीविवाह, आंतरजातीय विवाह करण्यासाठी नायकनायिकांना फारसे संघर्ष करावे लागत नाहीत ते सहज मान्य होतात. मात्र आत्मचरित्रांतून विषमविवाहाबद्दल आनंदीबाई विजापुरे यांच्या मनाची मानसिक कोंडी दिसते तर आनंदीबाई शिर्के यांचा विवाह देशस्थ-कोकणस्थ वादाने गाजतो. आनंदबाई कर्वेनी पुनर्विवाह केला म्हणून सासू बोलते.

वैवाहिक जीवनात नीतीबद्दल स्त्री-पुरुषांना समान नियम नाहीत, पुरुष कुणाही स्त्रीबरोबर

उजळ माथ्याने राहू शकतो, पण असंच जर एखाद्या स्त्रीने वागायचं ठरवलं तर त्या स्त्रीला रखेल ठरवून तिला समाजात मानसिक त्रास सहन करावा लागतो. मैत्रीच्या नात्यातून एखाद्या पुरुषाकडे पाहिले तरी त्या मागे काहीतरी भानगड असेल असेच समाजाला वाटते. पुरुष भ्रमरवृत्तीचा असतो. स्त्री भावनाप्रधान, आत्मकेंद्री असते. आत्मचरित्रातील स्त्रिया रखेल राहत असल्या तरी त्या पुरुषाच्या प्रेमाच्या भुकेल्या असतात. समाज आपणास काय म्हणेल याची त्यांना फारशी फिकीर नसते. पण पुरुषाने दगा दिल्यावर या स्त्रिया कोलमडून जातात. प्रेमाचेच हे एक रूप असते. कादंवरीत कुणा पुरुषाची रखेल राहणाऱ्या स्त्रिया या त्या पुरुषाकडून आर्थिक लाभाची कपडे, दागिने यांची अपेक्षा करतात. आत्मचरित्रातल्या स्त्रिया आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र असल्यामुळे प्रीतीभावना श्रेष्ठ मानतात. गीता साने 'लतिका' या कादंवरीत मातृत्वाचे उदात्तीकरण करतात. लतिका पतीला सोडून प्रियकराकडे जाण्याचे धैर्य दाखवते. पण मुलाच्या ओढीने प्रियकराला सोडून पतीकडे परत येते. आत्मचरित्रात हंसा वाडकर, आनंदीबाई विजापुरे मुलांना पतीकडे ठेऊन प्रियकराकडे जातात. उलट वडिलांकडे राहण्यातच तुमचे भले आहे असे मुलांना सांगतात. आत्मचरित्रातल्या स्त्रिया शिक्षण, विविध खेळ यात पारंगत आहेत असे काही अपवाद कादंबरीत आहेत याला कारण कादंवरीतले जीवन कल्पित असते. मात्र समाजवास्तवाचा त्याला आधार असतो. कादंबरी समाजजीवनाशी प्रामाणिक राहण्याचा प्रयत्न करते. कादंबरीतले काल्पनिक वास्तव हे आत्मचरित्रातील वास्तवाशी प्रामाणिक राहण्याचा प्रयत्न करते. कादंबरीच्या कथानकात स्त्रीचा विकास, स्त्रीचा ध्येयवाद, स्त्रीची सुधारणा लेखक लेखिका वर्णन करतात. कादंबरीपेक्षा अधिक प्रखर, अधिक प्रेमळ, अधिक मानवी अधिक महत्त्वाकांक्षी कर्तृत्वसंपन्न स्त्री मराठी स्त्रियांच्या आत्मचरित्रात दिसते.

नववे प्रकरण उपसंहार असून यामधे पेशवेकालान्त स्त्रीजीवन माजघराशी बंदिस्त होते ते ब्रिटिश काळात सुधारू लागले. या काळात अनेक समाजसुधारक निर्माण झाले. त्यांनी स्त्रीशिक्षण, बालविवाह प्रतिबंध, पुनर्विवाह पुरस्कार, केशवपनास बंदी यासारख्या स्त्रीजीवनाच्या संदर्भातील सुधारणा केल्या. या सुधारणांचा परिणाम मराठी कादंबरीवर झाला. स्त्रियांच्या आत्मचरित्रात जो सूर दिसतो तो स्त्री बदलली याचे द्योतक आहे. स्त्री स्वत:च्या हौशी वाजूला सारून पुरुषाचे, पतीचे जीवन फुलवते त्याला मोठा झालेला पाहण्यात हरखून जाते, पण तो जेव्हा तिला योग्य मान देत नाही, भावनाप्रधान स्त्रीचे मन पतीला कळत नाही, तेव्हा तिला दु:ख होते. आत्मचरित्रातील स्त्रियांना प्रगतीसाठी समाजाशी झगडा करावा लागला. कादंबरीत सुधारणा झटकन घडून येतात. आत्मचरित्रात परिचारिका, शिक्षिका, डॉक्टर, वकील अशा विविध क्षेत्रातल्या स्त्रीचे दर्शन घडते. सर्वच आत्मचरित्रे अनुभव दृष्ट्या चांगली असली तरी अक्षर कलाकृतीच्या दर्जाला पोचत नाहीत. कारण जीवनाचे तटस्थपणे दर्शन सर्वांनाच साधते असे नाही. कादंबरीत स्त्रीला न्याय मिळत नाही. स्त्रीच्या आंतरिक मनापेक्षा वाह्य सौंदर्यावर फिदा होऊन लेखक लेखन करतात. स्त्रीला शरीरासारखं मन असतं याचा विचार मराठी कादंवरीत व्हावा तसा होत नाही.

स्त्रीजीवनाविषयक सुधारणा आजही तळागाळापर्यंत पोचत नाहीत.

कादंबरी व आत्मचरित्र दोन्ही प्रकार एकमेकांना पुरक आहेत. कादंबरीकार कल्पित कथानक रचतो. समाजवास्तवाचा त्याला आधार असतो. एका विषयसुत्राने तो कादंबरी लेखनास प्रारंभ करतो. काल्पनिक कथांकरवी जीवनाचे दर्शन घडवतो. कादंबरीत कथानकासाठी अनेक व्यक्तिमत्त्वे निर्माण करण्याचे स्वातंत्र्य त्याला असते. आत्मचरित्र जीवनवास्तवावरच आधारलेले असते. अनुभवलेल्या वास्तवाला रूप देऊन आत्मचरित्रकार आपला जीवनपट वाचकांसमोर मांडतो, आत्मचरित्रातील वास्तव हे त्या त्या काळाशी प्रामाणिक असते. स्त्री-पुरुषांनी बरोबरीने एकमेकांच्या सहकार्याने संसार केला तरच जीवन सुखाचे होईल अन्यथा नाही; कारण स्त्री आणि पुरुष या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. चूक एकाची नसते तर दोघांनी समन्वय साधायला हवा. हे या प्रबंधाचे सूत्र आहे.

□

डॉ. शैलजा जोशी, एम.ए., पीएच.डी.
रत्नागिरी-वायंगणी, पोष्ट - फणसोप, ता. जि. रत्नागिरी, पिन - ४१५ ६१२.
दूरध्वनी : (०२३५२) ३८०५७.

## वाचकांच्या प्रतिक्रिया

'म.सा. पत्रिकेचा नूतन अंक नुकताच मिळाला. बहिरंग व अंतरंग या दृष्टीने अंक चांगला निघाला आहे. श्री माजगावकर यांचे कार्यकर्तृत्व विषद करणारे लेख विशेष उल्लेखनीय आहेत. मराठी साहित्यसृष्टीचा प्रचलित आढावा घेणारा हा अंक सारे मराठी चित्र आपणासमोर उभे करतो.'

डॉ. वि. म. कुलकर्णी, पुणे

म.सा. पत्रिकेचा समग्र अंक एका बैठकीत वाचून काढला. अंक दर्जेदार निघाला आहे. अंकाची मांडणी, छपाई व निर्मिती सुरेखच आहे. अंकाचे संपादन आपण साक्षेपाने केले आहे.

डॉ. हे. वि. इनामदार, पुणे

म.सा.पत्रिकेचा आपल्या संपादनाखाली प्रसिद्ध झालेला अंक आवडला. अंकाचे बहुमिती स्वरूप स्वागतार्ह असे आहे. अभ्यासकांसोबत सर्वसामान्य वाचकाच्याही वाङ्मयीन जाणिवा समृद्ध करायला अंकाचे हे स्वरूप उपयुक्त ठरेल.

डॉ. ल. रा. नासिराबादकर, कोल्हापूर

म. सा. पत्रिकेच्या अंकातील 'दिवाळी अंक लेख सूची', 'साहित्यवार्ता' ही नवी सदरे उपयुक्त आहेत.

प्रा. व्यंकटेश वळसंगकर, गुलबर्गा

आपण संपादित केलेला म.सा.प. चा अंक मिळाला. म.सा.प.ची परंपरा आपण राखली. आपण यात अधिकाधिक यशस्वी होणार याबद्दल खात्री पटली.

सु. ग. जोशी, मराठवाडा संशोधन मंडळ, लातूर



अनुक्रमणिका






# ग्राम संस्कृतीच्या वास्तवस्थितीचा प्रत्ययकारी अविष्कार 'बळिवंत'

बाबाराव मुसळे

'बळिवंत' हा श्रीकांत देशमुख यांचा महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या नवलेखक अनुदान योजनेतून प्रकाशित केलेला सर्वांगसुंदर असा पहिला कवितासंग्रह. आशय, अभिव्यक्ति आणि मुखपृष्ठासह कवितांची मांडणी ह्या सगळ्या बाबतीत ह्या संग्रहाचे स्वरूप मनमोहक, देखणे असे आहे. दिवाळीच्या दुसऱ्या दिवशी म्हणजे बलिप्रतिपदेला गोठ्यात खेड्यापाड्यातल्या शेतकरी-स्त्रिया शेणाचा गायवाडा करतात. त्यात कृषि-संस्कृतीचे जवळपास संपूर्ण दर्शन झालेले असते. अशा गायवाड्याचे चित्र ह्या संग्रहाचे मुखपृष्ठ आहे. ह्या कल्पकतेबद्दल संग्रह हातात घेताच कवीचे कौतुक केल्यावाचून राहवत नाही. तसेच मुखपृष्ठावर 'धांदुल मोक्षकथन' ही लिळा देऊन एकूणच काव्यसंग्रहाची आशयघनता वाढविली आहे. मुखपृष्ठ ते मलपृष्ठापर्यंतच्या हा संपूर्ण दस्ताऐवज हा गावाच्या, शेतीच्या, कुणब्याच्या अलौकिक, देखण्या सुख-दुःखाचा प्रत्ययकारी अविष्कार आहे. मात्र यात सुख कमी व दुःखच जास्त आहे.

रानमातीशी, काळीशी एकजीव झालेल्या कुणब्याच्या शेतीवाडीची, घरदाराची, गुराढोरांची अवर्षणामुळे नापिकीमुळे कितीही वाताहत झाली तरी तो मातीशी असणारी, जोडली गेलेली आपली नाळ वेगळी करू इच्छित नाही.

बळिवंत आम्ही, ढेकळांचे दास
भुईचाच वास. अंगोपांगी । (पृ. ९०)

असा तो मातीमय, मृणमय झालेला असतो.

शेणामेणाची कर गायवासरं
फुलव गायवाडा
उभा जन्म जगता सुटेल कधी तिढा
देवाच्या काळजात उठेल कळ
फुटतील डोळे
जगला वाचला कुणबी होईल गाव गोळा
(पृ. ५२)

कारण त्याचं एकट्याचं दुःख हे एकट्याचं नसतं ते गावाला व्यापूनही उरणारं असतं, तसं एका कोण्या गावाचंही नसतं. सर्वव्यापी असं असतं.

चिवडलेल्या राखोडीत मांडतो कोणी
एक कथा
जागलेल्या खेड्याची फुकून देतो
लोकगाथा
राखच नुसती नुसती कोंडाळ्याच्या
डोईवर
केसाकेसावर










मेल्या ढोराची गोमाशी नेणत्या वासरावर
(पृ. ८)

मागच्या पिढ्या मातीआड झाल्या त्या याच लागणीमुळे, सध्याच्या पिढीला तिने ग्रासले आणि नवजात पिढीलाही तिने स्पर्श केला आहे. अशी ही 'काळरूपी' गोमाशी गावामागून गाव वसाड पाडीत चालली. गावाचं अस्तित्व तरी शिल्लक उरेल किंवा नाही?

गाव ! हं, कसलं गाव? कुठलं गाव? गाव म्हणायचं तरी कशाला? नुसताच गाव हा गाव नसतो. गावात असतात माणसं, गुरंढोरं, शिवार, कणसं, ह्या सर्वांचा संबंध असतो कुणब्याच्या आतड्याशी. म्हणून कणसं नासली, काजळली की गाव एकांतात रडतो.

वृत्ती आहे गाव ही प्रवृत्ती आहे
नाहीच जगू शकत माणूस त्याशिवाय
समूह भावनेचा शिलालेख असतो गाव
(पृ.१६)

किंवा

आभाळाचं भुईवर टेकलेलं पोट
म्हणजे जमीन जुमला धुरे बंधारे
भोवतालचं क्षितीज वगैरे...
गृहीत धरलं तर
गाव हा त्याचा गर्भ ठरावा (पृ.१३)

हा गर्भ वाढावा, परिपक्व व्हावा, गावाची भरभराट व्हावी ही अपेक्षा पण वांझ ठरावी. कारण गावाच्या नशिबी नपुंसकत्व येते; गावा रांडव बनतो, मनाला उभारी देणारं नवं इथं काहीही उगवत नाही. याचं कारण आभाळ. गाव ज्या आभाळाचा 'गर्भ' असतो त्या आभाळानं हातचं सोडलं.

कुणब्याचे दुःख झालेय देखणे
आभाळ उताणे, पाठीवर (पृ. ७५)

अशा वांझ आभाळाविषयी संतापाची तीव्रता का वाढणार नाही?

सोडोनी कासोटा, करावा उघडा
तसे बडवा, आभाळाला (पृ. ८१)

कारण आभाळाच्या नाकर्तेपणामुळेच गावाची दुर्दशा झाली. याच आभाळामुळे-

गाभुडले मळे, कुजलेत दाणे
पिकलेली पाने, गळतात (पृ. ६१)

वर्तमानातलं हे आभाळाचं वांझोटेपण भूतकाळात मात्र कधी अनुभवायला आलं नाही.

पाहिलं आहे, आभाळ वाकलेलं
भुईसपाट झालेल्या, बापाच्या पाठीवर
(पृ.१४)

याच पावसानंतर वापानं-

पेरला ओल्या मातीत दाणा
पाऊसही नादावला
पायात चाळ बांधून
ओसरीत वरसला (पृ.३२)

इतकेच नव्हे तर

त्यानं झेलला पाऊस, जसा नक्षत्राचा
दाणा,
उभ्या उभ्या धुऱ्यावर, बाप घालितो
उखाणा (पृ.३६)

बाप असा 'पाऊसवेडा' वेधुंद झाल्यावर माय ही मागे नसते.

कवतिकी माही माय. तिला दांडाचं लुगडं

उन्हा-पावसात न्हाणं, साऱ्या
आयुष्याची झड (पृ. ३६)

हीच माय

रानात निंदतांना माय
एकटीच ओळी गाते

आपसूकच रानचं
काळसावळं जातं होते (पृ.१५)

पण कधीकाळी अनुभवलेलं हे सुख आता भोगायला मिळणार नाही.
कारण पाऊस. आभाळ आता लहरी झालं आहे.

बऱ्याच दिवसांनंतर
पीकं वाळल्यावर पडून गेला पाऊस
भुईवरल्या भेगातून एक थेंब थेट
पृथ्वी पेलणाऱ्या थेंबाच्या पडला
टाळूवर
बरं वाटलं त्यालाही
आभाळ आता माणसं मातीला टाळून,
थेट मुततंय डोक्यावर आपल्या
(पृ.२४)

आता आभाळाची जागा उन्हानं, वाऱ्यानं घेतली,

बत्तीस नखाचं उन्हं
गल्ली बोळातून
घरादारावर हिंडतेय
दारोदार
पाण्याची भीक मागत (पृ.३४)

आणि वारा सर्वस्व होऊन बसला
आता वाराच आहे रक्त; पाणी, घरदार वारा आहे.

आहे वाराच भाकर आहे वारा सर्वा
वाराच सर्वा आहे (पृ.१८)

पायाखालच्या मातीपासून थेट डोक्यावरच्या आभाळापर्यंत असं विश्वव्यापी भकासलेपण कोणाला व्याकुळ करणार नाही? डोळ्यांच्या गारगोट्या झाल्या, केस पिकले, सारी उमेद लयाला गेली; त्यात आभाळानं साथ द्यायला नकार दिल्यावर करावे तरी काय? म्हातारा झालेला बाप शाळेत शिकणाऱ्या आपल्या पोराला म्हणतो-

'लेका काय करायची शाळा शिकून
जिनगानीची शाळा झाली राजा(पृ.२०)

शाळा सोडून काय करायचं मग?

आपलं पिडीजात कुणवीपण विसरून
आता किराणा दुकान मांडू (पृ.४०)

त्यात तरी यश येते का?

पायरीचे निसटले दगड
बाप उठवणी आला
मरतांना त्यानं विचारलं
दुकानात माल किती उरला
डब्यांची उलथा पालथ केली
तेव्हा दिसलं
डबे उंदरांच्या लेंड्यांनी भरुन गेलेत.
(पृ.४१)

अशा स्थितीत पाय घासून मरण पत्कारण्याशिवाय गत्यंतर नाही. बळिवंताचं असं गाभुडलेलं, उलंगलेलं, दुःखमय जीवनाचं चित्रण देशमुखांच्या कवितेत ठायी ठायी उमटलेलं आहे. असं असलं तरी कधी न संपणाऱ्या या दुःखाच्या काळ्याकुट्ट पदराला जीवनातील असे शेकड्यावारी दुःख सहज पचायचं बळ देणारी अध्यात्माची भरजरी किनारही असते. गावच्या देवळाची घणघणणारी घंटा, टाळ, मृदंग, नामाचा गजर, अभंग, कीर्तन, पोथी, प्रवचन यापासून सुरू होणारी ही अध्यात्माची वाट थेट पंढरपुरापर्यंत जाते. पण हाही अनुभव विपरीतच -

माळदात बाप, ऐकतो पुराण
बुडलेले कान, काळोखाने (पृ. ५५)

'गावाची पंढरी, देहाची पंढरी' करून
अभंग कोळून झाले तुकाराम

माळावर टाळ, तुटलेला (८७)

या साधनेतून त्याला पसाभर सुखाची अपेक्षा असते, पण ते त्याच्या वाट्याला येत नाही. इथेही त्याचे नशिब आडवे येते.

माझाच अभंग, इथे गाभुडला
डोळाही फुटला, विठ्ठलाचा (पृ. ६८)

प्रत्यक्ष विठोवानेही त्याच्यासाठी डोळे मिटून घेतल्यावर ज्ञानेश्वर, तुकोवा, नाथमहाराज, गाडगेवावा, ज्योतीवा हे कसले पावणार? सर्व सुखाचे निधान अशा पांडुरंगाचे नाकर्तेपण पाहून त्याला संताप येणे साहजिक आहे.

कुणब्याचा देव, होवोनिया गांडू
प्रपंचास मांडू, माळावर (पृ. ६५)

अशा 'गांडू' देवांना धडा शिकविलाच पाहिजे.

अंधाराच्या बुडी, मांडोनिया ठाण
आवळतो मान, विठोवाची (पृ.८८)

विठोबाचा गळा घोटायचा आणि

देवाच्या हाडाची, करोनी वासरी
स्मशानाची वारी, येताजाता (पृ.८५)

न पावणाऱ्या देवांसाठी 'देवदेव' करीत बसण्यापेक्षा

गाईच्या मुताची, पेटोनिया वात
सावरावी कास, विकासाची (पृ.६४)

गायगुरांच्या मदतीने आपला आपण विकास करणे वरे. देवाच्या नादी लागण्यापेक्षा पाखरांची संगत वरी. त्यांना उपकाराची जाणीव तरी असते.

बापासाठी पान्हावलेली पाखरं
मी पाहिली आहेत (पृ.१०)

बापाचं पाखरांशी जीव जडणं या जन्मापुरतं नाही तर

वापाला पुनर्जन्म आवडायचा
कदाचित पाखरू होऊनही
बांधावर येऊन बसायचा (पृ.१२)

असं जळी, स्थळी काष्ठी वास्तव्य करणारं आणि वरून दशांगुळे उरणारं चिरंतन दुःख समृद्धपणे उपभोगणाऱ्या ग्रामीण जीवनाशी कवीची नाळ घट्ट जोडलेली आहे. त्यामुळे वळिवंताच्या सुख-दुःखाचे, दैन्य-दारिद्र्याचे उपहास-उपेक्षेचे, शोषण-पिळवणुकीचे असे सारेच्या सारे उन्हाळे-पावसाळे कवीच्या सहज शब्दकलेतून कवितेत जागोजाग अवतरलेले दिसतात. माय, वाप, आभाळ, रान, पाखरं, गुरंढोरं, गोठा, पिकं ह्या साऱ्यातून त्याचा जीव उदासपणे भ्रमण करत राहतो. पांडुरंग, गोदावरी, प्रवरा, तुकाराम, ज्ञानोवा हा मलम वापरूनही त्याचा दाह कमी होत नाही; उलट वाढतो. ही कविता कोण्या एका बापाची, मायची, म्हाताऱ्याची वा गावाची नव्हे. ती यत्र-तत्र सर्वत्र दिसून येणारी आहे. त्यामुळे ती वाचताना जीव आतून गलवलून येतो. मनाला प्रचंड अस्वस्थ करते, अंतर्मुख करते. म्हणूनच साध्या सोप्या शब्दकलेतून अवतरलेली ही कविता लक्षणीय ठरते. ती कुणा इतर कवीच्या कवितेसारखी नाही. ती तिच्याच सारखी आहे. म्हणून मी या कवितेचं मनःपूर्वक स्वागत करतो.

'बळिवंत', श्रीकांत देशमुख, केदार सप्लायर्स, पुणे, पृष्ठे-९१, किंमत रु. ४५

□

बाबाराव मुसळे, श्री पारेश्वर विद्यालय,
पार्डी टकमोर, ता. वाशीम
जि. अकोला ४४४ ५०५.

# 'श्रीगोविंदप्रभुविषयक साहित्याचा अभ्यास !

डॉ. पंडित आवळीकर

डॉ. अ. वा. आवलगावकर यांनी डॉक्टरेट' साठी केलेला श्रीगोविंदप्रभूविषयक साहित्याचा अभ्यास आटोपशीर रूपात उपलब्ध झाला आहे याचा मला आनंद वाटतो. प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासाकडे वळणारे आधीच कमी. त्यात तो अभ्यास साक्षेपाने इतरांपुढे ठेवणारे त्याहूनही कमी म्हणून प्रारंभीच डॉ. आवलगावकरांचे मला मनःपूर्वक अभिनंदन करावेसे वाटते.

'श्रीगोविंदप्रभुचरित्र' (म्हाईंभट), 'श्री ऋद्धिपुर माहात्म्य' (महेश्वरपंडित), 'श्रीऋद्धिपुरवर्णन' नारायण व्यास बहाळिये), ऋद्धिपुरमाहात्म्य' (कृष्णमुनी डिंभ) या कृती आणि काही स्फुट काव्ये यांचा हा अभ्यास आहे. त्यासंबंधी झालेले संशोधन आणि चिकित्सक लेखन यांचा आवलगावकरांनी प्रस्तुत प्रबंधात विचार केलेला आहे.

श्रीगोविंदप्रभुविषयक साहित्याविषयी त्याचे निर्मिते, त्यातील गोविंदप्रभूंचे दर्शन व समाजचित्रण, त्यातील महानुभाव तत्त्वज्ञान आणि त्याचे वाङ्मयीन मूल्यमापन यासंबंधी आजवर पुष्कळ लिहिले गेले आहे. पूर्वसूरींच्या लेखनाचे उल्लेख टाळता तर येत नाहीत आणि ते केले तर चर्वितचर्वणाचा दोष नव्या अभ्यासकास चिकटतो. आवलगावकरही या शृंगापत्तीत सापडले आहेत. ग्रंथकर्तृत्वाचा वाद असो (श्रीगोविंदप्रभुचरित्र) , की स्थलनिर्णयाचा प्रश्न असो ('बहाळिये' कोणते?) किंवा त्याच्या रचनाकालाची निश्चिती असो ('ऋद्धिपुर माहात्म्य वर्णन') या प्रश्नातील दोन्ही बाजू सामान्यतः आवलगावकरांनी अपेक्षित ताटस्थ्याने मांडल्या आहेत. क्वचित, पां ना. कुलकर्णी - वि. भि. कोलते यांची 'श्रीगोविंदप्रभुचरित्र' विषयक मतमतांतर नोंदताना कोलत्यांच्या बाजूने एकतर्फी निर्णय देण्याची त्यांची घाई यापुढे मंदावली पाहिजे. उपरिनिर्दिष्ट विवाद्यस्थळांत- त्या वादांत, या तरुण अभ्यासकाच्या एखाद्या तरी मताची भर असावी.

गोविंदप्रभूंचे दर्शन असो वा तत्कालीन समाजाचे दर्शन असो, या संबंधी व. दि. कुलकर्णी, शं. गो. तुळपुळे किंवा कोलते यांच्याहून सर्वस्वी वेगळे काही सांगणे अवघड असले- तरी नवीन काही सांगणे, तसा प्रयत्न करणे - म्हणजेच (सं)शोध (न), नाही तर ग्रंथशीर्षकातील 'शोध' पूर्वसूरींचाच ठरेल. उदाहरणार्थ,

गोविंदप्रभूंच्या जीवनातील चमत्कारांची परामानसशास्त्रीय चिकित्सा करणारा माझा शोधनिबंध आवलगावकरांनी सढळ हाताने उद्धृत केला आहे. पण तो त्यांना पुरेसा कळला नसावा. त्यासाठी व. दि. कुलकर्णी यांनी माझ्या चमत्कार मीमांसेबद्दल जे म्हटले आहे, ते पाहणे उपयुक्त ठरले असते. पण त्याहून १९७० मधील माझ्या त्या निबंधाचे आजच्या परामानसशास्त्रीय दृष्टिकोणातून खंडन - मंडन करणे अगत्याचे होते : आहे. या सहित्याच्या वाङ्मयीन आकलनात-मूल्यमापनात व. दि. च्याही पुढला 'रचनाबंधा' चा विचार-पुनरुच्चार नव्हे, आढळावा ही अपेक्षा चुकीची आहे काय? पूर्वसूरींच्या 'शोधा'वरील एखादे वाक्य म्हणजे समीक्षा असे वाटू नये. याच ठिकाणी एखादा अभ्यास 'शोध'/'समीक्षा' या पातळीवर जाण्यासाठी लागणाऱ्या कठोर परिश्रमशीलतेची गरज जाणवते.

'श्री गोविंदप्रभुचरित्रा'तील भाषेचा विचार करताना, विशेषतः 'वऱ्हाडी बोली' चे म्हणून काही शब्द (बोडी, गाऊ, जाडी) देताना या शब्दाची अलीकडील चर्चा वाचनात असायला हवी. कोलते यांनी न दिलेले शब्दार्थ (धांदल, वाडा इ,) शोधणे, अरवी शब्दाचाही धांडोळा घेणे या शोधाच्याच दिशा आहेत.

अभ्यासकाला इतिहास-भूगोलातही गती हवी. ऋद्धिपुरवर्णना'त सुपारीची मूळ स्थाने (बंदरे) म्हणून 'नलवती चेडलें चोळी' हा चरण येतो. हीच नावे. आवलगावकरांनी 'नलउ ते' , 'जेउले' अशी दिली आहेत. मुद्रणदोष या नावाखालीही हे खपू नये. ही बंदरे (?) आवलगावकरांनी जरूर शोधावीत.

संस्कृत वरोवर इंग्रजीकडेही दुर्लक्ष होणे खेदकारक आहे. चरित्राची इंग्रजी ग्रंथातील व शब्दकोशातील व्याख्या मराठीत देणे-तीही मराठीतील; दुसऱ्या एका प्रबंधातून-......हे ठीक नाही.

आवलगावकरांच्या हातून अव्वल दर्जाचे संशोधन व्हावे. या मार्गातील खाचखळगे (Pitfalls) ध्यानी घ्यावेत. टाळावेत. यश त्यांचेच असेल.

□

*श्री गोविंदप्रभुविषयक साहित्य : शोध आणि समीक्षा, डॉ. अ. वा. आवलगावकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे, मार्च १९९६, रु. १८०.*

□

डॉ. पंडित आवळीकर
१४ ई २, सदनिका, ५-६, सिद्धार्थनगर,
औंध, पुणे-४११ ००७.

# जे. कृष्णमूर्ती — जीवनदृष्टीचा परिचय

सुजाता शेणई

मॅजेस्टिक प्रकाशन आणि मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळ यांच्या संयुक्त सहकार्याने 'जे. कृष्णमूर्तींची जीवनदृष्टी' हे पुस्तक छापून तयार झाले. मराठी तत्त्वज्ञान महाकोश (मत्तम) मंडळाने आतापर्यंत महापुरुषांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने डॉ. आंबेडकर, पंडित नेहरू, डॉ. राधाकृष्णन, सावरकर व इतर थोर पुरुषांच्या जीवनकार्यावर आधारित वैशिष्ट्यपूर्ण पुस्तके तयार केली आहेत. त्याच मालिकेतील जे. कृष्णमूर्ती या थोर विचारवंताच्या जीवनदृष्टीचा परिचय त्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षात करून देण्यात येत आहे.

जे. कृष्णमूर्ती हे जरी या शतकातील जागतिक कीर्तीचे व मान्यतेचे तत्त्वचिंतक असले तरी मराठी माणसांना त्यांची फारशी माहिती नाही. या थोर विचारवंताचा परिचय व त्यांच्या विविध मतांचा परिचय या पुस्तकात करून देण्याचा प्रयत्न लेखक प्रा. डॉ. ग. ना. जोशी यांनी केला आहे. 'व्यक्तिचरित्रात्मक' असे जरी पुस्तकाचे स्वरूप असले तरी प्रामुख्याने प्रकाश टाकलेला दिसतो तो जे. कृष्णमूर्तींच्या वैचारिक बैठकीवर ! एकूण पुस्तकाची विभागणी सहा प्रकरणात केली आहे. जे. कृष्णमूर्तींची जीवनकथा, व्यक्तिमत्त्व आणि जीवनदृष्टी यांचा परिचय पहिल्या प्रकरणात करून दिला आहे. जे. कृष्णमूर्तींचा जन्म 'मदनपल्ली' नावाच्या छोट्या खेड्यात झाला. अतिशय हलाखीच्या परिस्थितीत बालपण गेले. कोणत्याही शैक्षणिक संस्थेत शिक्षण झाले नाही. ॲनी बेझंट आणि त्यांची सहकारी लेडबीटर यांनी कृष्णमूर्तींना वाढविले. तत्त्वज्ञानाचा, अध्यात्माचा परिचय करून दिला. कृष्णमूर्तींना अध्यात्मशक्ती प्राप्त होताना त्यांनी प्रत्यक्ष पाहिले होते. थिऑसॉफीचे जागतिक नेतृत्व त्यांच्याकडे सोपविले होते, पण कृष्णमूर्तींनी मात्र आपला मार्ग बदलला. सत्याच्या मार्गाने एकट्याने निर्भयपणाने वाटचाल करण्याचे ठरविले व थिऑसॉफिचे जू झुगारून दिले. कोणताही पंथ प्रस्थापित करण्याच्या ते विरुद्ध होते. मानव, युद्ध, सत्य, मानवी जीवनातील समस्या याबाबतची त्यांची मते त्यांनी निर्भीडपणे मांडली. भारतीय असूनही स्वतःला भारतीय मानले नाही. जन्माने हिंदू असूनही हिंदुत्वाचा, वेदोपनिषद, गीता यांचा त्यांना अभिमान वाटत नव्हता. सत्यशोधक कृष्णमूर्तींनी स्वतःची जीवनप्रणाली स्वतः

ठरविली व आचरणात आणली.या सर्वांचा परिचय अतिशय सोप्या भाषेत लेखकाने करून दिला आहे.

'मनाचे स्वरूप व कार्यपद्धती' याविषयीच्या कृष्णमूर्तींच्या विचारांचा आढावा दुसऱ्या प्रकरणात तर 'ज्ञानाची प्रक्रिया आणि सत्यान्वेषण' या विषयीची त्यांची मते तिसऱ्या प्रकरणात दिसतात. कृष्णमूर्ती हे स्वतंत्रपणे विचार करणारे मौलिक स्वयंप्रज्ञ विचारवंत होते. ते प्रत्येक बाबतीत पूर्णपणे नव्याने स्वतः विचार करू पाहतात आणि पूर्वजांनी स्वीकारलेले सिद्धांत उपपत्ती यांचा आंधळेपणाने आधार घेण्यास विरोध करतात.

'क्रांती' कृष्णमूर्तींनाही अभिप्रेत होती. क्रांतीचा मध्यबिंदू व्यक्ती असते.व्यक्तीचे आंतरिक जीवन, मानसिक जीवन असते. प्रस्थापित सामाजिक रचनेतून फुटून बाहेर पडल्याशिवाय खरी क्रांती घडून येणे शक्य नाही असे कृष्णमूर्ती म्हणतात. मृत्यू, आत्मा, मुक्ती यांविषयीची कृष्णमूर्तींची मते या पुस्तकात चौथ्या व पाचव्या प्रकरणात करून दिली आहेत. अध्यात्म आणि तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून स्वतःची विचारधारणा ठरविणारे व त्याचा पाठपुरावा करणारे जे कृष्णमूर्ती या पुस्तकातून दिसून येतात.

प्रखर बुद्धिनिष्ठ, बंडखोर, मुक्तिवादी, मानवप्रेमी, उत्तम संभाषणपटू, निर्भय सत्यशोधक, गतिमानतेचे प्रेमी, आधुनिक संस्कृतीचे द्रष्टे अग्रदूत इ. त्यांच्या विविध अंगांचा परिचय या पुस्तकातून करून दिला आहे. त्यांचे व्यक्तिमत्त्व आणि विचार यांची जोड यात पाहावयास मिळते.

कै. श्री. अच्युतराव पटवर्धन यांची (अपूर्ण) प्रस्तावना यात आहे. जागतिक कीर्तीची व्यक्ती असूनही महाराष्ट्राला अपरिचित राहिलेल्या या व्यक्तीची ओळख या पुस्तकातून होते. लेखक डॉ. ग. ना. जोशी यांनी अतिशय तन्मयतेने हे पुस्तक लिहिले आहे. साधी, सोपी निवेदनाची भाषा, लहान लहान परिच्छेदात मुद्दा उलगडून देण्याचे कसब व कुठेही व्यक्तिपूजनाचा भाव न ठेवता केलेले लेखन स्तुत्य वाटते.

*जे. कृष्णमूर्तींची जीवनदृष्टी : लेखक - प्रा. डॉ. ग. ना. जोशी, मॅजेस्टिक प्रकाशन आणि मराठी तत्त्वज्ञान महाकोशमंडळ, पुणे. पृष्ठे २०६, मूल्य रु. १७५/-*

□

सुजाता शेणई, बी-२, शांतीदीप,
विठ्ठलनगर, हिंगणे खुर्द पुणे.

# तस्मै श्री गुरुवेनमः ।

रागिणी पुंडलीक

आपण नेहमी बरंच काही वाचत असतो. पण त्यातले काहीच वाचन मनावर ठसतं. त्यापैकीच 'तस्मै श्री गुरुवेनम:' हे एक पुस्तक. अनंत अंबादास कुलकर्णी यांनी आपल्या आयुष्यात ज्या काही गुरूंनी त्यांच्यावर संस्कार केले त्या गुरूंची लिहिलेली व्यक्तिचित्रे.

व्यक्तिचित्रं लिहिताना लेखकाचा दुसऱ्या माणसाकडे बघण्याचा एक चांगला-वाईट दृष्टिकोन असतो. किंबहुना लेखकाच्या मानसिक दृष्टिकोनावर तो अवलंबून असतो. अनंतरावांची मुळात वृत्ती दुसऱ्या माणसातील गुणांची कदर करण्याची आणि तो गुण आत्मसात करण्याची, त्यामुळे गुरूंमधील दोषही त्यांना दिसले नाहीत. किंबहुना त्या त्या गुरूंमधील चांगल्या गुणांनी अनंतराव त्या त्या व्यक्तीकडे कोऱ्या मनाने आकर्षित झाले. आणि पुढं तर ते त्यांच्या जीवनात सामावून जाऊन त्यांचा सहवास त्यांना वैशिष्ट्यपूर्ण वाटत गेला. व्यक्तिचित्रं लिहिताना त्या त्या व्यक्तीचं चरित्र न सांगण्याची लेखकानं खबरदारी घ्यायची असते. ती खबरदारी पाळून अनंतराव गुरु-शिष्यांमधील घडलेले ठळक प्रसंग सांगतात म्हणून ती व्यक्तिचित्रे भासमान न रहाता वाचकाच्या डोळ्यांसमोर जशीच्या तशी उभी राहतात. कॉन्टिनेन्टल प्रकाशनाचे प्रसिद्ध प्रकाशक अनंतराव कुलकर्णी हे स्वत:च अत्यंत सात्त्विक, भला माणूस. इंग्रजीत ते Thourough gentleman म्हणता येतील असे. ते अजातशत्रू आहेत म्हटलं तरी चालेल. या पुस्तकातील हे सर्व त्यांचे गुरुजन! गुरुजनांकडे आपण नेहमी आदराने चांगल्या दृष्टिकोनातून बघतो. त्यांचे दोष आपण जो चांगला विद्यार्थी असेल तो दुर्लक्षितच करतो. किंबहुना त्या माणसामधील 'रुपा'कडेच पाहण्याची लेखकाची दृष्टी असते. अशीच दृष्टी ठेवून अनंतरावांनी त्यांच्या 'तस्मै श्री गुरुवेनम:'तील व्यक्ति-चित्रं त्यांच्या आयुष्यातील त्यांना शिकवलेल्या गुरुजनांबद्दल भारावून लिहून अनंतराव आपल्याही मनात त्यांच्याबद्दलचा आदर निर्माण करतात. पुस्तकाच्या मुखपृष्ठावरच आपल्या शाळेच्या आवारातील गुरुजींचा पुतळा आणि त्याच्या पायरीपाशी आपलं नाव अशाने सुरुवात केली आहे. पुस्तक उघडल्याबरोबरच्या पहिल्या पानावरील 'गुरुब्रह्मा गुरुर्विष्णो गुरुदेवो महेश्वरा'। गुरुसाक्षात् परब्रह्म तस्मै



अनुक्रमणिका



श्रीगुरुवेनमः ' ही गुरुंवद्दलची प्रार्थना वाचून आपल्या वाचकाच्या मनातही आपोआप आदराची भावना तयार होते. अनंतरावांच्या नावावरही आता चारपाच पुस्तकं होऊन आता ते नुसते प्रकाशक न रहाता लेखक म्हणूनही वाचकाच्या मनावर ठसतात. स्वत:चे प्रकाशन असताना त्यांचे हे पुस्तक त्रिदल प्रकाशनाने आणि तेही मुंबईच्या प्रकाशकाने प्रसिद्ध केलंय. ही व्यक्तिचित्रं त्यांचे गुरु आणि नंतर अनंतराव नाराणगावच्या विद्यामंदिरात काम करायचे त्या वास्तूलाच त्यांनी अर्पण केलंय. हेही नाविन्यच आहे.

अनंतरावांनी या पुस्तकात आपल्या मुंजीतील मुंज लावणाऱ्या गुरुपासून-रावजी भट, प्राथमिक शाळेतील दळवी मास्तर, नी. य. कुलकर्णीसर, हायस्कूलमधील मुख्याध्यापक नानासाहेब सवनीस, गुरुवर्य बाबा आणि परिशिष्टात त्यांना भेटलेले गुरुतुल्य प्राध्यापक लेखक अशी व्यक्तिचित्रं लिहून त्यांनी अनंतरावांवर केलेले ऋण फेडले आहेत. वरवरचं केवळ रंजनात्मक हलकंफुलकं लेखन न करता अनंतरावांनी आपल्या जीवनदर्शनातील त्यांच्याकडून आलेल्या अनुभवातून ही व्यक्तिचित्रं रेखाटली आहेत. ही व्यक्तिचित्रे रेखाटन करताना आपल्याला जाणवतं की या गुरुंनी केलेल्या, सांगितलेल्या अनुभवातून अनंतरावांचं जीवन हळूहळू समृद्ध होत गेलेलं आहे. त्यामुळेच या लेखनातील कलेचा दर्जा एक उंची गाठू शकतो. अशी व्यक्तिचित्रं लिहिताना त्या व्यक्ति वास्तवांतील असाव्यात. त्या वाचकांना परिचित असतीलच असं नसतं आणि त्यांच्याबद्दल लिहिताना त्या लेखनात लालित्यही आलं पाहिजे. म्हणजे त्या व्यक्ति वाचकांच्या मनावर जशाच्या तशा जरी नाही तरी लेखकाच्या मनावर उमटवलेला ठसा वाचकाच्या मनावर थोडा तरी उमटला पाहिजे. व्यक्तिचित्रं लिहिताना त्यातील घटना सत्याला धरून आणि त्या त्या व्यक्तित्त्वातील गुणदोषांचा शोध घेणारं असलं पाहिजे. त्यांच्यामुळे घडलेले प्रसंग आणि घटना यांची संगती लागली पाहिजे म्हणजेच त्या काल्पनिक असता कामा नयेत. हा दृष्टिकोन मनात ठेवून ही व्यक्ति- चित्रं वाचली की अनंतरावांनी त्या त्या व्यक्तिचित्रांची आरतीही होऊ नये याची काळजी घेतली आहे. आपल्या गुरुंबद्दल लिहिताना अनंतराव त्या गुरूंचा एक विद्यार्थी हा संस्कारप्रिय, आदराच्या भावनेतून आपल्या गुरूकडे बघतो आहे हे जाणवतं हे पुस्तक वाचल्यावरच वाचकांना कळेल.

मला स्वत:ला व्यक्तिचित्र हा प्रकार वाचायला आवडतो. अशाच वाचनात अनंतरावांचं हे 'तस्मै गुरुवेनमः' हे पुस्तक माझ्या हाती पडलं. आणि मी ते वाचतच गेले. त्याचा माझ्या मनावर हा उमटलेला ठसा. मी या पुस्तकाची समीक्षा किंवा परीक्षण म्हणून यावर लिहित नाहीए. मला या पुस्तकाबद्दल मनापासून लिहावेसे वाटले.

अनंतरावांच्या आयुष्यातील कर्तृत्वाची सुरुवात शिक्षक पेशानं झाली तरी त्यांचा पिंड मात्र प्रकाशकाचा आहे हे खरं.

मुलाच्या आयुष्यात पहिले संस्कार होतात ते मुंजीचे. अनंतरावांची मुंज रावजी भटांसारख्या विद्वानाने त्यांच्या मामाने लावली म्हणजे हेही वेगळेपण आहे. रावजी

भट हे जुन्या काळातले म्हणजे इ. स. १९१६ ते १७ सालातले इतक्या जुन्या काळात रावजींनी फक्त दोन जाती मानल्या—एक चांगला माणूस आणि दुसरी—वाईट माणूस. रावजी भट स्वत:दशग्रंथी विद्वान ब्राह्मण, मुंजीत मिळालेली दक्षणा आणि झोळीतील पदार्थ त्यांनी तेथील गरजू ग्रामस्थांना वाटून टाकले याचं वर्णनही अनंतराव बरोब्बर शब्दयोजन वापरून करतात. अनंतरावांच्या घरावरील छत्र वडिलांच्या मृत्यूनं उद्ध्वस्त झाल्यावर त्यांनी जीवनात उद्ध्वस्त झालेल्या अनंतरावांच्या आईला केलेला उपदेश—'बाई ग माझं त्यावेळी ऐकलंस, जीवाचं बरंवाईट न करता लेकराला वाढवलंस—माझ्या शब्दाला मान दिलास हे एकाअर्थी माझ्या डोक्यावर उपकाराचं ओझं केलेस आणि संसाराची जबाबदारी पत्करलीस.' इथं रावजीचं मन कळतं, वाचून थक्क व्हायला होतं. आताच्या या नीतिभ्रष्ट काळाकडे बघून वाटतं— त्याकाळी, किती लहान ध्येयनिष्ठा उराशी बाळगून माणसं आपलं जीवन मूल्यवान करून जात होती. हे व्यक्तिचित्र वाचतवाचत शेवटी अनंतरावांच्या आईनं दिलेली धाबळीही रावजींपर्यंत पोचतच नाही ती तशीच राहते. ही रुखरुख वाचकांच्याही मनात खोल घर करून रहाते. शेवटी रावजी खऱ्या अर्थी निस्वार्थी व त्यागी माणूस म्हणूनच जगले ! अनंतरावांच्या आयुष्यात असा नकळत झालेला गुरु अनंतरावांना दिलदार, उमदा, कर्तव्यनिष्ठ घडवेल नाहीतर काय?

दळवीमास्तर हे अनंतरावांचे प्राथमिक शाळेतले शिक्षक. दळवी मास्तरांचेच काय या पुस्तकातील सर्वच रेखाटनं न्याहाळल्यावर अनंतरावांनी लिहिलेली व्यक्तिचित्रं आणखी जिवंत वाटतात. प्राथमिक शाळेतले-खेड्यात असूनही हे दळवीमास्तर अतिशय वक्तशीर आणि विद्यार्थ्यांनीही हा गुण कटाक्षाने अंमलात आणावा म्हणून त्यांच्या विद्यार्थ्यांवर लक्ष ठेवणारे, शाळा सुटल्यावर अनंतरावांना मुद्दाम थांबवून त्यांना त्यांच्या परिस्थितीची व स्वच्छतेची जाणीव करून देणारे शिक्षक समाजात विरळाच. हे अनंतरावांना भेटणं हेही एक वरदानच वाटतं. आपल्या टेवलाच्या खणातून पुस्तक काढून विद्यार्थ्याला मुद्दाम वाचायला लावून, वर्गात यातल्या गोष्टी सांगितल्या पाहिजेत असं म्हणणाऱ्या शिककांकडून प्रकाशकाला बाळकडू मिळालं नाही का ? असा आग्रह धरलेल्या आपल्या या गुरूंना शेवटी 'नवनीत'ची मागणी करूनही ते अनंतरावांना आवृत्या संपून पुस्तक काळाआड झालं म्हणून देता आलं नाही हा प्रसंग अतिशय हृद्यपणे अनंतराव साध्या पण सोप्या शब्दात गप्पामारल्यासारखे सांगून जातात.

नी. य. कुलकर्णी हे आणखी एका आदरणीय गुरूचे व्यक्तिचित्र. या सरांनी मुलं सुधारावित म्हणून स्वत:च्याच हातावर रूळानं मारून घेऊन स्वत:ला शिक्षा करून घेतली. मुलांवर प्रेम करणारे असे शिक्षक क्वचितच ! आणि आपला विद्यार्थी मोठा प्रकाशक झाल्यावर आपल्या शाळेच्या समारंभाला अध्यक्ष म्हणून बोलावून त्याचं कौतुक करणारे सरही विरळच ! पुंडलीकांचे व्यक्तिमत्त्व नारळकरसर, पु. ग. सहस्त्रबुद्धे, इरावती कर्वे अशासारख्या शिक्षकांनी फुलवले होते, बहरवले होते तद्वत्‌च

अनंतरावांचे व्यक्तिमत्त्व या उत्तम शिक्षकांनी घडवलं. अशा गुरुवर्यावद्दल काही वैशिष्ट्ये वाचली की मला तर त्या माणसांचा हेवा वाटून असं वाटतं आपल्याही विद्यार्थी जीवनात असे शिक्षक यायला हवे होते ! पानशेतच्या पुराच्या वेळी अनंतरावांनी या भल्यामोठ्या आक्राळ-विक्राळ संकटाला अति स्वाभिमानाने, धैर्याने जे तोंड दिले ते अशा सारख्या शिक्षकांनी त्यांच्यावर केलेल्या संस्कारांमुळेच. आपल्या विद्यार्थ्याने सर्वांच्या मदतीला सादर नकार दिल्यावर नी. य. कुलकर्णीसरांनी गव्हाचं पोतं पाठवून वेगळाच हातभार लावला हेही वघण्यासारखे आहे. गांधीवादी, सानेगुरुजी परिवारातले हे हसतमुख शिक्षक कसे विद्यार्थी घडवतात हे आजच्या काळात सर्वच शिक्षकांनी वाचण्यासारखे आहे. हे वाचताना अनंतरावांमधला माणूस माणूसकी घेऊन कसा वाढला हेही वाचकांच्या वाचता वाचता लक्षात येते.

मला यातील आणखी एक व्यक्तिचित्र आवडलं ते म्हणजे नानासाहेवांचे. नाना नारळकरांसारखीच सवनीससरांची कीर्ती, आजपर्यंत कोणाच्या ना कोणाच्या तोंडून मी ऐकत आलेली होते. हेही नाना नारळकरांसारखेच एक प्रयोगशील मुख्याध्यापक होते. त्यांच्यावद्दल प्रत्यक्षच या पुस्तकात वाचायला मिळालं याचा मनापासून आनंद झाला. त्या काळची माणसं किती वेगळ्या ध्येयासक्तीनं, त्यागानं जगलेली, भारलेली होती. पैसा हेच सर्व सुखाचं साधन नसतं. असंच त्यांची व्यक्तिचित्रं वाचून वाटत रहातं. एक सबंध पिढीच्या पिढी चांगल्या संस्कारांनी घडवायची याचं या गुरूंजवळ केवढं कर्तृत्व होतं, याचा अचंबा वाटल्याखेरीज रहात नाही. पण चांगल्या गुरूंवद्दल काही लोकांना किंमतच नसते. उलट त्यांच्यावद्दल हेवा असतो. त्यांच्या गुणांची कदर न राखता वावा जोशींनी केलेला अपमान गिळून सवनीससरांना शाळा सोडून द्यावी लागते. पण कर्तृत्व असणाऱ्यांना कुठेही यश मिळतं. तसं शून्यातून उठून दहावारा हजार रुपयांवर स्वत:च्या एकट्याच्या जवावदारीवर नवीन शाळा काढायला त्यांनी पाऊल उचलले. विद्यार्थ्यांनाही चांगले शिक्षक असले की सतरंजीवर आकृत्या काढूनही शिक्षण घ्यायला ते तयार असतात. अनंतरावांनी शिक्षकाची नोकरी धरल्यावर त्यांनी उद्धृत केलेल्या टागोरांच्या ओळी आजही सर्व शाळाशाळातून ध्येय म्हणून लिहून ठेवायला हरकत नाही. हे वघ, ध्येय गाठण्यासाठी हातात पणती घेऊन एकट्यानंच चालावं लागेल, ही पणती कदाचित विझेल पण ती पुन्हा लाव आणि विद्यामंदिराच्या दिशेने चालत रहा. लोकांच्या टीकेकडे दुर्लक्ष करूनही तू चालत रहा.' कुठल्याही माणसाला दिशा दाखवता येते पण प्रयत्न आणि जिद्द ही ज्याची त्यानीच अंगिकारायची असते. नव्या शाळेच्या व्यापात विद्यार्थ्यांकडे दुर्लक्ष होता कामा नये म्हणून सकाळी स्पेशलवर्ग घेऊन इंग्रजी शिकवायचे. येथे सवनीसांमधील हाडाचा शिक्षक उभा रहातो. विद्यार्थ्यांसाठी स्वत: फी व दंड भरणारे मुख्याध्यापकही फार विरळा. म्हणूनच त्यांना सर म्हणता म्हणता विद्यार्थ्यांचे ते 'नाना' झाले.










अनंतरावांनी आपला शिक्षकी पेशा सुरू करताना नानांनी त्यांना जे सांगितलं होतं तेही आजच्या शिक्षकांनी अंमलात आणण्यासारखे आहे—शिक्षक हा पेशा फार पवित्र मानावा. तो धंदा नव्हे, मुलांना शिक्षा करावी पण ती पित्याच्या हृदयाने. स्वत:चं वर्तन स्वच्छ व आदर्श हवं. त्यांत पोरकटपणा थिल्लरपणा नको. पैसे घेऊन शिकवण्या मुळीच करू नयेत. वर्गात धाक हवा पण मैदानावर प्रेमादर हवा, कोणतीही गोष्ट किरकोळ मानू नकोस. Do common thing uncommonly well सवनीसांनी ही शिक्षकपेशाची तत्त्वच स्वत: अंगिकारून समाजाला दाखवून दिली. नानांच्या अंतकाळी त्यांच्या हातात हात देऊन 'नाना नारायणगावच्या शाळेकडे मी लक्ष देईन आणि अंशत: तुमचे गुरु ऋण फेडीन' असा शब्द देण्यातही अनंतरावांना धन्य झाले.

हाच मार्ग गुरुवर्य बाबा तथा केशवराव बेलसरेमहाराज यांनीही अनंतरावांना सांगितला होता. बेलसऱ्यांविषयी 'गुरुवर्य बाबा' म्हणून लिहिलेलं व्यक्तिचित्रं तर अप्रतिमच आहे. अनंतरावांच्या उतार वयात दासबोधाच्या प्रकाशनाच्या निमित्ताने भेटलेले संपादक बेलसरे अनंतरावांचे गुरुच बनून गेले. त्यांनी अनंतरावांना वेळोवेळी सुचवलेले योग्य मार्ग वाचताना, बाबांची आपल्या शिष्याबद्दलची आपुलकी शब्दाशब्दात जाणवते. दासबोधाच्या संपादनाचा मोबदला न घेता फक्त त्याच्या दोनतीन प्रतीची मागणी करणारे बेलसरे, अनंतरावांनी त्यांना भेट म्हणून आणलेल्या पुस्तकाची किंमत विचारून त्यांना पैसे देऊ करणारे बेलसरे. आपल्याही मनात आदर द्विगुणीत करतात. माझे मेव्हणे व बहीण सुशीला उपाध्ये यांच्याकडून मी वेळोवेळी बाबांबद्दल खूप काही ऐकून होते. सिद्धार्थ कॉलेजात पुंडलीक असताना बाबा तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर म्हणून तेथे शिकवत असत. आम्ही दोघेजण मालाडला त्यांच्या मठी जाऊनही आलेलो आहे. शिवाय त्यांची मुलगी ही श्रीजंची सून-त्यामुळे हे त्यांचं व्यक्तिचित्र वाचताना मला फार जवळून आपुलकी आणि आदर वाटत राहिला. त्यांच्यासारख्या संताने अनंतरावांची केलेली चांगल्या अर्थी उपरती ही आपण कुणीही अंगिकारावी अशीच आहे. आणि तरीही बाबा संसारातून कुणाला पूर्णपणे उठायला सांगत नाहीत. दिवसातून एकदा तरी देवाचं नामस्मरण करा यातच मानसिक समाधान आहे. इतकी साधी शिकवण बाबा सांगतात. बाबांच्या विद्वतेबद्दल अनंतराव भरभरून सांगतात. हे वाचल्यावर आपण वाचकही बाबांपुढे नतमस्तक झाल्याखेरीज रहाणार नाही. खरं म्हणजे हे व्यक्तिचित्र वाचताना वाटतं— अनंतरावांनी त्यांचं अध्यात्मिक चरित्रच लिहायला घ्यावं. त्यांच्याच सांगण्यावरून अनंतरावांनी नारायणगावच्या ज्ञानमंदिराची घडी सुस्थितीत बसवून दिली. बाबांच्या ग्रंथांचे वाचन करता करता अनंतरावांना कितीतरी अध्यात्मिक शब्दांचे अर्थ सोप्यानं समजले. याचा वाचकांनाही उपयोग होईल हे नक्की. उदा. साक्षात्कार- ईश्वराचे दर्शन. अध्यात्म-संतांनी सांगितलेले तत्त्वज्ञान. मानवी जीवनाचे ध्येय स्वत:चे अस्तित्त्व आणि जगाचे अस्तित्त्व यांच्यामध्ये आतून समरस आणि बाहेरून सामंजस्य अनुभवणे हे असावे. ईश-

स्वामित्व चालवणे अशांसारखा कितीतरी गोष्टी बाबांच्या व्यक्तिचित्रात आपल्या वाचकांना अनंतरावांनी सांगितल्या आहेत. त्यासाठीही हे पुस्तक शाळाकॉलेजातून वाचलं गेलं पाहिजे. याचा विद्यार्थ्यांवर चांगला परिणाम होऊ शकेल. असे हे पाच महत्त्वाचे गुरु आणि परिशिष्टातील माटे, पु. ग. सहस्त्रबुद्धे, सत्तेगिरी अशांसारखे गुरु भेटणं ही अनंतरावांच्या आयुष्यातील अत्यंतिक मोलाची ठेव आहे. खरं म्हणजे परिशिष्टातील गुरूंबद्दल अनंतरावांनी लिहिलं असतं तर दुधात साखर पडण्याइतका वाचकाला आनंद झाला असता. आताच्या जमान्यात चांगल्या वाईटाच्या व्याख्याही बदलत चालल्या आहेत. अजून तरी यासारख्या मोठ्या माणसांनी पाहिलेली पिढी जिवंत आहे. निदान लेखनरूपानं तरी या माणसांचा आदर्श वाचकांसमोर राहील. परिशिष्टात लिहिलेल्या पु. ग. सहस्त्रबुद्धांबद्दल एक गोष्ट सांगाविशी वाटते. मी मॅट्रिकला असताना पुगंचं मराठीचं गाईड वापरलं होतं. गाईड कसं असावं याचा ते आदर्श होतं. ते एखाद्या ललितकृतीसारखं मी वरचेवर वाचायचे. या गाईडचा मला चांगले गुण मिळून फायदाही झाला होता.

अनंतराव ह्या सर्व गुरुजनांची जिव्हाळ्याच्या ऋणानुबंधानं आपल्या मनाच्या कुपीत जतन करून ठेवलेली ठेव आपल्यापुढे या लेखनाने उघडी करतात म्हणून त्यांच्यातील सच्चा पण हाडानं मास्तर असणाऱ्या मनाने या गुरुजनांबद्दल आदरणीय केलेले लेखन त्यांच्या लेखणीतून उतरलं. पण तरीही या लेखनाची नुसतीच आरती झालेली नाही याची काळजीही त्यांनी कटाक्षाने घेतली आहे, हे कौतुकास्पद आहे. ही व्यक्तिचित्रं लिहिताना अनंतरावांच्या लेखणीत एक मोकळेपणा सच्चेपणा आहे. काहीवेळा व्यक्तिचित्र लिहिताना त्या त्या व्यक्तित्त्वातील बारकावे लेखक हरवून जातात. आणि उरतात ढोबळ खुणा ! ही व्यक्तिचित्रं नेमकेपणांनी शब्दबद्ध झाली आहेत. त्यावर लेखकानं नेमकेपणानं प्रकाशझोत टाकल्याने त्याला जिवंतपणा आला आहे. आणि म्हणून अनंतराव या पुस्तकांतून त्या त्या व्यक्तींशी आपल्या वाचकांची गाठ घालून देतात आणि त्या व्यक्ती प्रत्यक्ष भेटल्याचा आपल्याला आनंद होतो. अशा व्यक्तिचित्रलेखनाच्या कलेचा जो दर्जा आहे तो एका उंचीपर्यंत त्यांना नेता आला आहे. हेच या लेखनाचं यश !

☐

तस्मै श्री गुरुवेनम:
लेखक-अनंत अंबादास कुलकर्णी,
प्रकाशक - त्रिदल प्रकाशन, गिरगाव, मुंबई

☐

रागिणी पुंडलीक
१४५६, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

---

## साभार पोच

- ☐ **गणगौळण :** फ. मु. शिंदे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४२, मूल्य शंभर रुपये
- ☐ **पठारे प्रभुंचा इतिहास :** प्रताप वेलकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४६८, मूल्य पाचशे रुपये

# ‘मराठी गझल’ ची संशोधनात्मक समीक्षा

डॉ. श्रीरंग संगोराम

‘मराठी गझल’ हा स्व-व्यक्तिमत्त्वाच्या शोधात असलेला ‘मधु’ मादक, उत्तेजक आणि तितकाच अन्यायभेदक व आक्रमक आणि वस्तुत: स्व-अस्तित्वाच्या जाणीवेची स्फुरणे आळवणारा काव्यप्रकार, अशा मराठी गझलचे विकासात्मक, रूपवेधात्मक आणि आपल्या परीने सांगोपांग व संतुलित विवेचन करणारा अत्यंत समयानुकूल असा ‘मराठी गझल-१९२० ते १९८५’ हा पहिला-वहिला ग्रंथ होय.

डॉ. अविनाश कांबळे यांच्यातील उपजत काव्यप्रतिभा लाभलेला तरुण कवी कविवर्य सुरेश भट यांच्या नूतन गझल ‘अभियाना’ने प्रभावित झाला आणि त्या पठडीमधली म्हणजे (कांबळे यांच्या शब्दात) ‘‘मूळ उर्दू ‘पीठा’शी इमान सांगणारी’’ गझलरचना त्यांच्या हातून होऊ लागली. पुढे कांबळे काव्यप्रवृत्तीबरोबरच प्राध्यापकीय कार्यक्षेत्रातील संशोधनात्मक संस्कारांनी प्रेरित झाले आणि गेल्या २० वर्षांत कवितेच्या आस्वाद-मंचावर ‘शोहरत’ मिळत असलेल्या सुरेश संप्रदायी मराठी गझलला विद्यापीठीय संशोधनाच्या चौकटीत स्थापित करून तिचा माधव जूलियन संप्रदायी गझलाच्या पार्श्वभूमीवर समुचित रीतीने रूपवेध साकार करावा अशी ओढ त्यांना लागली. त्यातूनच ‘मराठी गझल (प्रारंभ ते १९२०)’ हा एम्. फील्.चा लघुशोधप्रबंध, गझलधारा (१९९४) हे पुस्तक आणि ‘मराठी’ गझल १९२० ते १९८५’ हा पीएच्. डी. चा प्रबंध यांची निर्मिती झाली. प्रस्तुतचे पुस्तक या प्रबंधाचेचे ग्रंथरूप अवतरण आहे.

या पुस्तकाचे प्रतिपाद्य समजून घेण्यासाठी या विषयाची पार्श्वभूमी संक्षेपाने सांगणे आवश्यक आहे. मराठी काव्यसमीक्षेत ‘गझल’ हा मतमतांतरांचा आणि संभ्रमाचा विषय होऊन बसला आहे. हिंदीत अशी अवस्था नाही. मराठीत ती आहे याला कारण माधवराव पटवर्धन यांचा ‘गझलांजली’ (१९३३) हा संग्रह आहे. मात्र ही संभ्रमावस्था माधवरावांनी सुतराम् निर्माण केलेली नसून ‘तो’ संप्रदाय पुढे चालवणाऱ्या कवींनी गझल (पुलिंगी) आणि गझल (स्त्रीलिंगी) यांना एकाच पंक्तीत बसवून आपली गझलोपयोगी वृत्तातील भावकविता गझल म्हणून रेटली आणि त्यामुळे वाद-विवाद-प्रतिवाद आणि शेवटी संवाद या पायऱ्यांतून गझलसमीक्षेला जावे लागलेले आहे. डॉ. अविनाश कांबळे यांचे श्रेय हे



अनुक्रमणिका



की त्यांनी या सर्व चर्चेला विवादातून संवादाकडे वळविण्याचा आपल्या परीने प्रयत्न केला आहे. याकरिता त्यांनी जातिवंत गझलचे तंत्र या मुद्यावर सर्वाधिक भर दिला आहे. तंत्राची चौकट आखून घेतल्यानंतर त्या कसोटीवर त्यांनी अगदी मोरोपंत-अमृतराय यांच्यापासून आधुनिक काळातील तरुण रचनाकारांच्या गझलसदृश रचनांमध्ये अस्सल गझल वेगळी काढून त्यासंबंधीचे सकारण विवेचन केले आहे.

गझल या काव्यप्रकारातील कविता लयप्रधान, ऐटबाज, सुटसुटीत आणि संगीतानुकूल अशा खास फारसीप्रणीत छंदांमधून रचली जाते. त्यात कमीत कमी ५ व अधिकतर १६-१७ शेर किंवा द्विपद्या असतात. पहिल्या शेरमध्ये जो भावबिंदू असतो त्याचेच 'पल्लवन' पुढील शेरांमध्ये न करता प्रत्येक शेर स्वयंपूर्ण कवितेप्रमाणे स्वतंत्र व सुटा ठेवणे हे जातिवंत गझलचे खरे वैशिष्ट्यच आहे. हे सर्व स्पष्ट करून गझलमधील अंत्य-उपांत्य यमकाचे यम-नियम वगैरेचे तपशीलवार विवेचन लेखकाने केले आहे.

डॉ. कांबळे यांनी या एकंदर तंत्रचौकटीशी इमान राखणाऱ्या मराठी गझलरचनांची प्रशंसा आणि तसे न करतानाही, ''केवळ 'ती' वृत्ते वापरल्यामुळे ही माझी रचना गझलच आहे असा दावा करणाऱ्या कवींवर आणि त्यांना पाठिंबा देणाऱ्या समीक्षकांवर प्रतिटीका केली आहे. या समग्र सर्वेक्षणात्मक विवेचनाचा पट खूपच विस्तृत आहे. यात लेखकाने माधव जूलियन (१९३३) व सुरेश भट (१९६५) असे दोन युगांचे आरंभबिंदू जमेस धरून पहिल्या भागात माधवराव व माधवसंप्रदायातील कवींची आणि रविकिरण मंडळाबाहेरीलही कवींची जमलेली गझल व फसलेली गझल याचे सोदाहरण दिग्दर्शन केले आहे. याच पद्धतीने सुरेशसंप्रदायातील गझलकवींचाही परामर्श घेण्यात आला आहे. मात्र हे करीत असताना त्यांनी जूलियन यांची गझलविषयक भूमिका स्पष्ट करण्याच्या ओघातच असे विधान केले आहे की — ''...येथे मात्र त्यांच्या गझलकार्याचे पहिले पाऊल चुकीचे पडले.'' (पृ. ७२). वस्तुत: माधवरावांना उर्दू-फारसीमधील 'विटाळ्या'ची (साचेबंद) गझल मूळ रूपात मराठीत आणायचीच नव्हती. त्यांचा 'गज्जल' हा गझलोपयोगी वृत्तांतील भावकवितेचाच अवतार आहे. आणि स्वत: कांबळेच हे मान्य करीत आहेत— ''त्यांना गझलेची नस चांगलीच माहीत होती, हे पटते परंतु त्यांच्या बहुतेक गझला अयशस्वी ठरलेल्या पाहून त्यांनी हे जाणूनबुजून केलेले आहे. हे मत अधिक दृढ होत जाते.'' (पृ.६५) श्रेयदानामधील ही वैचारिक तफावत वाचकांना गोंधळात टाकते. त्याचप्रमाणे ''अमृतराय-मोरोपंतोपासून म्हणजे २५० वर्षांपासून मराठीत गझल रुजविण्याचे प्रयत्न चाललेले होते.'' (पृ.२२१) या लेखकाच्या विधानात नकळत गझलच्या वृत्तातील कवितेलाच आपण जातिवंत गझल म्हणून मान्यता देत आहोत, याकडे त्यांचे स्वत:चे कदाचित् अनवधानाने दुर्लक्ष झाले आहे. वरील सर्व टीकेतून प्रश्न असा निर्माण होतो की गझलचे व्यक्तिमत्त्व वृत्ततंत्राच्या आणि द्विपदी सुट्या व स्वतंत्र ठेवण्याच्या चौकटीतच शंभर टक्के

अडकलेले नसून त्याचे इतरही रचनाधर्मी गुणविशेष आहेत असे मानण्यास जागा आहे काय? प्रस्तुत ग्रंथात याचे उत्तर मिळाले असते तर बरे झाले असते.

डॉ. कांबळे यांचा सर्वाधिक भर सुरेश भट यांच्या जातिवंत गझलरचनेवर आहे आणि तो योग्यही आहे. श्री भटांच्या आणि त्या संप्रदायातील नवोदित तरुण कवींच्या गझलांच्या आधारे त्यांनी या सुरेशसंप्रदायी गझलेचे रूपस्वभाववर्णन केले आहे. या सर्व विवेचनातून नवरचनाकारांना आणि रसिकांना गझल या काव्यप्रकाराची आणि मराठीतील त्याच्या नूतन अवतरणाची ओळख होण्यास मदत झाली आहे. तथापि या सर्व विवेचनात हे जाणवत राहते की डॉ. कांबळे यांनी गझलच्या मूळ 'उर्दू पीठ प्रणीत' तंत्राला जेवढे महत्त्व दिले आहे तेवढे आशयपक्षाला दिलेले नाही. जर प्रत्येक शेर आशयदृष्ट्या स्वतंत्र असेल तर ५ ते १७ शेरांची लोखंडी अट कशाला? पुढे प्रश्न असा की गझल हा अशा शेरांचा 'होल्डॉल' आहे की पुष्पगुच्छ आहे? जर एकजिनसीपणाचा कोणताही पदर नसेल तर मनाच्या श्लोकांप्रमाणे एकेक शेर लिहून सोडून द्यावेत! खरी अपेक्षा अशी की गझलच्या शेरांमध्ये काहीएक सुप्त संज्ञाप्रवाह असतो आणि असावा लागतो. उदारहणादाखल, भटांचीच 'रंग माझा वेगळा' ही गझल आठवून पाहावी. गझलच्या भावपक्षातही 'भावतंतूत गुंतून देखील आपला पाय मोकळा ठेवण्याची' जी विलक्षणता आहे, त्याचे सौंदर्यशास्त्र लेखकाने समजावून दिलेले नाही. हे साधण्यासाठी नुसते तंत्रज्ञान पुरे पडणारे नाही. त्याकरिता अस्सल अनुभूती, चिंतनशील प्रगल्भ मन, भाषाशैलीची पकड, स्वत:ची जीवनविषयक बैठक वगैरे असणे आवश्यक आहे. माधव जुलियन, कुसुमाग्रज, बोरकर, विंदा, पाडगावकर, शांता शेळके, सुरेश भट यांच्यामध्ये निश्चितच हे सामर्थ्य आहे. तरुण कवींना (काही अपवाद वगळता) या उंचीला अजून पोचायचे आहे. प्रस्तुत ग्रंथात मात्र तंत्रप्रामाण्याच्या तंबूखाली या सर्वांची भट्टी एकत्र जमविण्याचा प्रकार घडल्यामुळे त्यातील अनेकस्तरीय उदाहरणांमधील काव्यसामर्थ्यातल्या तरतमतेकडे लक्ष दिले गेलेले दिसत नाही.

दुसरे असे की गझल हा पूर्णत: आत्मकेंद्रित काव्यप्रकार आहे, हे मान्य केल्यानंतर या कवितेला अहंकाराचा, नकली आत्मपीडनाचा आणि "मी मात्र साव आणि इतर सगळे ..." असल्या विवेकहीनतेचा दर्प येणार नाही, याची खबरदारी घेणे आवश्यक. सुरेशसंप्रदायातील निदान १९८५ पर्यंतच्या नवोदित गझलकारांना हा संयम सांभाळता आला आहे काय ? खुद्द अविनाश कांबळे यांनीच आपले आदरमूर्ती सुरेशजी यांच्या गझलांमधील शिवीच्या पातळीवरील शब्दांचा वापर, दुर्बोधता, तोचतोचपणा, उर्दू अनुकरणातून आलेली मद्य प्रतीके वगैरेंवर स्पष्ट टीका केलीच आहे. (पृ. १९१-९२)

लेखकाने शेवटच्या प्रकरणात एका महत्त्वपूर्ण मुद्याकडे लक्ष वेधले आहे व त्यासाठी त्यांचे अभिनंदन केले पाहिजे. 'मराठी' गझल खऱ्या अर्थाने मराठी बनत आहे' हा तो विचार होय. अर्थात हा विचार

अधिक स्पष्ट व्हायला हवा होता हेही खरे. वस्तुत: १९८५ पर्यंत नवे गझलकवी प्रयोगाच्या पातळीवरच होते. तरीही मराठी शब्दकला, प्रतीक-प्रतिमा आणि मुख्य म्हणजे उर्दूतील लिंग निरपेक्षतेच्या विकृत संकेतातून स्वभावत: झालेली सुटका अशी बरीच गुण वैशिष्ट्ये तिच्यात आलेली होती. १९८५ नंतर मराठी गझल स्वत:ला आणखीनच अधिक 'ओळखू' लागली आहे. इतकी की ती आता सुरशे भटांच्या प्रभावक्षेत्रातूनही बाहेर आलेली आहे. आशिक-माशूकचे पारंपारिक ओढणे टाकून देऊन ती खऱ्या प्रेमभावनेची सखोल अभिव्यक्ती करीत आहे. जीवनाची अनेक वेगवेगळी अनुभवक्षेत्रे आता गझलचा विषय बनत आहेत. भाषेचा कृत्रिमपणा जाऊन अस्सल भावमंत्रित शब्दकला आता सहज सुटसुटीतपणे प्रकटत आहे. आणखी एक लक्षणीय असे की मराठी गझलांचा आस्वाद एक 'यूनिट' म्हणून घेण्याची प्रवृत्ती अगदी आरंभापासून येथे रूजलेली असल्यामुळे फटाक्याप्रमाणे कलाटणीचा गंमतशीर धक्का देणाऱ्या सुट्या शेरोशायरीचा सुळसुळाट मराठीत माजलेला नाही. कै. भाऊसाहेब पाटणकर याला अपवाद ठरतील; परंतु ती उथळ खसखस पिकवणारी कृत्रिम पद्यजुळणी आहे. कवितेच्या उंचीला ती कधी पोचू शकणार नाही. याशिवाय मराठीतील संप्रदायबद्ध कवी गझल एक्के गझल ही वृत्ती न अंगीकारता, अन्य श्रेष्ठ स्वाधीन कवींप्रमाणे, मुक्तछंद, भावकविता यातही आत्माभिव्यक्ति करीत आहेत. खरोखरी, मराठी गझल आज उर्दू पेक्षा समृद्ध होऊ पाहाता आहे. डॉ. कांबळे यांच्या संशोधनाने तिला लक्षवेधी बनविले आहे.

□

मराठी गझल १९२० ते १९८५
लेखक - डॉ. अविनाश वि. कांबळे
मराठी विभाग, राजर्षि छत्रपती शाहू
महाविद्यालय, कदमवाडी,
कोल्हापूर ४१६ ००३.
प्रकाशक : नीहारा प्रकाशन
५३४, बुधवार पेठ, पुणे ४११ ००२.

□

डॉ. श्रीरंग संगोराम
५१, गणेशमळा, पुणे ४११ ०३०.

---

## साभार पोच

### लोकवाङ्मय प्रकाशन, मुंबई

- **मार्क्सवाद्यांचे स्वप्न आणि फेरमांडणी :** मूळ लेखक - रमेश उपाध्याय, अनुवादक - सूर्यनारायण रणसुंभ, पृष्ठे १८, मूल्य - तीन रुपये.
- **मार्क्सवादाचे आजच्या काळाचे महत्त्व :** मूळ लेखक - एजाज अहमद, अनुवादक - सूर्यनारायण रणसुंभ, पृष्ठे ५३, मूल्य वीस रुपये.
- **डॉ. रामनारायण लोहिया :** प्रकाश बेंद्रे, पृष्ठे ३७, मूल्य वीस रुपये.
- **विलंबित :** सतीश काळसेकर, पृष्ठे ८६, मूल्य पन्नास रुपये.
- **आप्त :** अनिल अवचट, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १६४, मूल्य शंभर रुपये
- **युगान्त :** महेश एलकुंचवार, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १४२, मूल्य एकशेवीस रुपये



अनुक्रमणिका

# वाचकांच्या प्रतिक्रिया

कै. माजगावकरांच्या कर्तृत्वाला न्याय देणारे फारच चांगले लेख आपण संपादित केले आहेत. कै. बोरकरांवरील लेख तसेच इतर समीक्षात्मक लेखनही दखलपात्र उतरलेले आहे.

तुळशीदास रा. कामत
मु. पो. लोलये, ता. काणकोण (गोवा)

'माणूस' कार माजगावकर यांच्या विषयीचे लेखन, डॉ. मंदा खांडगे यांचा 'कवीच्या गावा जावे' हा सहावा लेख एवढेच. बाकीचे लेखन पाने भरण्यास अनुकूल. संशोधनपर लेखन मुळीच नाही.

डॉ. भालचंद्र फडके, पुणे

अंकातील विशेष बदल जाणवला. अंक चांगला निघाला आहे. आपल्या इतक्या वर्षांच्या अनुभवाचा आनंद सर्वांनाचा मिळाला आहे. यापुढीलही अंक असेच देखणे होवोत.

डॉ. स्नेहल तावरे, पुणे

म.सा.पत्रिकेचा अंक मिळाला. आपल्या संपादकीयापासून तो मजकुरापर्यंत वेगळा हात फिरत असल्याचे जाणवले, विविधतेबरोबरच माहितीपूर्णताही आहे.

पदमाकर कुलकर्णी, ठाणे

आपले संपादकीय वाचून मुद्दाम सर्व अंक व्यवस्थितपणे पाहिला. आपल्या संपादकीयात आपण जो विनय दाखविला आहे, तो आपल्या विनम्र स्वभावाला धरून असेल. माझे मत मात्र असे झाले की, आपण एखाद्या मुरब्बी, अनुभवी संपादकाच्या तोडीला शोभेल असे कौशल्य दाखविले आहे.

व्यं. न. कुलकर्णी, मुंबई.

म.सा. पत्रिकेचे ताजा अंक मिळाला. या अंकातले माजगावकरांचे कर्तृत्व आणि त्यांच्यातले माणूसपण उलगडून दाखवणारे हे तीन मृत्युलेख आपण छापलेत. यासाठी आपणास धन्यवाद द्यायला हवेत. डॉ. मंदा खांडगे यांचे लेखन तर केव्हाच वाचकप्रिय झाले आहे.

अतुल व्यं. देशमुख, पुणे



अनुक्रमणिका






# म.सा.प. कार्यवृत्त

रत्नाकर कुलकर्णी

जुलै ९७ ते सप्टेंबर ९७ या तीन महिन्यात परिषदेतर्फे विविध साहित्यिक कार्यक्रम आयोजित करण्यात आले होते. शनिवार दि. ५ जुलै ९७ रोजी र. वा. दिघे स्मृतिदिनानिमित्त डॉ. नागनाथ कोतापल्ले (मराठी विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ) यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली. सर्वश्री डॉ. कल्याणी दिवेकर, गजानन चव्हाण व कृष्णा किरवले यांनी वेगवेगळे मार्मिक प्रश्न विचारून ही मुलाखत रंगतदार केली.

सोमवार दि. १४ जुलै ९७ रोजी कै. बाबूराव शिरोळे व कै. शांतादेवी शिरोळे स्मृतिप्रीत्यर्थ दिल्या जाणाऱ्या पारितोषिकांचा संयुक्त कार्यक्रम श्रीमती शांताबाई शेळके यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आला होता. कै. बाबूराव शिरोळे पारितोषिक बालकुमार साहित्यिक पंढरीनाथ रेगे यांना देण्यात आले. पंढरीनाथ रेगे यांच्या वतीने त्यांचे प्रकाशक श्री. ना. गो. जोशी यांनी ते स्वीकारले. कै. शांतादेवी शिरोळे पारितोषिक डॉ. अरुणा ढेरे यांना देण्यात आले. हे पारितोषिक या वर्षापासून सुरू झाले असून मराठी साहित्यात नव्याने स्थिरावणाऱ्या एखाद्या लेखिकेला किंवा कवयित्रीला देण्यात येणार आहे. या पारितोषिकासाठी श्री. चंद्रसेन शिरोळे यांनी मोठी देणगी परिषदेस दिलेली आहे. परिषद श्री. चंद्रसेन व डॉ. धैर्यशील शिरोळे यांची आभारी आहे. या समारंभाचे सूत्रसंचालन कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी केले तर आभार कल्याणी दिवेकर यांनी मानले. दि. २० जुलै १९९७ रोजी कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'प्रेमचंद : श्रेष्ठ भारतीय कादंबरीकार' या विषयावर श्री. अशोक कामत यांचे भाषण आयोजित करण्यात आले होते.

मंगळवार दि. २२ जुलै ९७ रोजी ग. ल. ठोकळ पारितोषिकाचा वितरण समारंभ झाला. श्री. अप्पासाहेब खोत, पन्हाळा यांच्या 'महापूर' या कथासंग्रहास हे पारितोषिक मिळाले. परीक्षकांच्या वतीने प्रा. मिरदेव गायकवाड यांचे भाषण झाले. प्रास्ताविक कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर तर आभार रत्नाकर कुलकर्णी यांनी मानले.

बुधवार दि. ३० जुलै ९७ रोजी संत सावतामाळी महाराज यांच्या पुण्यतिथीनिमित्त डॉ. मो. गो. धडफळे यांनी 'वारी' या विषयावर निबंध वाचन केले. त्यावर अनेक श्रोत्यांनी प्रश्न विचारले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष गं. ना. जोगळेकर यांनी केले. आभार



अनुक्रमणिका






कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी मानले.

शुक्रवार दि. १ ऑगस्ट ९७ रोजी कै. अण्णा भाऊ साठे स्मृतिदिनानिमित्त 'दलित नाटक, दलित रंगभूमी' या विषयावर श्री रामनाथ चव्हाण यांचे भाषण झाले. हा समारंभ म. सा. प. व दलित सा. प. यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आला होता.

शनिवार दि. ९ ऑगस्ट ९७ रोजी शंकर पाटील पारितोषिक वितरण समारंभ श्री. राजेन्द्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आला होता. परीक्षकांतर्फे आशा कर्दळे यांनी भाषण केले. प्रास्ताविक कार्यवाह कल्याणी दिवेकर तर आभार रत्नाकर कुलकर्णी यांनी मानले.

मंगळवार दि. १२ ऑगस्ट ९७ रोजी परिषदेचे माजी कोषाध्यक्ष, ज्येष्ठ प्रकाशक व्हीनस प्रकाशनचे संचालक स. कृ. पाध्ये यांच्या निधनानिमित्त शोकसभा घेण्यात आली होती. सर्वश्री गं. ना. जोगळेकर, मुकुंदराव किर्लोस्कर, व. दि. कुलकर्णी, ह. ल. निपुणगे, प्रि. दि. ब. केरूर, प्रा. चंद्रशेखर बर्वे, प्रकाश शुक्ल यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. अध्यक्षस्थानी ज्येष्ठ प्रकाशक श्री. अनंतराव कुलकर्णी होते. कवयित्री संजीवनी मराठे यांची पत्ररूपाने आलेली श्रद्धांजली कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी वाचून दाखवली तर श्रद्धांजलीचा ठराव कार्यवाह कल्याणी दिवेकर यांनी वाचला.

बुधवार दि.१३ऑगस्ट ९७ रोजी आचार्य अत्रे जन्मशताब्दीनिमित्त समारंभ आयोजित करण्यात आलेला होता. 'आम्ही पाहिलेले अत्रे' या विषयावर सर्वश्री शांताबाई शेळके, मोहन धारिया, भाई वैद्य, बापू वाटवे, माधव वझे, म. श्री. दीक्षित व वसंतराव आगाशे यांनी वेगवेगळ्या आठवणी सांगितल्या. अध्यक्षस्थानी मा. जयंतरावजी टिळक होते. प्रास्ताविक गं.ना.जोगळेकर यांनी केले. या समारंभास रसिकांची प्रचंड गर्दी होती. फुले सभागृह पूर्ण भरून गेले होते. अनेक रसिकांना सभागृहात प्रवेश मिळू शकला नाही. ते सभागृहाच्या दारे-खिडक्यात उभे राहून समारंभाचा आनंद घेत होते. आभार प्रदर्शनात कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी श्रोत्यांच्या झालेल्या गैरसोयीबद्दल विशेष दिलगिरी व्यक्त केली.

मंगळवार दि. २६ ऑगस्ट ९७ रोजी कविवर्य वसंत बापट व प्रा. ग. प्र. प्रधान या दोन ज्येष्ठ लेखकांच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त 'श्रोतृसंवाद' असा विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात आलेला होता. यावेळी श्रोत्यांनी प्रा. बापट व प्रा. प्रधान यांना त्यांच्या वाङ्मयीन वाटचालीविषयी तसेच राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक घटनांसंबंधी मोकळेपणाने प्रश्न विचारले. या मान्यवरांनीही अत्यंत दिलखुलासपणे प्रश्नांना उत्तरे दिली. या समारंभात कोणत्याही प्रकारचे भाषण झाले नाही. कार्याध्यक्ष गं. ना. जोगळेकर यांनी दोन्ही साहित्यिकांचा शाल, श्रीफल व पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला.

शनिवार दि. २० सप्टेंबर ९७ रोजी बालकवी स्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन आयोजित केलेले होते. यात जयंत भिडे, स्वाती सामक, अंजली महागावकर, अंजली कुलकर्णी, मीनल बाठे, शंतनु चिंधडे, अरविंद भुजबळ, राजलक्ष्मी देशपांडे, अनिल कांबळे, मनीषा

दीक्षित, कल्याण इनामदार, प्रगती येरलेकर, आसावरी काकडे, संगीता बर्वे, सुधाकर देशपांडे आदी कवी कवयित्रींनीं भाग घेतला. सूत्रसंचालन प्रमोद आडकर यांनी केले.

मंगळवार दि. ३० सप्टें ९७ रोजी पु. भा. भावे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ 'महाराष्ट्राबाहेरील मराठी समाजापुढील समस्या व उपाय या विषयावर मध्यप्रदेश साहित्य संघाचे अध्यक्ष डॉ. चंद्रकांत पांढरीपांडे यांचे भाषण झाले.

बुधवार दि. १३ ऑगस्ट ९७ रोजी म. सा. प. धुळे शाखेमार्फत बालकवी व आचार्य अत्रे जन्मशताब्दी साजरी करण्यात आली. या समारंभाचे अध्यक्ष उत्तमराव पाटील होते. प्रा. यशवंत भंडारे यांचे अत्र्यांची पत्रकारिता या विषयावर भाषण झाले. प्रास्ताविक पुरुषोत्तम पाटील यांनी केले तर आभार कार्यवाह सौ. अर्चना हातेकर यांनी मानले. सूत्र संचालन बी. वी. महाजन यांनी केले. तर पाहुण्यांचा परिचय पु. म. चित्ते यांनी करून दिला.

रविवार दि. ३१ ऑगस्ट ९७ रोजी म. सा. प. ठाणे शाखेतर्फे ठाणे जिल्ह्यातील साहित्यिकांच्या साहित्यावर एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. या चर्चासत्रात सर्वश्री श्रीराम बोरकर, मोहन पाठक, म. वा. सराफ, शीला मराठे आदींनी भाग घेतला होता. अध्यक्षस्थानी प्रा. डॉ. विद्या नानल होत्या.

रविवार दि. ३१ ऑगस्ट ९७ रोजी म. सा. प. बारामती शाखेने बारामतीचे कवि अशोक जाधव यांच्या काव्यसंग्रहाचा प्रकाशन समारंभ साजरा केला. अध्यक्षस्थानी बारामती शाखेचे उपाध्यक्ष श्री. व. द. मावळणकर होते तर प्रमुख पाहुणे श्री. अनंत सुमंत होते. या समारंभाच्या निमित्ताने एक कवि संमेलन आयोजित केले होते. सर्वश्री लता महाजन, दीपाली धुमाळ, निलेश महाजन, अमृता महाजन, उदय सुपेकर आदी एकवीस कवि कवयित्रींनी भाग घेतला होता. तसेच हिंदी-काव्य पुरस्कार मिळाल्याबद्दल श्री जयंत सुपेकर तर अण्णा भाऊ साठे 'साहित्य क्षेत्रीय कार्यकर्ता' पुरस्कार मिळाल्याबद्दल श्री. प्रकाश गुजर यांच्या सत्कार करण्यात आला.

म. सा. प., श्रीरामपूर शाखेतर्फे शनिवार दि. १२ जुलै, ९७ रोजी प्रा. सदाशिव कदम यांचे 'रवींद्रनाथ टागोर : व्यक्ती आणि कर्तृत्व' या विषयावर भाषण झाले. अध्यक्षस्थानी ॲड. रावसाहेब शिंदे होते. कार्यवाह प्रा. बाबुराव उपाध्ये यांनी प्रास्ताविक केले तर आभार दिनकर पोखरकर यांनी मानले.

मंगळवार दि. २९ जुलै ९७ रोजी कै. डॉ. उमेश मासूरकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

श्री. रत्नाकर कुलकर्णी
कार्यवाह, म.सा.प.

